गुणलुब्धाः स्वयमेव संपदः

महाराष्ट्र--कुटुंब--माला

पुष्प ७ वें

# पैसा



लेखक

नारायण विनायक कुलकर्णी

---

सन १९२६

---

किंमत एक रुपाया

संपादक—नारायण विनायक कुलकर्णी
प्रकाशक—विठ्ठल रामचंद्र खाडिलकर
मालक श्रीदत्त एजन्सी, पुणें शहर.

महाराष्ट्र-कुटुंब-माला.

पुष्प ८ वें.

# चिमणी.



( भाग २ रा ).

ले.—भा. वि. वरेरकर.

---

जानेवारी १९२७ मध्यें
प्रसिद्ध होईल.

मुद्रक—गणेश काशिन
सेक्रेटरी, श्री गणेश
४९५–९६ श

॥ श्रीराम ॥

# पैसा

## -उपोद्घात-



" ईश्वर पाठिराखा असो ! "

" होय. तरच सारं कांहीं नीटनेटकं होईल ! "

" प्रयत्नांची शिकस्त करीत असतांन' देव किंवा दैव यांची आठवणही होतां कामा नये. "

" हें तुझें पहिल्यापासूनच ब्रीद वाक्य आहे. "

" म्हणूनच तिनं आपण होऊन आपल्यावर ही परिस्थिति-कायमची परिस्थिति ओढवून घेतली आहे. अन् आतां बोलून उपयोग काय ? "

" पण मी माझ्या या परिस्थितीबद्दल कुरकुर-तक्रार-कधीं कोणाजवळ केली आहे का ? तुमच्याजवळ तरी कधीं एका अक्षरानं म्हटलं आहे का ? "

" तशी तूं पहिल्यापासून हट्टी आहेसच ! "

" तुला ही हट्टी वाटते, मला निश्चयी वाटते ! "

" लहानपणापासून हिची री ओढावयाची संवय तुला आहेच नाहीं तरी ! "

" बरं बाई, आमचं एक असूं दे. तूं तरी तुझ्या संसारांत सर्वस्वी सुखी झाली आहेस ना ?

" कोण जाणें ! "

" कां ग ? आतां कां ' कोण जाणें ! ' म्हणतेस ? शांतेसारखी तूं दुःखी नाहींस, हट्टी नाहींस, कीं आपण होऊन आईबापाचं, गणगोताचं, भाऊबहिणींचं न ऐकतां, तिच्या सारखा-एकाद्या दरिद्रीबावळटाच्या गळ्यांत विवाहमाला घालण्याचा मूर्खपणा केला नाहींस, मग आतां 'कोण जाणें !' कां ? तुझ्या दारीं-घरीं संपत्ति हवी तशी हवी तितकी लोळते आहे—"

" अन् इंदू , तुझ्या तिथं तरी काय कमी आहे ग ? तुला तरी शांती-सारखा गंभीर भाव आणायचं कांहीं कारण नाहीं ना ?—"

" माझं काय बाई घेऊन बसलीस. मी सुखांत आहें कीं दुःखांत आहें, हें माझं मलाच कळत नाहीं. मला सुख घेतां येत नाहीं, तसं देतांही येत नाहीं —आनंदी, माझ्या संसाराला सुरुवात झाली आहे नुसती— "

" अन् माझ्या नाहीं वाटतं ? " आनंदी मध्येंच म्हणाली, " तुझ्या लग्नानंतर एकच महिन्यांनीं माझं लग्न झालं ना ? मग माझ्याही संसाराची सुरुवातच नाहीं का ? "

" इंदू , अनू , तुमच्यासारखंच माझंही नाहीं का ? माझ्याही संसाराची सुरुवातच नाहीं का ? मग मी हट्टी, प्रयत्नवादी, घमेंडखोर, असं जें म्हणतां तें कां ? आपणा तिघींच्या संसारांची सुरुवात झाली आहे—तिघीही नावेंत बसलों आहोंत. तिघींना तिघींनीं जरी विचारलं कीं, ' तूं आपल्या संसाराला पूर्ण सुखाची सुरुवात केली आहेस का ? ' तर प्रत्येकीला तूं जसं 'कोण जाणें' म्हणून उत्तर दिलंस, तेंच द्यावें लागेल."

" तें खरं ग ! पण माझं म्हणणं इतकंच कीं, तूं होऊन संकटांत—अड-चणींत-दुःखांत उडी घातली आहेस; त्याकरितां बोलायचं दुसरं काय ? मला जितकं माझ्या संसारांत माझ्या मनासारखं नांदतां वागतां येईल, इंदू जर मनांत आणील, आपला स्वभावदुर्गुण जरा बाजूला ठेवील, तर तिलाही संसारांत कांहीं कर्तबगारी करून दाखवितां येईल, तसं तुला तुझ्या आयुष्यांत सोपं जाणार नाहीं. तुझं रूप, तुझी बुद्धिमत्ता, तुझ्या हौशी-आवडी, तुझ्या महत्वाकांक्षा, तुझीं शाळेंत शिकत असतांनाचीं मोठमोठीं ध्येयें-उंच उंच मनोरथ, हीं सर्व केवळ हट्टानें मार्ग चुकवून बसल्यामुळें न जाणों, तशींच्या-तशींच जागच्या जागीं राहणार नाहींत का ? इतकं कशाला ? मी ह्मणतें, तूं अशा ठिकाणीं आपखुषीनें येऊन पडली आहेस कीं, तुला ' वेळेची देखील भ्रांत पडावी ! ' स्पष्ट बोलल्याबद्दल राग मानूं नकोस. पण तूंच सांग झालं आहे कीं नाहीं असं ? "

" ईश्वरानं मला जन्माला घातलं, त्याच्या अगोदर माझा शेर निर्माण करून ठेवला आहे, हें तत्व मला माहित नसतं, तर अनू , तुझ्या बोलण्यानं

मला राग आला असता. आयतं, सहजासहजीं, भाग्यानं, पूर्वजन्मींच्या पुण्याईच्या जोरावर, जर ' सुग्रास ' मिळाला, तर त्यांत विशेष तें काय ? कुठंही गेलं तरी संकल्प आणि सिद्धी यांच्यामध्यें परमेश्वरी इच्छा उभी असते, हें जर खरं, तर त्या इच्छेचा पाठपुरावा करण्याकरितां, मी होऊन जर थोडासा बिकट—जनदृष्टीनें—मार्ग पत्करला, तर इतरेजनाप्रमाणें तुह्मीं—माझ्या मैत्रिणींनींही माझी हेटाळणीच करावी ? तिरस्कारच करावा ? थट्टाच करावी ? —तुह्मीं कांहीं म्हणा, पण आयत्या पिठावर रेघोट्या ओढणं मला आवडत नाहीं–पसंत नाहीं--व इच्छाही नाहीं ! श्रीमंतींत शिरून श्रीमंतींतल्या 'पापांचा' भार माथ्यावर चढवून घेण्यापेक्षां, गांजणाऱ्या गरीबींत घुसून तिथला प्रांत मंगल—करण्याची महत्वाकांक्षा धरणंच मला अधिक आवडलं, आणि तेंच मी केलं ! "

शांता आपल्या मैत्रिणीपुढें धीरगंभीरपणानें बोलत होती. यावेळीं बोलतांना तिच्या चेहेऱ्यावर एकाद्या देवतेचें पावित्र्य तळपत होतें. बोलण्याच्या अस्खलीत ओघांत ती तन्मय झाली होती. तिचा आवाज श्रुतिमनोहर वाटत होता. रागदारीच्या सप्तसुरांचे पद्धतशीर आरोहअवरोह प्रतित होत होते. क्षणकाल तिच्या मैत्रिणी इंदू व आनंदी, चकित होऊन शांतेकडे पहात होत्या. बोलणारी शांता, आपण समजतों तशी दुःखी नाहीं, कष्टी नाहीं, हट्टी नाहीं, हेकेखोर नाहीं, कीं कांहीं नाहीं. तिच्या ठिकाणीं कसलें तरी दिव्य तेज वास करीत आहे, मग तिचें तें तेज पूर्वदत्त असो, कीं शिक्षणामृतपानानें तिला प्राप्त झालेलें असो. आपण आपल्या समाधानाकरितां त्याचें श्रेय दोघांकडेही वाटून देऊं या.

शांतेच्या मैत्रिणी शांतेकडे आज फारा दिवसांनीं आल्या होत्या. फारा–दिवसांनीं म्हणजे तिघींची लग्नें झाल्यानंतर त्या भेटल्याच नव्हत्या म्हटलें तरी चालेल. शाळेंत तिघी जात असत, त्या वेळच्या ओळखी, आणि त्यांची मैत्री. जनरूढीप्रमाणें इंदू सुखांत पडली होती. आनंदी स्वतःच्या मनाप्रमाणें केवळ पैशांच्या राशींत लोळावयाला सांपडत असल्यामुळें ती सुखी होती. आणि शांता—स्वतःच्या मनाप्रमाणें कशी असेल कोण जाणें, पण जनदृष्टीनें मात्र तिनें आपल्या जन्माचें मातेरें करून घेतलें होतें. तिनें आपल्या हातांनीं

आपल्या पायांवर धोंडा पाडून घेतला होता. शांतेनें स्वतःचा वर स्वतः पसंत केला होता. स्वतःचें घर स्वतः शोधलें होतें. त्यामुळें ती आपल्या माहेरीं खुद्द आईबापांना देखील नावडती झाली होती. त्यांच्या कल्पनेप्रमाणें तिची योग्यता, तिची रूपसंपदा, तिचें शहाणपण, एकाद्या राजाची राणी होण्याच्या तोलामोलाचें होतें; आणि तशासारखें स्थळ तिच्या आईबापांनीं अनेक खस्ता खाऊन, श्रम घेऊन शोधून काढण्याच्या बेतांत आणलें होतें; तों तें सर्व बाजूला सारून शांतेनें आपल्या इच्छेप्रमाणें केलें. आयत्या श्रीमंतीच्या साव-लीला झुगारून देऊन तिनें आपण होऊन दारिद्र्याच्या रखरखलेल्या उन्हांत उभ्या असलेल्या एकाचा चिरसहवास आपखुषीनें पत्करला होता. शांतेचीं माहेरचीं माणसें तिच्यावर नाखुष, आणि उदास होती. मैत्रिणी टोचीत होत्या. शेजारीपाजारी तिच्या मूर्खपणाला हंसत होते. कोणी तिच्या स्वच्छंदी स्वभावाबद्दल तिरस्कारही करीत असतील. पण शांता ही शांतच दिसत असे. समुद्राच्या अंतरांतली गंभीरता तिच्या मुखावर स्पष्ट गोचर होई. पण हें अजून फार लोकांच्या लक्षांतही आलें नव्हतें. कसें येणार ? इतकें खोल, आणि चौकस रीतीनें पाहण्याचें कोणाचें नडलें आहे ? आणि वेळ तरी कोणाला असतो ? 'देखल्या देवा दंडवत' घालण्यापलिकडे एकमेकांची विचारपूस करावयाला फुरसत तरी कोणाला असते ? बरें दिसलें, बरें म्हटलें, चालूं लागलें. वाईट दिसलें, नाक मुरडलें, पुढें झटकलें. असाच साऱ्या जगाचा कारभार! चकाकतें तें सारेंच सोनें नसतें हें तत्व कितीही खरें असलें, कितीही पटलेलें असलें तरी व्यवहाराच्या ओघांत प्रत्यक्ष आचरणाच्या वेळीं प्रत्येक जण तें अजीबात विसरलेला असतो, आणि चकाकण्यालाच भुलतो, चकाक-ण्यालाच मान देतो, चकाकण्यालाच कळकळीनें कवटाळतो; असा उघड्या डोळ्यांनीं पाहाणाराला प्रत्यय येतो. ही सामान्य मनोवृत्ति झाली. पण याच सामान्य मनोवृत्तीला पळसा घालून आयुष्याच्या इतिहासांत एकादी वरची पायरी गांठण्याची इच्छा करणारी व्यक्ति आपल्या आंगच्या मगदुराप्रमाणें प्रयत्न करतांना पाहिली म्हणजे जाणता तिचें कौतुक करतो. इतरे जन सहज रस्त्यानें जातां जातां हेटाळणीनें हंसतातच.

शांतेची आज तशीच स्थिति झाली होती. सारा गांव तिची तिच्या मूर्ख-

पणाबद्दल हेटाळणी करीत होता. उभ्या जन्मांत तिची चूक एकच. आणि ती चूक आयुष्यभर दुरुस्त करण्याकरितां कोणत्याही सबबीवर बदलतां न येणारी! तरी पण ती शांत होती. मैत्रिणीचें खोंचून-टोंचून बोलणें तिच्या पर्यंत येईपर्यंत बोथटच होत असे. आणि तें पाहून तिच्या मैत्रिणी शरमिंध्या होत असत. असें कां ?

शांतेच्या बोलण्यानें चकित झालेल्या तिच्या मैत्रिणी इंदू व आनंदी, जरा वेळानें पूर्व स्थितीवर आल्या. इंदूचा शांतेविषयींचा निर्मळ भक्तीभाव तिच्या मुखावर अजूनही खेळत होता. आनंदीला मात्र जग निराळें वाटलें. आपण इतक्या स्वतःला शहाण्या म्हणवितों, स्वतःला सर्वांपेक्षां सुखी समजतों, तरी शांतेच्या सहज बोलण्याच्या ओघांत कशा वाहावल्या गेलों, याबद्दल तिचें तिला चमत्कारिक वाटलें. स्वतःचा स्वतःला थोडा राग देखील तिला आल्याशिवाय राहिला नाहीं. पण सावधगिरी करून तो तिनें बाहेर दिसूं न देण्याची तेवढी त्या वेळीं खबरदारी घेतली.

नंतर मैत्रिणींचीं बोलणीं या विषयावरून त्या विषयावर सारखी बदलत बदलत चाललीं. आपण गरीब असूनही आपल्या घरीं आपल्या मैत्रिणी आठवण ठेऊन आल्या, याबद्दल सौम्य पण सच्चा शब्दांनीं शांतेनें मैत्रिणींचे आभार मानले. इंदूनें आपण होऊन पुढें होऊन ' चहा ' करावयाला घेतला. स्टोव्ह, स्पिरीटची बाटली, साखऱ्या, चहाचा डबा, दुधाचें भांडें, कपबशा इत्यादि चहाचें सामान शांता व इंदू यांनीं जमविलें. शांता नको नको म्हणत असतां इंदूच चहा करूं लागली. आनंदीला मनाशीं वाटत होतें, कीं आपण आज 'पाहुण्या' म्हणून शांतेकडे आलों आहोंत. आपण कशाला पुढें पुढें करायचें तें ? आपला हक्क असा कीं, ' असं इथं बसायचं ' नी शांतेनें चहा आणून आपल्यापुढें ठेवायचा. शांतेनें किंवा इंदूनें आपल्याला हातभार लावण्याबद्दल एका अक्षरानेंही आनंदीला म्हटलें नाहीं. ' चहा ' तयार झाला, सगळ्या जणींनीं आपापल्यापुढें ' कपबशा ' घेऊन चहा ओतला, आणि सगळ्यांनीं मिळून घ्यायला एकदम सुरुवात केली. चहा घेतांना तिघींच्या चेहेऱ्यावर एका 'चहा' मुळेंच कदाचित् तीन निरनिराळे विकार उमटले नसतील कशावरून ?

" गरीबीचाच पण निस्सीम प्रेमाचा चहा माझ्या मैत्रिणींना गोड लागला असेल का ? "

शांतेचा विचार हा असेल.

" गरीबींतलाच पण ज्यांत मैत्रीचं अंतःकरण ओतलें आहे, ज्याला कर्तव्याचा वास येतो आहे, ज्यामध्यें स्वाभिमानाची साखर टाकली आहे, शुद्ध आणि सात्विक मैत्रीचं दूध घातलें आहे, आणि निर्मळ आपलेपणाच्या गाळण्यांतून जो गाळला गेला आहे, तो शांतेसारख्या मैत्रिणीच्या हातच्या—तिच्या घरचा ' चहा ' किती सुंदर आहे ! " इंदू चहाचा एक घोट घेऊन दुसरा घेण्याच्या आंत विचार करीत असेल.

" दिला झणूनच घ्यायचा. गरीब ते गरीब; आणखी डौल तर भारी. चहा काय आणि आहे काय ? माझ्याकडे आल्या असत्या—किंवा जेव्हां येतील या दोघी जणी, त्यावेळीं मी ' चहा 'च्या प्रकारानें दिपवून टाकलें असतें, नाहीं तर टाकीन ! काय, एवढं चहाचं पाणचट पाणीच घेऊन जायचं? बिस्किटं, फळफळावळ, नको का कांहीं त्याच्याबरोबर ? माझ्या घरीं एकदां बोलावून दाखवितेंच त्यांना तर चहा म्हणजे कसा असतो, आणि कसा असायला पाहिजे ? " अर्थात् हे आनंदीशिवाय दुसरे कोणाचे विचार असणार ?

याप्रमाणें तिघींही जीवाभावाच्या मैत्रिणींचें ' चहापान ' चाललें होतें. त्या वेळांत त्यांच्या स्वातंत्र्यावर घाला घालायला मध्यंतरीं कोणी तिकडे फिरकलें सुद्धां नाहीं. आणि कोणी डोकावून गेलें असलें, तरी त्यापैकीं एकीच्याही ध्यानींमनींसुद्धां आलें नाहीं.

आनंदी व शांता जरा वेळानें जायला निघाल्या. येऊन बराच वेळ झाला होता. म्हणून त्यांना जाणें जरूर होतें. शांतेनेंही ' बसा कीं ' म्हणून उगीच लोचटपणा दाखविला नाहीं. बाहेर पडतांना आनंदी ह्मणाली;—

" शांते, आतां तूं केव्हां येशील माझा संसार पहायला ? "

" तूं बोलावशील तेव्हां ! "

" अन् इंदू, तुझ्याकडे ग आह्मीं कधीं यायचं ? " आनंदीनें इंदूला विचारलें.

इंदू कांहीं बोलली नाहीं. तिनें मुकाट्यानें मान खालीं घातली.

" मी लवकरच फिरायला जाणार आहें. दिल्लीआग्र्यापर्यंत जाऊन यायचा विचार आहे ! " आनंदीनें माहिती दिली.

" कां ? "

" आपलं उगीच. चांगलीं स्थळं आहेत तीं. पाहून यावंसं वाटलं, म्हणून जाणार आहें. तिकडून आल्यावर मी मुद्दाम माझ्याकडे बोलावणार आहें तुम्हांला ! " 'बरें तर' अशा अर्थी शांतेनें मान हालविली; कुंकू लावलें. आणि दोघींनाही पोंचविण्याकरितां दारापर्यंत गेली. आनंदी स्वतःच्या व्हिक्टो-रियांतून आली होती. ती आपल्या व्हिक्टोरियांत जाऊन बसली. आपल्या मोठेपणाची छाप टाकण्यासाठीं 'चल, इंदू, माझ्या गाडींतूनच तुला तुझ्या घरीं पोंचवितें,' म्हणून म्हटलें. पण इंदूनें नम्रपणानें नाकारलें. विशेष आग्रह न करतां आनंदीनें आपल्या कोचमनला गाडी हांकायला आज्ञा केली. तिची गाडी चालती झाली.

इंदू व शांता अजूनही दारांतच उभ्या होत्या. गाडी वळणावरून वळून दिसेनाशी झाल्यावर इंदू उद्गारली, " आपल्या अनूच्या संसाराची सुरुवात तर छान झाली, नाहीं ? "

" पण संसाराच्या सुरुवातीला ही अशी 'दिल्ली आग्र्या' करितां, आणि तेंही 'उगीचच' असा '**पैसा**' उधळूं लागली, तर अखेर साधतांना काय होईल–कोण जाणें !" शांतेनें आपलें प्रांजल मत इंदूजवळ व्यक्त केलें.

" तेंही खरेंच ! पण ताई, माझ्या घरीं 'काडीवर' ही माझी सत्ता नाहीं. सगळं आपलं बघायला ! मैत्रिणींना 'चहा' देईन म्हटलं घरीं बोलावून तर तें देखील शक्य नाहीं ! ही अशी माझ्या संसाराची सुरुवात आहे ! "

" पण हीच फार चांगली आहे !' शांतेनें शेरा मारला.

" वाः ! " इंदू किंचित् उसळून म्हणाली, " काडीवर सत्ता नाहीं, हें फार चांगलं कसं ? मघाशीं अनूनं 'चहाला' केव्हां यायचं म्हटलं, तर मला उत्तर देतां आलं नाहीं, मला अगदीं मेल्यापेक्षां मेलं झालं ! "

" इंदू, आज हें अवघड आणि वाईट वाटणं, तुझ्या भावी संसारांत तुझ्या चांगलंच उपयोगी पडेल, असं आपलं मला वाटतं. तूंच तुझा संसार आधिक सुखाचा करून दाखविशील ! "

"तें कसं ?"

"अग, 'पैसा' मिळविणं जितकं कठीण तितकाच असलेला संभाळणंही कठीण, अन् तेंच तुला करायचं आहे ! माझं बोलणं आज तुला पटलं नाहीं, तरी केव्हां तरी पटेल, अन् त्यावेळीं माझी तुला आठवण होईल. पण चल, यावर पुन्हां केव्हां तरी आपण पुष्कळ घुष्कळ बोलूं. तुझ्या माझ्या संसाराची सुरुवात कितीही अवघड असली, तरी त्यांतूनच आपल्याला पुढें सुखाचे दिवस आणतां येतील, अशी परिस्थिति आपल्याला निर्माण करावयाची आहे, ही एक लाख गोष्टींतली गोष्ट लक्षांत ठेव म्हणजे झालें."

शांता हें म्हणाली; आणि इंदूला निरोप देऊन परत घरांत आली, इंदूनें पण शांतेचा वेळ घेतला नाहीं, आणि आपलाही दवडला नाहीं.

शांता घरांत येतांच आपल्या सांसारिक उद्योगांत तात्काळ तन्मय झाली !

---

## —प्रकरण १ लें—

# मी

**प्रेमाच्या गांवा जावें । मग ऐकावें या बोला ॥**

—गोविन्दाग्रज

मी कोण ? आणि माझी ओळख करून द्यावयाची ती कां ? माझ्या ओळखीपासून जगाला लाभ–आनंद कसला ? आणि दुःखच होणार असेल, तर तें मी कां द्यावें ! लोकांनीं तरी कां घ्यावें ? असा मी कोण ? मग मी–माझें नांव, माझी ओळख–माझें चारित्र्य, वगैरे लोकांवर मी कां लादावींत ? पण खरें म्हटलें तर मला माझी ओळख करून द्यावयाचीच नाहीं. मला ओळख करून द्यावयाची आहे, ती दुसऱ्याच एका व्यक्तिची ! त्या व्यक्तिनें मला आजच्या परिस्थितीला आणून पोंचविलें आहे. त्या व्यक्तिनें मला 'मनुष्य' कोटींत आणून बसविलें आहे. त्याकरितां माझ्या दृष्टीनें त्या व्यक्तिचें चारित्र्य निदान माझ्या मनःसमाधानाकरितां तरी वर्णन करीत बसणें माझें पवित्र कर्तव्य नाहीं काय ? आतां ज्या व्यक्तिचा चरित्रपट मी पुढें मांडणार, त्याबरोबर माझाही संबंध येणार–देवाब्राह्मणांच्या साक्षिनें, 'सावधान' शब्दांच्या मंगल घोषणेंत, मंगलाक्षता माथ्यावर उधळून घेत घेत सूरसनईच्या सुस्वर आलापांच्या मधुर वातावरणांत–ज्या व्यक्तीची आणि माझी जन्माची जोडी जमली, त्या व्यक्तिच्या चरित्राशीं माझा संबंध कसा येणार नाहीं ? म्हणून तात्पुरती तरी माझी ओळख मला दिलीच पाहिजे.

मी म्हणजे कांहीं तसा कोणी अद्वितीय–असामान्य प्राणी नव्हे. कुठल्या एकाद्या इतिहासप्रसिद्ध घराण्याशीं कोणत्या प्रकारचें माझें सुतगुत जमण्यासारखें नाहीं. परंपरेचें शास्त्रीपंडितांचें 'विद्वान' घराणें, म्हणून, माझ्या घराण्याची ख्याति नाहीं, कीं, 'इनामदार–जहागीरदार' असाही उल्लेख करण्यासारखें आमच्याकडे कांहीं नाहीं. तुम्हां चारचौघांप्रमाणेंच गृहस्थबाण्याचें माझें घराणें. घरीं अष्टौप्रहर अठरा विश्वे दारिद्र्य कुलपरंपरेनें चालत आलें आहे, असें गृहस्थीबाण्याच्या जीवाला सांगायला जड जातें, म्हणून सांगायचें

नाहीं, एवढेंच. परंतु असें असलें तरी आमच्या घराण्यांत कोणाच्या हातून 'गृहस्थधर्मा'चा उपमर्द कधीं चुकून कोणाकडून झाला नाहीं, कीं त्या धर्माची पाळणूक करीत असतां दारिद्र्याच्या आणि त्यामुळें उद्भवणाऱ्या यातनांच्या कितीही वेदना झाल्या तरी कधीं त्याबद्दल हुं कीं चूं कोणीं केलें नाहीं. अशा घराण्यांतला मी.

आज मित्तीस माझ्या घरीं मी, माझी जन्मदाती, पालनकर्ती आई, माझी धाकटी बहिण विमल, पाठचा भाऊ मधुकर, आणि—आणि अशाही दारिद्र्यांत दारिद्र्याची सहभागी होऊन आलेली माझी सहधर्मचारिणी—एवढीच काय ती मंडळी आहेत. आई गृहकृत्यें, आणि 'देवदेव' करण्यांतच सारा दिवस निमग्न असते. मधुकर आणि विमल शाळेंत जातात. मी—माझी शाळा, माझें कॉलेज, माझा अभ्यास, माझी विद्यार्थी दशा—चट्सारी संपली असून किंवा संपवावी लागली असून आतां संसाराच्या प्रत्यक्ष विद्यालयांत प्रॅक्टिकल शिक्षण घेण्याकरितां नुकतांच प्रविष्ट होत आहें. चिमण्या शाळेच्या जगांतला सात्त्विक आनंद केव्हांच निघून गेला आहे. 'कॉलेजलाईफ'—केवळ कल्पनेचेंच साम्राज्य, आणि त्या साम्राज्याच्या स्वर्गीय सुखावर चालणारी काल्पनिकच पण अनियंत्रित आणि अप्रतिहत सत्ता, आज कुठल्या कुठें लोपली जाऊन वस्तुस्थितीच्या उन्हाचे चटके वरून अंगाला बसण्याचे, खालून तळपायाला झोंबण्याचे सध्यांचे दिवस आले आहेत. ते सहन केल्याशिवाय सुटका नाहीं. त्यांतून धीर धरून जिवंत राहण्याखेरीज गत्यंतर नाहीं. हें सहन न होऊन परलोकच्या प्रवासाची तयारी माझ्या भावनाप्रधान मनानें केलीही असती, तितकें तें उतावळें, आणि अविचारी आहे. पण प्रश्न माझ्या एकट्याचा नाहीं. माझी आई आहे. दोन अजाण भावंडें आहेत, आणि—आणखी कुणी तरी माझ्या अशा दारिद्र्यांतही माझ्या हृदयसिंहासनावर येऊन बसलें आहे. त्या 'कुणाकरितां' तरी हृदयसिंहासनाला हात लावतां येत नाहीं. मी आणि माझ्यावर अवलंबून असणारे चार जीव जगविण्याकरितां मला मरतां येणें कसें शक्य आहे? व्यवहारी जगाचा परमेश्वर पैसा असतो, हें आतां मला कळूं लागलें आहे. कॉलेजांत असतांना पैसा मिळविणें म्हणजे महिन्याच्या महिन्यास वडिलांनीं आपलें पोट मारून पाठविलेल्या ठरलेल्या तारखेस मनिऑर्डरीची फक्त मार्गप्रतीक्षा करणें होय, एव-

ढेंच मला माहीत होतें. पैसा 'पोस्टमन' देतो, यापेक्षां तो जास्त मिळविण्याची कल्पना माझी कॉलेजांत असतांना तरी खास नव्हती. आणि ईश्वरी कोपानें वडिलांच्या जिवावर असा मध्यंतरींच घाला घातला नसता, तर कॉलेजमधलें माझें सुखस्वप्न लवकर संपलेंही नसतें. पण माझ्या दुर्दैवानें मला अवेळींच झोपेंतून जागें केलें. स्वप्न संपविलें. आणि पोस्टमन पैसा देत नसून पैशाची प्राप्ति कांहीं विलक्षणच मार्गांनीं करून घ्यावयाची असते, याची जाणीव आतां होत आहे. आतां डोळे उघडल्यावर असें दिसायला व वाटायला लागलें आहे कीं, माझे वडील अवघ्या चाळीस पंचेचाळीस दरमहाच्या मिळकतीवर जन्मभर राबले कसे ? तेवढ्यांत त्यांनीं वाढता संसार सुखाचा केला कसा ? त्यांतूनच काटकसर करून माझ्या कॉलेजच्या शिक्षणाची तरतूद केली कशी ? आणि आतां हें सर्व माझ्या अंगावर येऊन पडलें—अवेळीं—अर्धवट स्थितींत, व कांहींशा अज्ञानावस्थेंतच मी असतांना हें सर्व चालवावयाचें कसें ? चालवायला करावयाचें काय ?

वयानें, ज्ञानानें, अनुभवानें मी तसा लहान असतांनाही मला परिस्थितीनें आज मोठा ठराविला. मी इकडे तिकडे पोरकटासारखा वागतों असें दिसलें कीं, माझी आई कळवळा येऊन, डोळ्यांतलें पाणी डोळ्यांत सांठविण्याचा प्रयत्न करीत, भरलेला कंठ—माझ्यापासून लपविण्याचा खटाटोप करीत मला जवळ घेऊन म्हणते;—

" वामन, तुला आतां जगांत असं पोरकटपणानं वागून चालायचं नाही. तूं आतां घरचा कर्ता पुरुष आहेस. तुझ्यावरच साऱ्या घरांतल्या मंडळींचा भार आहे. मग तूं असं पोरकटपणानें, बेजबाबदारासारखा वागून कसं चालेल बरें ? संसार तुझा आहे. आपल्या घरीं काय आहे, काय नाहीं, घरांत कसं वागायला हवं, हें जर तूं पाहिलं नाहींस, तर कसं होईल सांग बरं ? तूं जर असं कसं तरी वागायला लागलास, तर माझ्या जिवाला काय वाटेल, किती यातना होतील, याचा विचार तुझ्या मनांत असायला नको का बाळ वामन ! तूं इतक्यांत संसारांत पडूं नयेस. तुझे हे उडण्या बागडण्याचे—स्वच्छंदानें हौसमौज करण्याचे दिवस खरं म्हटलं तर तुझे ! पण करायचं काय ? देवाच्या मनांत तसं सुख तुला उपभोगूं द्यायचं नव्हतं, त्याला कोण काय करणार? ज्यांचे ते संसारभार घ्यायला होते, केवढी तिकडची हौस, केवढी उमेद,

किती दांडगी महत्त्वाकांक्षा; नेहमीं ह्मणायचं कीं, मी हाडांचीं काडं करीन, पण माझ्या मुलामाणसांना सुखासमाधानांत वाढवीन. माझ्या वामनाला उत्तम शिक्षण देईन, त्याला अमूक बनवीन, तमुक झालेला पाहीन, एक नी दोन; पण—पण—देवाच्या मनांत तें नव्हतं आणखी—" याच्या पुढं आई कांहीं बोलत नसे. तिला बोलवतच नसे. आंतून अंतःकरण भरून येई. ओंठ नुसतेंच हलत. अखेर डोळ्याला पदर लावी, मान एकीकडे वळवी, आणि तो विषय तितकाच त्यावेळीं थांबे ! मला कसेसेंच होई.

माझी भावंडें—मधुकर आणि विमला, सकाळीं जामानिमा करून शाळेला जायला निघतात. पाटीपेन्मील, दप्तरें, बस्करें, घेऊन काखोटीला पिशवी अडकवून माझ्या पुढें येतात, आणि मला म्हणतातः—

" भाऊ, आह्मांला 'फी' हवी आहे. आणखी गॅदरिंगची वर्गणी पण आजच हवी आहे. ती पण आजच दे अं ! आणखी आह्मांला नवे कपडे केव्हां करायचे बरं ? मला एक तरी कोट नीट आहे का ?—विमलला एक तरी चांगली परकरचोळी नको का ? वर्गांत आह्मीं बसलों ह्मणजे आमचे हे कपडे कसेसेंच दिसतात बघ ! शेजारच्या मुली हंसतात आमच्याकडे पाहून. मग आह्मांला रडायला येतं !—मग केव्हां करणार कपडे ?-आज ? संध्याकाळीं ! —फी केव्हां देणार ? आज फी आणखी गॅदरिंगची वर्गणी दिल्याशिवाय आह्मीं मुळीं शाळेलाच जात नाहीं ! "

माझीं भावंडें माझ्यापुढें येऊन असें म्हणतात. त्यांचा त्यांत कांहीं दोष असतो का ? त्यांचा अपराध असतो का ? मी माझ्या लहानपणीं आईजवळ आणि वडिलांच्याजवळ असाच नव्हतों कां हट्ट घेऊन बसत ? वडिलांना किंवा आईला त्या माझ्या हट्टानें किती त्रास होत असेल, किती कष्ट वाटत असतील, त्याची कल्पना जरा तरी मला त्यावेळीं होती का ? तसा विचार करण्याची शक्ति किंवा जरूरी तरी मला कधीं वाटली का ? मग तोच न्याय, माझ्या भावंडांच्या आतांच्या मजजवळच्या वर्तनाला लावायला नको का मला ? भावंडें हट्ट घेऊन रागवून, रुसून बसतात, म्हणून मी त्यांच्यावर रागवूं कसा ? डोळे वटारूं कसा ? किंवा तुह्मांला सहाय्य करण्याची ताकद माझ्यांत नाहीं, असें दीनवाणीनें कोणत्या तोंडानें त्यांना सांगूं ? त्यांच्यासमोर डोळ्यांत

पाणी तरी कसें आणूं ? तें कांहीं नाहीं; त्यांचा हट्ट मला पुरविलाच पाहिजे. त्यांना जरूरीच्या जिनसा मला घेऊन दिल्याच पाहिजेत. मला माझ्या शक्तीच्या बाहेर असले तरी त्यांचे लहान मोठे लाड पुरवितां आलेच पाहिजेत. असें वाटण्याइतका मी माझ्या लहान भावंडांजवळ मोठा झालों होतों!

आतां राहतां राहिलं आणखी एक माणूस! परक्या घरचें घरीं आलेलें. जन्माची सांगातीण झालेलें! आपण होऊन अगदीं प्रीतिविवाहासारखा विवाह घडून आलेला! माझी कॉलेज करीअर डोळ्यांत भरली होती, कीं माझा साधासुधा दिनक्रम मनांत ठसला होता, कीं माझ्या आयुष्याचें भावी वैभव अगाऊ दिसलें होतें, म्हणून माझी जन्माची सोबतीण आपण होऊन आपखुषीनें माझ्या घरीं आली होती, हें मला सांगतां येणें कठीण आहे. त्या परक्या घरच्या माणसाची जबाबदारी एकप्रकारें घरच्या माणसांच्यापेक्षांही अधिक नाहीं का ? त्या माणसाचा विचार करावयाचा, त्या माणसाकडे पाहायचें, त्या माणसाशीं विचारविनिमय करावयाचा, त्या माणसाला धीर देऊन समाधानांत ठेवावयाचें, हें तर कर्तव्य ह्मणूनच केलें पाहिजे. किती खडतर कर्तव्य हें! आणि तें आजच माझ्या नशीबीं कां बडवावें ? माझ्या आयुष्यक्रमाची अशा प्रकारची सुरुवात म्हणजे माझें पुरेपूर दुर्दैवच नव्हे काय? अशा संसारांत मला, किंवा माझ्याकडून मजवर अवलंबून असलेल्या मंडळींना सुखाचा लवलेश कसा मिळावयाचा ? संसारांतलीं बहुतेक सर्व सुखें, सर्व प्रकारचें स्वारस्य, सर्व प्रकारचें समाधान, सर्व प्रकारचें प्रोत्साहन एका पैशावर अवलंबून, आणि त्याचा तर माझ्या घरीं ऐन दुपारचा उन्हाळा! त्या उन्हाळ्याचा सुखदायी पावसाळा, रमणीय हिंवाळा कसा, कोणी, कधीं, करावयाचा? माझ्या हातून तें केव्हां व्हावयाचें ? माझा मलाच विश्वास नाहीं. माझा मलाच धीर नाहीं; इतकेंच काय पण माझा मला पोंच नाहीं. अशा स्थितींत मी काय करावयाचें ? मी कुणाच्या तोंडाकडे पहावयाचें ? माझ्या घरीं मी सर्वांना सांवरून धरावयाचें, सर्वांची समजूत मी घालावयाची, पण माझी समजूत कोण घालणार ? मला संभाळून कोण घेणार ? माझा अकालीं आलेला मोठेपणा कोणाजवळ विसरतां येणार ?—

पण सांगण्यासारखी गोष्ट, दैवाची खैर, कीं, अशाही परिस्थितींत मी

माझा मोठेपणा विसरून जावा, आशेनें धीर येण्याकरितां कोणाकडे तरी पहावें, कोणाच्या तरी प्रेमळ दृष्टीच्या प्रकाशकिरणांचा लाभ आशेला नवांकुर फुटण्यांत करून घ्यावा, असेंही स्थान परमेश्वरानें मजकरितां तयार करून दिलें होतें. आणि तें म्हणजे–पण तें मीच, आणि माझ्याच तोंडानें सांगायला पाहिजे का? मी सांगितल्या खेरीज कोणाच्या ध्यानांत यावयाचेंच नाहीं का?

वात्सल्याच्या ओथंबलेल्या शब्दांनीं माझी आई माझ्या जबाबदारीची जाणीव जशी मधून मधून देत असे, भावंडें अजाणतांच माझा मोठेपणा माझ्या गळ्याला जसा बांधीत असत, तसाच प्रसंग माझी सहधर्मचारिणी अगदीं सरळ सरळ असा कधींच आणीत नसे. तिची तऱ्हा आपली न्यारीच! माझ्या अर्ध्यावाट्याच्या हक्कधारणीची माझ्याशीं वागण्याची रीति अशी असायचीः–

स्वतः नेहमीं हंसतमुख आणि आनंदी असायचें! आपल्या हंसण्यानें आणि आनंदानें दुसऱ्यांनीं हंसलें पाहिजे, आनंदीत झालें पाहिजे, असें वागायचें. कशाची, कोणावर कधीं तक्रार असायची नाहीं. कोणाबद्दल कसली कुरकुर चालावयाची नाहीं. हें नको, तें पाहिजे, आज असें करायचें, उद्यांला तमुक झालें पाहिजे, अमूक केलें तर ठीक, फलाणें झालें तर माझ्या नाहीं कामाला यायचें, याचा कधीं वर्तनांत, बोलण्यांत मुद्दापत्तामुद्धां नसायचा! असें केलें असतें तर? दुसऱ्याचें मुळीं ऐकायचेंच नाहीं. अशानें कसें होणार! दुसऱ्याला सुख द्यायची ताकद नव्हती, तर संसाराचा सोस हवा होता कशाला! असें उपरोधिक उणें कधींही बोलावयाचें नाहीं. कुठल्याही व्यक्तिबद्दल, जिन्नसाबद्दल, परिस्थितीबद्दल, तिरस्कार किंवा तुच्छता नाहीं. लहान किंवा मोठा कसलाही प्रसंग असो, त्यांत वाटेल तेवढा त्याग दाखविण्याची पूर्ण तयारी. अंतःकरणाची तशीच कल्पना द्यावयाची तर,--आपलेंपणानें म्हणून अतिशयोक्तीनें सांगतों, असें समजूं नये, पण–' लोण्याहूनी मऊ–वज्राहूनी कठीण ' असा प्रत्यय आणून देण्यासारखें अंतःकरण, यामुळें मात्र वेळोवेळीं माझीच चलबिचल उडावयाची. मी हा असा, आणि माझी सहधर्मचारिणी ती अशी! माझी चलबिचल झाल्याखेरीज कशी राहणार? तिच्या न मागण्यानें, तिच्या आनंदी वर्तनक्रमामुळें, तिच्या निरलसतेमुळें, तिच्या मधुर बोलण्यामुळें मी थिजून जाई कीं काय, हें जरी सांगतां आलें नाहीं, तरी माझी जबाब-

दारी फार–फार मोठी आहे, ती मला पाळलीच पाहिजे, कोणत्याही प्रकारची तक्रार–कुरकुर न करतां पाळली पाहिजे; आणि आनंदानें, उत्साहानें, उल्हासानें, त्या परिस्थितीला तोंड दिलें पाहिजे; असा प्रकाशमात्र डोक्यांत एक सारखा पडलेला असावयाचा! माझी अर्धांगी मला कांहीं मागत नाहीं, म्हणून तिनें कांहीं तरी मागितले पाहिजे, आणि मला तिची मागणी पुरी करतां आली पाहिजे, असें मनाला वाटूं लागे. अर्धांगी कसला कधींच हट्ट घेत नाहीं; तर माझें मन मलाच विचारूं लागे कीं, 'अर्धांगीनें तुझ्याजवळ कसला हट्ट कां घेऊं नये?' पण तें सर्व मनांतल्यामनांतच चाले. त्याची वार्ता अर्धांगीच्या कानापर्यंत जाणें शक्य नसे. ओंठाच्या बाहेर शब्द पडायचीच मुळीं मुष्कील ना?

असा सर्वस्वी निश्कांचन मी–अशा तऱ्हेचा माझा परिवार; त्यांत दिवस हे असे. आधुनीक अर्धवट शिक्षणानें माझ्या पुष्कळशा कल्पना बदलत गेलेल्या लहानमोठेपणाच्या; मानापमानाच्या वेड्यावांकड्या उगाचच कल्पना मनांत घुसून बसलेल्या, आणि वस्तुस्थिति तर अशी घरांतल्या मंडळींना जगवायचें कशावर? घरांत चिमूटभर धान्य नाहीं. गांठीला एकही पैसा नाहीं, किंवा खरेंच सांगावयाचें तर वडिलार्जित मिळकतींपैकीं आजवर पोटासाठीं आणि माझ्या शिक्षणासाठीं किडुकमिडूक सुद्धां मोडून खाऊन संपल्यामुळें खरोखरीचा तांब्याचा एकच पैसा शिल्लक राहिलेला. जगायचें कसें? पोट भरायचें कसें? जगवायचें कसें? पोटें भरायचीं कशीं? वडिलार्जित शिलकीच्या एकाच पैशानें काय होणार? पण समजा, त्या एकाच पैशाचे डाळे कुरमुरे आणून एके ठिकाणीं बसून आम्हीं घरांतल्या मंडळींनीं एकदांच फांकले! मग पुढें? पुढें काय करावयाचें?

या पेंचांत परमेश्वरानें मला पकडलेलें. आई देवाच्या पुढें बसून डोळ्यांतून अश्रु गाळते आहे. 'माझ्या वामनाचें कसें होणार?' ह्मणून मनोमन त्याला प्रश्न विचारते आहे. लहान भावंडें; त्यांना काय? तीं निःशंक मनानें शाळेंतून येतांच मनसोक्त आंगणांत उडताहेत. माझें किंवा आईचें तोंड वाईट दिसलें, तर त्यांनींही तोंड गोरेंमोरें करायचें, आणि गपचिपपणानें मजजवळ किंवा आईजवळ येऊन गळ्यांत चिमुकल्या हातांचा विळखा घालून बसावयाचें,

एवढेंच त्यांना ठाऊक !--आणि माझी अर्धांगी ? तिचा मुखचंद्र अशा वेळीं देखील शांत-गंभीर-आणि उल्हसित ! त्याकडे पाहिलें तर जणूं काय असेंच तिचे डोळे बोलत असावेत असे वाटे कीं, " अंः ! त्यांत काय आहे ? हें चालायचेंच ! हा चक्रनेमिक्रम असाच असायचा ! ही कठीण वेळ अशीच राहणार आहे थोडीच ! उद्योग करूं, तर ही वेळ बदलण्याचें आपल्याच हातांत आहे. त्यांत इतकें वाईट तें वाटून कशाला घ्यायचं ? नी धीर तो कशाला सोडायचा ? " आणि खरेंच तें ! मलाही तें मनोमन बेटं पटत असे ! मग कां कोण जाणें ! हें मलाच पटत असे, असें नव्हें, तर माझी आई देखील आपल्या सुनेविषयीं बोलतांना सहज पण असेच उद्गार काढी " माझी सूनबाई खरीच शांतादेवी आहे ! "

माझीं भावंडें पण आपल्या वहिनींच्या अंगाखांद्यावर लडिवाळपणानें खेळतांना उद्गारतात, " शांता वहिनीं आमची किती चांगली आहे ! "

मग मला काय वाटत असेल ? मी कसला विचार करीत असेन, मी किती अभिमान बाळगीत असेन ? ज्या कोणास अजमावण्याची इच्छा असेल त्यांना मी एवढेंच सांगेन, एरव्हीं तुह्मांला त्यांतलें कांहीं कळायचें नाहीं. आणि पटायचें नाहीं; त्याकरितां तुम्हीं " प्रेमाच्या गांवा जावें, मग ऐकावें त्या बोला ! " म्हणजे तें पटेल. यापेक्षां या वेळीं मी तरी जास्त काय सांगणार ?

---

—प्रकरण २ रें—

# माझे मित्र

**कोणी आगगाडिमधले सारेच कीं सोबती**

—मुकुंदराय

मला कळूं लागल्यापासून आजवर माझे किती सोबती झाले असतील. पहिल्यांदा ज्याच्याबरोबर ' श्रीगणेशा ' शिकायला शाळेंत गेलों तो आमचा शेजारचा माझ्याबरोबरचा गंपू. त्यानंतर माझी मुलामुलांत मारामारी होऊन माझी भांडणांत बरोबर बाजू आहे असा निकाल देऊन माझ्या तर्फेनें प्रतिपक्षाशीं त्या वेळीं कडाक्याचें भांडण करून माझ्याशीं स्नेहसंपादन करणारा सदाशिव. तसाच कुणाच्याशा लग्नांत वऱ्हाडी म्हणून गेलों असतां आमच्याशीं उगाच्याउगाच खेळीमेळीनें वागूं लागलेला, आणि पंक्तीवर कविता ह्मणण्यांत माझी त्याच्यावर ताण झाली असतांही माझी पाठ थोपटून ' दोन दिवसाची लग्नांतल्या जिलब्या लाडूं'ची संगती करणारा ' धोंडू. ' त्यानंतर कॉलेजांत मोठेपणीं शिरल्यावर, अभ्यासानें बरोबरीचे म्हणून, रेसिडेंसीच्या रूममध्यें, किंवा जवळच्या रूममध्यें राहावयास मिळाल्यानें वरचेवर बोलण्याचालण्याचा, फिरावयाला वगैरे जाण्याचा प्रसंग आल्यानें साहजीकच सोबत्याच्या सदरांत येणारे विश्वनाथ आणि जगन्नाथ. एक कीं दोन. नीटशीं मोजदादही त्या स्नेही मंडळाची करतां येणें अशक्य झालें होतें. तोंड ओळखीचा—जरासा जानपछानीचा झाला, चारचौघांत बोलतांना एकादा एकदोन आपल्यासारखे शब्द बोलला, कीं झाला आपला स्नेही. स्नेही झाला कीं आपण त्याच्या घरीं जाऊं लागावयाचें, आपल्या घरीं त्याला वरचेवर आणावयाला लावायचें. बरोबर फिरावयास जाऊं लागावयाचें. एकजुटीनें अभ्यास करूं लागण्याचा आव घालावयाचा. ' सर ' किंवा ' प्रोफेसर' यांच्या घरीं किंवा बंगल्यावर खाजगी रीतीनें मुलाखतीला जाण्याचे प्रसंग साधावयाचे.

म्हणजे त्यापैकीं कोणाला तरी हाताशीं धरण्याकरितां तेवढ्यापुरतें कोणाला तरी स्नेही बनवावयाचे, किंवा कोणाचे तरी स्नेहि बनावयाचें --याप्रमाणें जिकडे तिकडे, जेथें तेथें, व जो तो एकमेकांचा स्नेहीच. हा कोण क्रिकेटपटु म्हणून स्नेही. हा कोण ? आपल्याला चारचौघांत बरें म्हणतो म्हणून स्नेही. तो कोण केवळ आपल्याला आवडतो तसा पोषाख करतो, वागतो, वावरतो म्हणून दोस्त. तो दुसरा 'डिबेटिंग क्लब'मध्यें उत्तम रीतीनें बोलतो म्हणून जिवलग. तमका भारी विनोदी. सहज जातां जातां वाटेल तशा कोलांटीच्या कोट्या करून हंसतां हंसतां मुरकुंडी वळायला लावतो म्हणून जीवाचा जिगर. नुसता 'चहाचिवड्या'पुरता, जेवायला येण्या जाण्यापर्यंत मजल मारलेला, वेळीं अवेळीं बसायला येणारा, प्रथमत' अहोजाहो म्हणून शेवटीं अरेतुरेवर आणि पुढें पुढें तर लेकावेट्यापर्यंत मजल नेणारा, तो लंगोटी यार. अशा रीतीचे जगभर सारे स्नेहीच स्नेही ! "मित्र चमू ज्याचा मोठा ! त्या आनंदा ना तोटा !" ही कोणा शाहण्याची उक्ति जशी कांहीं अक्षरन् अक्षर खरी असलेलीं ! मग असा ज्याचा आपल्या स्नेह्यांचा दांडगा परिवार, तो केवढा धन्य ! केवढा सुखी नव्हे काय ? खरेंच असें असावयाला, किंवा दिसावयाला पाहिजे यांत काय संशय ? पण तसें कोठें दिसून येत नाहीं, हीच दुःखाची गोष्ट होय. हें सारें कुठपर्यंत भासमान होत असतें ? तर प्रसंग पडला नाहीं तेथपर्यंत ! आणि तसा प्रसंग पडावयाचा म्हणजे डोक्यावर सांसारिक जबाबदारी पडल्यावर. कोणाला लवकर तर कोणाला उशीरा, हा असा प्रसंग येतोच येतो. संसारांत पडलेल्या प्रत्येकाला त्या प्रसंगाची गोड-कडू जशी मिळेल तशी सलामी घ्यावी लागतेच लागते, असें पुष्कळ म्हणतात; पण दुसऱ्याच्या सांगण्यावर भरंवसा कोण धरणार ? स्वतःला अनुभव आल्यावांचून, स्वतःच्या पायाला प्रत्यक्ष ठेंच लागल्याशिवाय स्वतःला पटावयाचें कसें ? स्वतःला कळ यावयाची कशी ? बोलण्याच्या ओघांत माझे वडिल संसारांतल्या निरनिराळ्या प्रसंगांचे दाखले देत असत, अनुभव सांगत असत; त्यांची त्यांनीं ऋणानुबंधी म्हणून जी मंडळी म्हटली होती, त्यांच्याशी कसें वर्तन असें हें मी अनेक वेळां पाहिलेंही होतें. आपल्या मित्रांविषयीं अनुदार उद्गार मी केव्हांही बाबांच्या तोंडून आलेला ऐकला नव्हता; किंवा घरीं आलेल्या कोणाही

मित्राच्या सरबराईंत यथाशक्ति वागतांना कसूर किंवा आंगचोरपणा केला नव्हता. तरी पण त्याच्या उलट उत्सुकतेनें आपण होऊन बाबा आपल्या मित्राकडे गेले आहेत, चार आठ दिवस राहिले आहेत, आणि मित्राला आपल्या करितां खार लावला आहे, असें फारसें नव्हे—मुळींच झाल्याचें निदान माझ्या तरी स्मरणांत नाहीं. आपल्या घरीं कोणी आलें म्हणजे बाबांना मनस्वी आनंद झाल्याचें निदर्शनास येई. ते अगदीं उचंबळून येत. घरच्या कोंड्याचा मांडा माझ्या आईला बाबा आपल्या स्नेह्यासोबत्याकरितां करावयाला लावीत; पण तेच बाबा आपल्या इष्टमित्राकडे जायला तितकेच नाराज—नाखुष असत. उदास असत. त्यांच्या अशा वृत्तीचा छडा लावण्याच्या भानगडींत कोणी फारसे पडले नाहींत, आणि त्यांनीं होऊन सहज बोलण्याच्या ओघांत त्याचें स्पष्टिकरण केलें, तर त्याचा ठसा कोणाच्या मनावर फारसा उमटला नाहीं. माझ्या मनावर त्यावेळीं तर त्याचा परिणाम असा कधीं झालाच नाहीं, असें सांगणें भाग आहे. बाबांचें बोलणें जरा चमत्कारिक वाटलें तर मी उलट मनाशींच हंसत असे. पण—आज—आज व्यवहारी जगांत पहिलें पाऊल टाकलेला मी, मित्रांच्या जगाकडे—बाबांच्या आणि माझ्या मित्रांच्या जगाकडे पहातों आहें, तर तें जग मला आतां किती तरी निराळें दिसतें आहें. 'कुणी कुणाचा नाहीं वेळीं स्वार्थी जग हें नटलें,' हाच कोणा वेड्याचा उद्गार माझ्यापुढें नाचतो आहे !

माझे लहानपणचे मित्र आज कुठें आहेत ? मोठेपणचे मित्रांची हालहवा काय आहे ? मी ज्या मित्रांची आस्थेनें, हौसेनें, कर्तव्य म्हणून, जरूरी म्हणून आठवण करीत आहें, त्या मित्रांच्या अंतःकरणांत मजविषयीं स्मृतीचा लव-लेश तरी असेल काय ? असेल तर तो बरा—कीं—वाईट ? आदरणीय कीं तिरस्करणीय ? मला शक्य तो उपयोग करून देण्याकरितां कीं माझा उपयोग करून घेण्याकरितां ? याचा आतां माझा मलाच उलगडा होत नाहीं. अमक्या मित्राचें स्मरण करावें त्याच्याविषयीं काहीं कल्पना मनांत आणाव्यात, त्यावर लगेच साधकबाधक गोष्टींची उभारणी करावी, आणि शेवटीं त्या मित्राच्या मूर्तीला 'कांहीं तरी' एक मत त्या विषयीं ठरून बाजूला करावें; असें करतां करतां शेवटीं अफाट मित्रांच्या समुदायांतून—समुद्रांतून मनाला पोहून आणून

समुद्रांतून पोहून येऊनही अखेर कोरडा तो कोरडाच, असा प्रत्यय मनाला यावा, असें चाले.

'मित्र हा मैत्रीकरितांच, व्यवहाराकरितां नव्हे' हें तत्त्व मनापुढें जोरदार रीतीनें येऊन विषण्ण मनाचें समाधान सुसंकृतता करूं लागे, तर तयार होणारें व्यवहारी मन उलट असा प्रश्न करी, ज्याचा व्यवहारांत काडीमात्र उपयोग नाहीं, त्या मित्राची मैत्री काय चाटायची आहे ? मी व्यवहारी जगांत पहिलें पाऊल टाकलें, किंवा मला टाकावें लागलें, त्यावेळीं मी माझ्या सभोंवतालच्या जगाकडे याच आशेच्या नजरेनें पहात होतों. लहानपणापासूनचे मित्र म्हणून ह्मटलेली अनेक मंडळी कोणत्या ना कोणत्या कारणांनीं मजपासून अलग झालेली होती. एकदां दूर झालेला, दृष्टिआड गेलेला स्नेही मला भेटला नाहीं, कीं त्याच्यासंबंधाची पूसतपास करण्याचेंही मला झालें नाहीं. आज घटकेला माझे जवळचे किंवा लांबचे ह्मटलें तरी स्नेही दोनच. एक विश्वनाथ, आणि दुसरा जगन्नाथ. अजून त्यांना मी स्नेही ह्मणतों. तेही त्याच नात्यांनीं मला ओळखतात. कॉलेजमध्यें असतांना त्यांचें माझें अनेक कारणांनीं संघट्टन झालें आहे. तें अजूनही त्याच स्थितींत आहे. मी त्यांच्याकडे वारंवार जातों, मी नाही गेलों चारदोन दिवस तर ते मला शोधून काढून-ओढून घेऊन जातात. माझ्या घरीं मात्र मी त्यांना सहसा आणण्याच्या भानगडींत पडत नाहीं. ओळखीच्या सुरुवातीला एकदोन वेळां माझ्या घरीं आणण्याचा मोह मला झाला होता, त्यांनाही येण्याविषयीं उत्सुकता झाली होती; पण कोणत्या कारणांनीं कोण जाणें,त्यांनीं माझ्या घरीं येऊं नये,असेंच मला वाटलें;व थोडाशी उदासीनता दाखवून मी तें खरोखरीच टाळलें. आणि एकदां जें झालें, तें कायमचेंच होऊन बसलें. वामनाच्या घरीं गेलें पाहिजे असें कोणी नंतर ह्मटलेंही नाहीं. नाहीं म्हणायला माझ्या लग्नाच्या वेळीं काय माझी मित्रमंडळी माझ्या घरीं आली असतील तेवढीच. नंतर सदासर्वकाळ मीच त्यांच्याकडे असायचा. मग मजकडे येणार कोण ? माझ्याकडे वरचेवर माझ्या मित्रांनीं येऊं नये, असें वाटावयाला लागणाऱ्या अनेक कारणांत मुख्यतः माझी गरीबीच असावी असें मला वाटतें. माझ्याकडे न येण्यांत मित्रांची अनुत्सुकता कां याचा मात्र विचार मी कधीं केला नाहीं.

तुलेनेनेंच नव्हे, तर जगन्नाथ किंवा विश्वनाथ या माझ्या दोन मित्रांच्या घरची स्थिति खरोखरीच चांगली. त्यांना खाण्यापिण्याची ददात नाहीं. संसाराची विवंचना नाहीं. त्यांच्या सुखांत कमतरता येण्यासारखेंही कांहीं त्यांच्याकडे कमी नाहीं. विश्वनाथापेक्षां त्यांतल्यात्यांत जगन्नाथाची स्थिति अधिक चांगली. जगन्नाथ जितका बोलका, तितकाच जवळ जवळ विश्वनाथ घुम्या. जगन्नाथाचा झोंक वागण्यासवरण्यांत जरा ऐषआरामी—आपली श्रीमंती जगाला दिसावी या रीतीचा. तर विश्वनाथची वागण्याची रीति डोळ्यांत ताबडतोब न भरण्यासारखी. कॉलेजांत असतांनापासूनची दोघांविषयींची ख्याति म्हणजे जगन्नाथ उधळ्या म्हणून तर विश्वनाथ चिक्कू म्हणून. त्यामुळें जरी नाहीं, तरी कां कोण जाणें, माझ्या विचारसरणींत विश्वनाथापेक्षां जगन्नाथ मला अधिक जवळचा वाटे. कधींकाळीं जरूरी लागली तर—आणि आह्मां गरीबांना तशी जरूरी हरघडी लागायचीच —तर जगन्नाथ आपला आहे. तेव्हां कोणत्याही प्रकारचें डरायचें कारण आपल्याला मुळींच नाहीं. ही जगन्नाथाविषयीं भावना जागृत असे. विश्वनाथाविषयीं त्याच्या घुम्या स्वभावामुळें कांहीं निश्चयच करतां येत नसे. त्याच्याविषयीं खात्री सांगवत नसे; एवढें खरें.

आमचा हा तिघांचा स्नेह अधिक बळकट व्हावयाला आणखी एक गमतीचें कारण घडलें होतें. माझी बायको त्या दोघांच्या बायकांची अगदीं जीवाभावाची मैत्रिण होती. त्या दोघी माझ्या बायकोला विलक्षणच मानीत असत. आह्मीं तिघे जसे कॉलेज मित्र, तशा त्या तिघी शाळेंतल्या मैत्रिणी. त्यांतून आणखी एक चमत्कार होता. माझी बायको माहेरकडून बऱ्यापैकीं, तर त्यांच्या बायका त्यांच्या माहेरच्या अगदींच गरीबींतल्या, अशी आह्मां तीन मित्रांच्या संसाराच्या सुरुवातीची परिस्थिति.

आज माझी स्थिति मात्र अशी आहे कीं, संसारशकट हांकण्याकरितां मला पैशाच्या पाठींमागें लागलेंच पाहिजे. पैसा—पैसा—पैसा! आजकाल एकच विषय ,पैसा! मी पैसा मिळविला पाहिजे. मी माझ्या कुटुंबाचें पालनपोषण केलें पाहिजे. त्याकरितां काय करावयाचें? कोठें, कोणाकडे जावयाचें? कोणाचें साहाय्य मागावयाचें, खात्रीनें कोण आपल्याला सहाय्य करील, आणि आपल्याला निश्चित करील? मित्र आपल्याला उपयोगी पडतील का? कोणता

मित्र आपल्यावरील आपत्ति जाणून ती निवारण्याकरितां धांवत येईल ?मदतीची हाक कोणाला मारावयाची ? कोणाच्या हातांत हात देऊन सुरुवातीचा खडकाळ रस्ता ओलांडण्याचा प्रयत्न करावयाचा ? एकच विचार, एकच चिंतन, आणि एकच काळजी !

संसाराची रडकथा विश्वनाथाच्या पुढें गायची ?—पैशाच्या अभावाची करुणकहाणी जगन्नाथाला ऐकवावयाची ? काय करावयाचें ? त्यांच्या पुढें रडगाणें कां गावें ? त्यांच्या पुढें संसाराची करुण कहाणी कां कथन करावी ? आणि त्यांनीं तरी कां ऐकून घ्यावी ? खरेंच, त्यांनीं ऐकून घ्यावी असे ते बांधलेले कुठें आहेत माझे ?— '

झाले; विचाराला उलट गति मिळाली, आणि मित्रांपुढें आपली ' गृहकथा ' निवेदन करावयाची नाहीं, असा मनाचा निश्चय झाला. पण कितीही निश्चय झाला किंवा केला तरी तो टिकाव धरून राहणार कसा ? जगांत एकेकटा प्राणी काय करूं शकेल? ' एकमेकां करूं सहाय्य ' असें ह्मणावयाचें तें कशासाठीं मग ? मी माझ्या मित्रांची मदत मागावयाची नाहीं, किंवा घ्यावयाची नाहीं, तर मित्रांचें प्रयोजन काय ? या मूळपदावर मला माझें मन पुन्हां पुन्हां आणून सोडी. इथून फिरून विचाराला सुरुवात झाली, लवकरच असा एखादा आडवा प्रश्न येई कीं ' समजा, आपण बत्तीशी वासून संबंध कुळकथा सांगितली, आणि सहाय्याची याचना केली, आणि इतकेंही करून मदत तर राहोच, पण नुसतें त्यांनीं तोंड वेंगाडलें, तर माझ्या याचनेचें काय झालें ? ' इतकी मानहानी, एवढी नामुष्की आणि मित्राकडून करून घ्यावयाची ? त्यापेक्षां बेहेत्तर आहे, आपण उपाशी पोटीं राहिलों तरी !" दाराला आंतून कड्या घालून घेऊन टांचा लावून आंतल्या आंत गूपचूप मरून जाऊं; पण मित्रापुढें दीनवाणीनें हात पसरणार नाहीं. तेही जगांत मोठे आहेत. मी माझ्या ठिकाणीं मोठाच आहें. ते संपत्तीनें श्रेष्ठ असतील. मी त्यांच्यापेक्षां शाहाणपणानें सरस आहें. असें आहे, तर आपण मित्रांना कसोटीला लावा कशाला, आणि फजीत होण्याचा प्रसंग आपला आपणच ओढवून घ्या कशाला ? तेव्हां, आपलें एकट्याचेंच काय व्हावयाचें असेल तें होवो, आपणच आपला मार्ग शोधावयाला लागलेलें काय वाईट !

जगांत इतरांचा अनुभव काय असेल तो मला कळणें शक्य नाहीं. पण संसाराच्या सुरुवातीस मित्रांकडून मिळणाऱ्या मदतीवर विचार करूं लागतांना माझी मात्र अशी त्रेधा तिरपीट उडाली. ' स्वतः मेल्याशिवाय स्वर्ग दिसत नसतो ' या वाक्याची सत्यता स्पष्ट होऊं लागली. मित्र जगांत नसतातच– मित्र म्हणणें म्हणजे केवळ ढोंग–नुसती दुसऱ्याची आणि आपलीही फसवणूक आहे–पण असें म्हणावें, तर माझ्या सहधर्मचारिणीच्या–माझ्या शांतेच्या वागण्याबद्दल काय म्हणावयाचें मग? तिनें अकृत्रिम, अहेतुक आपलें प्रेम–नव्हे प्रेमाबरोबर आपले आयुष्यच्याआयुष्य मला बहाल केलें. त्याकरितां गणगोतांचें प्रत्यक्ष आईबापांचें ऐकलें नाहीं. स्वतःच्या श्रीमंतीची आणि माझ्या दारिद्र्याची परवा केली नाहीं, आणि निदान एका आयुष्यांत तरी न तुटणारा स्नेह 'विवाह' बंधनानें वज्रलेप करून टाकला, त्याची मीमांसा कशी करावयाची? आयुष्याचा सोबती शांतेनें मला निवडलें; माझ्या कित्येक मित्र म्हणविणारांनीं त्या माझ्या परमभाग्याबद्दल कित्येक वेळेला माझा हेवा–मत्सर केला, तें काय शांतेनें स्वतःला आणि मला फसविलेंच म्हणावयाचें? तिचें हें ढोंगच म्हणावयाचें? माझ्याशीं दारिद्र्याबरोबर झगडायला सदासर्वकाळ सज्ज असते, माझा चेहरा कुठल्याही प्रसंगीं चिंतातुर दिसूं नये, असें ती स्वतः वागते, स्वतःचा चेहरा सदासर्वकाळ मी सुखी राहावें, आनंदांत राहावें म्हणून हंसतमुख ठेवतें, तें काय सर्व औपचारिकच?

मनाचा केवढा गोंधळ उडून जातो आहे हा! शांतेकडे पाहिलें म्हणजे ' मित्र ' म्हणजे काय? तो कसा असतो, कसा दिसतो, कसा वागतो, कसा वागवितो, याचें मूर्तिमंत चित्रच डोळ्यापुढें उभे राहातें. आणि ' मित्र जगांत नसतात,' हें धाडसी विधान करण्याची छातीच होत नाहीं. जीभ तसे म्हणायला धजत नाहीं!

मी पैसा मिळविण्याच्या उद्योगासाठीं दररोज सकाळीं बाहेर पडतांना आई प्रेमळ आशीर्वाद देते. मधुकर आणि विमला ही भावंडें ' भाऊ, तूं कचेरींतून केव्हां येणार? ' म्हणून गोड शब्दांनी विचारून मी ऑफिसर व्हावें, पैसा मिळवावयाला लागावें, अशी सदिच्छा प्रकट करतात. शांता डोळ्यांतल्या स्थीर

पण तेजस्वी तेजानें दर्शविते ' जा, पुढें पाऊल टाका, कचरूं नका, यशोदेवता तुह्मांला वाटेंतच भेटेल. '

वाटेंतून जातांना विश्वनाथ भेटला, नमस्कार चमत्कार झडला, ह्मणजे, तो घुम्या अगदीं आपल्या मोजक्या शब्दांतच विचारतो, " काय वामन, निघालास उद्योगाच्या शोधाला ? हं ऽ! "

त्याचप्रमाणें दिवसभर फिरून फिरून रंजीस येऊन—धुळीनें मळलेल्या कपड्यानिशीं, घामानें डबडबलेलें दीन असें तोंड करून मी परत घराकडे जातांना, सहज चैनीनें ऐषआरामी पोषाख करून रंगेलपणानें निघालेला जगन्नाथ भेटला, तर तेवढ्यांत मी केलेला नमस्कार घेत घेत "कां, आजही नाहीं लागली वाटतं तुझी कुठं वरणी ? काय तुझें नशीब तरी खट्याळ आहे रे ! तुझ्यासारख्या सद्‌गुणी आणि हुशार माणसाची अशी दैना उडावी, हें किती चमत्कारिक आहे ! जगच बेटं दुष्ट आहे. तूं, तुझा संसार, तुझा परिवार, कसं व्हायचं तुझें ! मला जर शक्य असतें, तर तुझ्यासारख्या हुषार जिवलगाला कधीं सोडला नसता. माझ्या घरीं मी नोकरी दिली असती तुला. पण जुनं खोड बाबांच्या वेळेपासूनच आहे, तें काढतां येत नाहीं; त्यामुळें सारी पंचाईत आहे ! असं होतं बघ—"

असें म्हणून तो चालायला लागतो. मीही जड पावलांनीं आज ' पैसा ' मिळवायची सोय कुठें लागली नाहीं, म्हणून रंजीस होऊन घर जवळ करण्याच्या नादांत असतों. अशा वेळीं मी आणि माझे मित्र याविषयीं माझ्या मनांत आणखी कोणकोणते विचार चालत असतात, ते सर्व मला सांगतां येणें शक्य नाहीं.

---

## —प्रकरण ३ रें—

# ‘ पाहिजे ’

**पोट मोठें अनिवार । हिंडवितें दारोदार**

**—तुकाराम**

नित्याचा माझा सध्याचा उद्योग ह्मणजे ‘ टाईम्स ’ ‘ केसरी ’ ‘ नवाकाळ ’ वगैरे इंग्रजीमराठी वर्तमानपत्राचे ‘ पाहिजे ’ चे रकाने लक्षपूर्वक शेजारच्या लायब्ररींत जाऊन धुंडावयाचे. छोटी–मोठी, मनासारखी, मनाविरुद्ध कमी पगाराची, जास्त पगाराची, अटींची बिनअटींची—कोणत्याही प्रकारची जाहिरात असो, वाचावयाची, सोडावयाची नाहीं. अगोदर मनाला आवडेल, शरीरप्रकृतीला मानवेल, समाजांत शोभेल, अशा तऱ्हेच्या नोकरीची ‘ जाहिरात ’ तरी वाचावयाला मिळते काय, याकडे आशाळभूत डोळे पहात. नंतर ‘ अनुभविक मनुष्य पाहिजे ’ ‘ पूर्वीच्या कामांचीं सर्टीफिकिटें अर्जासोबत जोडावींत ’ वय आणि जात हीं कळवावीं ‘ तरुण आणि अननुभवी माणसांनीं अर्ज करण्याची तसदी घेऊं नये, ’ ‘ अर्जदार युनिव्हर्सिटीचा पदवीधर असला पाहिजे, ’ अशा तऱ्हेचा उल्लेख नसलेल्या जाहिरातींचा शोध करावयाचा. प्रत्येक जाहिरात वाचावयाची, ती मनाशींच आपल्याला लागू—गैरलागू करून पाहावयाची, आणि मग दुसऱ्या जाहिरातीकडे दृष्टि न्यावयाची. या चाळणींतून चाळतां चाळतां कित्येक आठवडेचे आठवडे तसेच जात. एकही मनासारखी जाहिरात वाचावयला मिळत नसे. चुकूनमाकून मिळाली, तर त्या दिवशीं केवढा आनंद होई ! झटकन् पत्ता टिपून घेऊन अर्ज खरडून—जेवणखाण आटोपून पोषाख नीटनेटका करून घराच्याबाहेर त्या ऑफिसचा शोध काढीत काढीत हिंडावयाचे. ऊन्ह—पाऊस, जेवणखाण याचा मुळींच क्षिती न बाळगतां जोडे फाडावयाचें. ऑफिस सांपडलें, इमारत दिसली, त्या ऑफिसच्या नांवाचीं कोरलेलीं अक्षरें वाचलीं, ह्मणजे, त्या वेळेपुरते झालेले श्रम परिहार होऊन समाधानाचा एक निश्वास सोडीत ऑफिसची पायरी चढावयाची. ऑफिसच्या लाल डगला, पिळाची पगडी, गळ्यांतला काळा पट्टा, त्यावरचें

ऑफिसच्या नांवाचें पितळी छापाचें शील अशा थाटाच्या चपराशाची ' एः शूः कोण पाहिजे ! अंदर मत जाव !" अशी दरडावणी ऐकावयाची, क्वचित परतीचा धक्काही घ्यावयाचा. ऑफिसच्या हेडकडून ' नो व्हेकन्सी ' म्हणून ऐकण्यापूर्वी दरवाजांतल्या चपराशाकडून ' हत जागा नाहीं, ' अशी चपराक लगावूनघ्यावयाची. नाहींतर चौकशीखिडकीच्या बाहेरच 'नो व्हेकन्सी' ची पाटी वाचून मुकाट्यानें आल्या पावलीं परत फिरावयाचें. आशाळभूतपणानें 'पाहिजे'-च्या जाहिरातीवरून पायपीट करीत ऑफिसचा उंबरठा गांठावयाचा. आतां या ऑफिसांत ' पैसा ' मिळण्याची सोय होऊन, आपल्या कुटुंबाच्या पोटापाण्याची सोय हें ऑफिस करणार, तेव्हां हें ऑफिस किती चांगलें आहे, या ऑफिसांत काम करणारी मंडळी किती सुस्वभावी, किती सुखी, किती व्यवस्थित आहेत, अशी अशीं हीं माणसें आहेत, म्हणूनच हें ऑफिस त्यांचा ' संसार चालवितें. ' त्या लोकांप्रमाणेंच मी आहें कीं नाही, त्यांच्यामाझ्यांत साम्य आहे तें किती, विरोध आहे तो कोणता ? त्यांच्यापेक्षां मी अधिक कडकपणानें वागतों आहें, कीं त्यांच्यांत मिसळण्याइतकेंही मला वागतां येत नाहीं; त्यांच्याच प्रमाणें तावडतोब मला वागतां येण्यासारखी मनाची तयारी करतां येईल कीं नाहीं इत्यादि विचार इतक्या थोड्या वेळांत––ऑफिसच्या माडीची पहिली पायरी चढावयाला लागल्यापासून शेवटची पायरी संपण्याच्या आंतच येऊन जात म्हटलें तरी चालेल. त्या ऑफिसविषयीं, आणि त्या ऑफिसांतील लोकांविषयीं आत्मीयता उत्पन्न होतें न होतें, तितक्यांत चपराशाकडूनच चपराक मिळण्याबरोबर त्या आत्मीयतेचा चक्काचूर होऊन जाई !

अशी चपराक मला पहिल्या पहिल्यानें सहन होत नसे. अगदीं भिरभिरी येई. संतापानें शरीरांतलें रक्त उसळे. काय करूं, आणि काय नको असें होऊन जाई. पण–पण शेवटीं काय ? शेवटीं 'उत्पन्यते विलीयन्ते दरिद्राणां मनोरथाः' हाच त्याचा निकाल ! उजाडला दिवस मावळला. फीरफीर फिरणें झालें. शरीर आणि शरीरापेक्षांही मन थकून गेलें. चारदोन ऑफिसच्या दारीं ' पोटासाठीं' धक्के घेऊन आलो. उणे शब्द, मिळविलेल्या ज्ञानाची हेटाळणी ऐकली, पोषाखीपणाबद्दल पूजा बांधून घेतली, आणि घरीं आलों. घरीं आल्यावर दिवसाच्या पोटीं केलेल्या कामाची–झालेल्या त्रासाची हजेरी शब्दशः देण्या-

ची जरूरीच राहात नसे.पहिल्या पाहिल्यानें तसें होई. अगदीं अघळपघळपणानें आईजवळ वगैरे त्याचा पाढा वाची. पण पुढें पुढें त्याच त्याच वर्णनाचा वीट आला. फलनिष्पत्ति कांहीं नाहीं. मग सांगावयाचें काय ? मी बोलेनासा झालों. आणि घरांतील मंडळी माझ्या न बोलण्यानेंच जास्त ओळखूं लागली. पहिली उत्सुकता आतां कोणाजवळच राहिली नव्हती.

माझें मन दिवसें दिवस चांगलेंच निगरगट्ट बनत चाललें. न बनून सांगणार कोणाला ? पैसा मिळविण्याकरितां धडपड ही केलीच पाहिजे. पहिला, आणि पहिल्यानें अत्यंत सोपा वाटणारा 'नोकरी' पेशा शिक्षीत मनाला बरा वाटतो, आणि तोच पत्करण्याकडे बुद्धीचा ओढा ओढतो. एकदां नोकरीचा तर नोकरीचाच पिच्छा पुरवावयाचा, असें ठरल्यावर त्यांत हयगय किंवा अंगचोरपणा कशाला ? नुसत्या अर्जानें काम भागत नाहीं. अर्ज घेऊन समक्ष भेटूनही दाद लागत नाहीं; असें अनुभवानें सिद्ध करून दिल्यावर 'नोकरी' करितां आणखी काय करावें लागणार, हा प्रश्न शिक्षीताला सुचला नाहीं, तर तो शिक्षीत कसला ? मलाही तो सुचला माझ्याही मनानें त्याचीं उत्तरें शोधून काढलीं. कोठेंही, आणि कशीही नोकरी पटकावयाचीच झाली तरी, लांच, आणि वशिला या दोन जालिम मात्रा जवळ बाळगिल्याच पाहिजेत. एका मात्रेच्या वळशानें गुण आला तर बरें, नाहीं तर दोन्हीं मात्रांचे वळशावर वळसे गुण येईपर्यंत देत गेलेंच पाहिजे. ज्याच्याजवळ या दोन्ही मात्रांची तरतूद असते, त्याची गोष्ट वेगळी. पण माझी बाब तशी नव्हती. 'लांच' द्यावयाला मजजवळ काय असणार ? जें द्यावयाचें तें मिळविण्याकरितां तर शरीर, मन, आणि मिळविलेली विद्या विकण्याकरितां दारोदार हिंडणें नशीबी आलें होतें. दुसरी 'वशिल्या'ची बाब. त्या बाबतींत विचार करणें जरूर होतें. वडिलांची कांहीं बरोबरची मंडळी ठिकठिकाणीं छोट्यामोठ्या ठिकाणीं नोकरीतून गुंतलेली होती. त्यांना पत्रें पाठवायचीं. त्यांचें लक्ष, त्यांची सहानुभूति आपणांकडे खेंचावयाची, आणि त्यांच्याकडून पत्रें आणवून त्या पत्राचा मारा जेथें उपयोग होण्याचा संभव आहे, असें वाटेल तेथें करावयाचा. त्या विषयीं घरीं आल्यावर आईजवळ बोलणें काढी. प्रत्येकाची आठवण करून अमके गृहस्थ 'पत्र' देतील का ? तमक्याच्या वजनाचा उपयोग होईल का ? फलाण्याला

आपल्या करितां भांड घालावी का ? याप्रमाणें आईशीं विचार विनीमय करी. ती काय बिचारी सांगणार ? माझ्या सर्व प्रकारच्या प्रश्नांना तिचें आपलें एकरूप एक उत्तर असावयाचें. "पहा बाबा विचारून. मी तरी त्यांच्या बद्दल काय सांगूं ? सगळी चांगली माणसं खरीं; तिकडच्यावर तर प्रत्येकाचा जीवा-पलीकडे लोभ. पण आतां त्यांच्या विषयीं मी तरी काय सांगूं ?"

हें बोलायच्या वेळीं मधुकर किंवा विमल आमच्या शेजारीं असली म्हणजे त्यांनीं मध्येंच म्हणावयाचें "ते जळगांवचे काका ना ? ते आपल्याकडे आले होते ते ? कित्ती कित्ती छान आहेत नाही ? त्यांनी आम्हांला जरीची टोपी— रेशमी परकर दिला होता. ते आपल्याकडे येणार आहेत होय ? का आपण त्यांच्याकडे जाणार आहोंत ?"

माझे वडील असतांना इतके चांगले वागणारे 'काका' आतां मला विचारतील का ? आतां 'वशिल्या'करितां उपयोगी पडतील का ? पण याच वेळीं त्याच काकांचा माझ्याबरोबरीचा—माझ्या इतकाच शिकलेला—माझ्या इतकाच 'नोकरी'चा गरजू कोणी मुलगा, पुतण्या, भाचा, मेहुणा किंवा माझ्यापेक्षां जवळचा आप्त असला, तर ते आपल्या 'वशिल्या'चा फायदा त्याला देतील का मला ?

आणि असे जोडलेले 'काका' 'मामा' वेळेला वशिल्याला एकही रिकामे नसले तर काय करावयाचें ? मग वशिल्याची मात्रा तरी माझ्या हातीं कुठून कशी मिळावयाची ? अर्थात् जर लांच किंवा वशिला यापैकीं 'नोकरी' मिळ-विण्याचें एकही साधन आपल्या जवळ नाहीं, तर 'मृगजला'पाठीमागें फुकट धांवण्यांत तरी अर्थ काय ? तेव्हां नोकरीचा नाद सोडावा, हेंच उत्तम. दुसरें जगांत काय वाटेल तें करावें, पण नोकरीच्या या ठोकरा नकोत. हे विचार यावयाला लागले म्हणजे जोरजोरानें येत. इतके कीं, शेवटीं अगदीं अनावर होत. आणि आगींत तेल ओतल्याप्रमाणें Wanted चें सदर पाहातांना साहजिकच इकडल्यातिकडल्या आंतील मजकुरावर नजर गेली, चालू चळ-वळीवरील मोठमोठ्या वक्त्यांचीं व्याख्यानें ऐकण्याचा चुकून माकून योग आला, तर 'नोकरीविषयीं' मन अगदींच फिरून जाई. नोकरी करणें, दुस-ऱ्याचा बंदा गुलाम होणें, परक्यांच्या सत्तेच्या लाथा खाणें, म्हणजे केवढें

आपली आणि आपल्या आयुष्याची, ज्ञानाची विटंबना! जिवंत नरकवास तो यापेक्षां आणखी दुसरा कोणता असणार? तेव्हां जी नोकरी करावयाचीच वास्तवीक नाहीं, ती मिळत नाहीं, खटपट करून मिळत नाहीं, हें सुदैवच नव्हे काय? गुलामगिरीचें लाजिरवाणें जिणें मी कंठू नये, असाच ईश्वरी संकेत दिसत नाही काय? बस्स! नोकरी करावयाची नाहीं, म्हणजे नाहीं. त्रिवार नाहीं. मिळत नाहीं म्हणून नव्हे, तर मिळाली तरी करावयाची नाही. आणि अशा रीतीनें आपला मान–आपली इभ्रत–आपलें स्वातंत्र्य–आपलें तेज हीं सर्व आपलीं आपणच राखावींत!

"नोकऱ्या मिळत नाहींत, तर करावयाच्याच नाहींत," "नोकरी आपल्याला जवळ येऊं देत नाहीं, तर आपणच तिच्यावर लाथ मारावयाची," या किंवा याच तऱ्हेच्या विचारांचा प्रसार करणारे वर्तमानपत्रांचे जळजळीत लेख, आणि वेळोवेळचीं व्याख्यानें, यांचा आम्हां भावनाप्रवण तरुणांच्या मनावर केवढा परिणाम होत असेल? आधींच कॉलेजांतल्या स्वतंत्र वातावरणांत भरमसाट भडकलेलीं आमचीं डोकीं, वस्तुस्थितीच्या रखरखणाऱ्या वाळूची मुळींच कल्पना नसलेली बुद्धि, संसाराच्या जबाबदारीविषयीं पूर्णपणें बेजबाबदार असलेलें मोकाट मन, यांना समाजाच्या बदलत्या–क्रांतिकारक–परिस्थितीचा धक्का केवढा जोराचा बसत असेल? आणि असें सुसाट सुटलेलें मन आवरतां आवरतां कोण लेधा तिरपीट उडत असेल, याची पूर्ण कल्पना, ज्यांनीं प्रत्यक्ष त्या परिस्थितीचा अनुभव घेतला असेल, त्यालाच यावयाची. इतरांना येणें नाही.

झालें. एक दिवस एकसारखा हिंडून दहापांच निरनिराळ्या ऑफिसमधल्या ऑफिसरांच्या कोपयुक्त नकारात्मक थपडा खाऊन मी निराशेनें घरीं परत यायला निघालों, आणि माझ्या विचारचक्राला उलट गति मिळाली. " 'नोकरी' करावयाचीच नाहीं."

पण नोकरी करावयाची नाहीं म्हटलें, तर करावयाचें काय? हा प्रश्न दुसरा डोळ्यापुढें उभा आहेच! 'पैसा' कसा मिळवायचा? आपलें, आणि आपल्या कुटुंबाचें पोट कसें भरावयाचें? संसारशकट कसा हांकावयाचा? काय, मी इतका शिकून माझ्या कुटुंबाचें पालनपोषण करावयालाही नाला-

यश ? कुठेंही मला शिरकाव करून घेतां येऊं नये ?मग मी करावें तरी काय ?

त्या मनःस्थितींतल्या विचारांची तंद्री ती. कुठून सुरुवात झाली होती, आणि कुठपर्यंत पोंचणार होती, कोण जाणें! त्याच विचारांत आशावादी आईची मुद्रा मध्येंच डोळ्यापुढें उभी राही. घरीं जातांच भावंडें, ' भाऊ, आज तरी आम्हाला खायला आणलंस काय ? ' म्हणून म्हणत अंगाला बिलगतील, त्याची कल्पना उभी राहून मन व्याकूळ होई. आणि शांतेचा विचार आला, म्हणजे मनाची जी काय तारंबळ उडे, तें बोलण्याची सोयच नाहीं.

' पैशा'करितां मी काय केलें पाहिजे ? ' हा विचार हरिदासाची कथा मूळ पदावर येते त्याप्रमाणें इकडून तिकडून मन फिरून आलें कीं, फिरून त्यावरच येई. आतां हा विचार आला, त्यावेळीं मी एका देवालयावरून चाललों होतों. देवालयाच्या द्वारीं एक भिकारी आणि एक भिकारीण न दमतां पण पद्धतशीर रीतीनें:—

" बाबा, तुमच्या कष्टाचा, पैसा द्या आम्हांला । राम पावेल तुम्हांला ॥" एवढेंच म्हणत होतीं. भिकारीण म्हणत होती, आणि भिकारी तिची री ओढीत होता. या भिकारणीला मी आज कित्येक वर्षें त्या देवालयाच्या दारीं पाहात होतों. भिकारी नवखा होता. तो भिक्षा मिळेना म्हणून मध्येंच गप्प बसे. त्या भिकारणीची सांथ करीत नसे. त्यावेळीं ती त्यावर खेकसून म्हणे, ' कायरे, गप्प बसून तुला पैसा कसा मिळणार ? ' उजाडले ते मावळले ' सारखा हात पसरावा लागतो-देवाच्या नांवानें भिक्षा मागावी. मी आज बारा वर्षें या देवाच्या दारांत आहें. मला नाहीं कधीं कमी पडलं. किती जणांनीं मला लुबाडलंय. एक दोघांनीं माझ्याजवळची दोन हजारांची चोरी केली. तरी पण देवानं मला उणं केलं नाहीं. आज घडीला माझी या भिक्षेवर हजार दोन हजारांची सावकारी चालली आहे. दोन हजार मी व्याजी लावले आहेत. देवाच्या दारीं ओरडायला असा कंटाळूं नकोस. आज नाहीं तर जत्रेबित्रेच्या वेळीं गंमत बघ—

**"तुका ह्मणे त्याची कोण जाणें कळा। वागवी पांगुळा पायाविण!"**

एवढेंच ह्मणतें बघ; ह्मणजे तुझ्यामाझ्यावर लोक पैशांचा पाऊस कसा पाडतील तें तर पहा! "

मी चकित होऊन क्षणभर त्या वेड्या वांकड्या–आंधळ्या भिकारणीकडे पहातच राहिलों. मी माझ्या विचारतंद्रेंत असल्यामुळें विचारमालेंत जो शेवटचा प्रश्न आला, त्याचें उत्तर ह्मणूनच कीं काय त्या भिकारणीच्या तोंडून आलेसें मला वाटलें. माझी समजूत झाली, कीं ती भिकारीण मलाच उद्देशून म्हणाली, "भीक माग. तुला कांहीं कमी पडायचें नाहीं. चिकाटीनें भीक माग. तूं ह्याच्यावर 'सावकारी' सुद्धां करशील!"

माझा क्षणकालचा चकितपणा ओसरला, माझा मीच काय वाटून कोण जाणें हंसलों, आणि पुढें झटकलों. झटकताना भुर्रकन एकदोन अर्धवट विचार येऊन गेले "काय? मला पोटासाठीं भीकही मागावी लागणार?–मग जीवित तें काय राहिलें? त्यापेक्षां मृत्यू पुरवला नाहीं काय? पण मग कांहींच जमलें नाहीं तर, जगण्या करितां शेवटीं 'आपदेशीं चोरी आणि परदेशी भीक आहेच!'

त्या विचारांचा झटका मला सहन झाला नाहीं. त्या तिरिमिरींत मी बराच पुढें सरकलों. त्या तेथें वळणावरच्या कोंपऱ्यावर एक भव्य नवी इमारत बांधली जात होती. कामावरचे हमाल खालचे मोठमोठे दगड वर चढवीत होते. कांहीं खालीं, कांहीं वर, असे ते हमाल कामांत गुंगून गेले असतां, काम सुकर होण्याकरितां कसल्या तरी आपल्या हेंगाड्या भाषेतील गाण्याचीं कडवीं, अगदीं ठेक्यांत म्हणत होते. त्या हमालीनें माझें मन पुन्हां खेचलें. हे हमाल दिवसभर काबाडकष्ट करतात. त्यांच्या अंगांतून घामाचे लोटच्या लोट जातात. यांचा 'पैसा' निढळाच्या कामाचा आहे! हे लोक किती सुखी असतील?

मग काय? मी हमाली केली पाहिजे? उद्यांपासून हमाल होऊं?

आला पुन्हां प्रश्न! 'हमाल' व्हायचें तर मग मी इतका शिकलों कशाला?

त्या मिळविलेल्या इतक्या शिक्षणाचा उपयोग काय? सगळ्या शिक्षणाची या हमालांच्या बरोबर माती करावयाची, त्यापेक्षां–त्यापेक्षां–जाऊं द्या तें! पण माझ्या हातून ही हमाली–ही शारीरिक कष्टाची हमाली तरी व्हायची कशी? जन्मापासून आजपर्यंत सुखाच्या सांवलींत वाढलों–खेळलों --शिकलों.

शाळा–कॉलेजमध्यें घरापासून जातां येतां काय जेवढा उन्हाचा चटका लागला असेल, आणि जाण्यायेण्याचे श्रम झाले असतील तेवढेच. त्या त्या तेवढ्या श्रमांच्या भांडवलावर ‘ हमालां’च्या जगांत शिरून जगायची, आणि कुटुंबाला जगवायाची तयारी करावयाची, म्हणजे काय ?

मन सांगे, असें जगण्यापेक्षां मृत्यू पुरवला. पोट सांगे, मृत्यू पत्करून कसें चालणार ? तूं आहेस, आणि तुझ्यावर अवलंबून आणखीं चार पोटं आहेत. तूं तुझ्या एकट्याला मारशील, पण तुझ्यावर अवलंबून असणाऱ्या चार पोटांना मृत्यू पत्करायाला लावण्याचा तुला काय अधिकार ? तुझ्याकरितां नाहीं तरी तुझ्यावर अवलंबून असलेल्या चार पोटाकरितां, वेळ पडली तर तुला हमाली केली पाहिजे, भिक्षा मागितली पाहिजे, नोकरी केली पाहिजे, नव्हे चोरीचा मार्ग सुद्धां पत्करला पाहिजे. त्याशिवाय तुझी सुटका नाहीं. पोट हें असें मोठं अनिवार आहे.

आज विचारांनीं मस्तकांत कल्लोल करून अतिरेक केला. निराशेनें थैमान करून अतिरेक करून सोडला. संतापानें सर्वांगाचा दाह करून मस्तक फोडून टाकण्याचा अतिरेक केला. ‘ लांच ’ किंवा ‘ वाशिला ’ नाहीं, म्हणून नोकरीच्या राज्यांत ‘ नो व्हेकन्सी ’ च्या पाटीची सलामी ! मन व शरीर दुबळें म्हणून ‘ हमालां ’ च्या साम्राज्यांत माझी पूर्ण नालायखी ! ज्या कुलांत, ज्या शीलांत जन्म घेतला, त्याचा मूर्तिमंत मृत्यूच म्हणजे भिक्षांदेहिची दीक्षा पत्करणें !–चोहोंकडून मनाचा कोंडमारा ! कोणीकडून कोंडी फोडावयाची ? काय करावयाचें ? आजचा दिवस असा घालविला, उद्यां काय करावयाचें ?

विचारांची लांबण संपली नाहीं. घरची वाट संपली. मी माझ्या दारांत आलों. निराशेनें मी इतका हताश झालों होतों, शरीरकष्टानें मी इतका थकलों होतों, संतापातिरेकानें मी इतका बहकलों होतों, स्वतःच्या जगांतल्या नालायखीनें इतका लाचार झालों होतों, कीं, आज घरीं प्रत्येकाला तोंड दाखवावयाचीही मला लाज वाटूं लागली होती. मला कोणाचें तोंड दिसूं नये, माझें कुणी तोंड पाहूं नये, अशी मनाची अवस्था झाली होती. आईच्या मांडीवर डोकें ठेवून मनमुराद रडावें म्हटलें तर त्या माऊलीला त्यामुळें कोण कष्ट होतील, असें वाटून मन मला रडायचीही मुभा देईना. मधुकर किंवा विमल यांची समजूत ‘ त्यांना खाऊ कां

आणिला नाहीं,' म्हणून काय सांगून त्यांची समजूत काय घालूं? हा विचार डोळ्यांतल्या पाण्यांना शिलकेंत ठेवायला तयार नव्हता! आणि शांतेचें दर्शन काय करील? मला रडायला लावील, कीं रडूं आंवरायला लावील? तिच्या पुढें रडूं आवरूं कीं मनमोकळेपणानें रडूं?—

दारांत शांता एका बाजूला मधुला व एका हातीं विमलला घेऊन माझी मार्गप्रतीक्षा करीत होती. मी दुरून येतांना पाहून भावंडांनीं तिला थांबविलें होतें, कीं तीच त्यांना घेऊन थांबली होती, कोण जाणें! मला पहातांच भावंडांनीं टाळ्या पिटीत नाचायला आरंभ केला. मला वाटलें, 'माझीं भावंडें मी खाऊं आणला असेल याच आनंदानें बेहोष झालीं आहेत!' खरेंच, माझ्या डोळ्यांत पाणी आलें! शांतेचा मुखचंद्र नेहमीसारखा धीरगंभीर, पण किंचित हास्ययुक्त दिसला! मला चमत्कार वाटला! मी इतका हताश दिसलों तरी शांता शांतपणानें हंसतमुखच!

जवळ जातांच भावंडें मला बिलगून म्हणालीं, "भाऊ, आपल्या दारावरून तुझे जगन्नाथ आपल्या बायकोला घेऊन दोनदां मोटारींतून गेले. त्यांनीं म्हणे नवी मोटार घेतली आहे. भाऊ, आपण केव्हां मोटार घ्यायची?"

"लवकरच!" माझ्याऐवजीं शांतेनें त्यांना उत्तर दिलें.

"भाऊ, आई देवाला गेली आहे" मधुकर बोलला.

"भाऊ, आह्मीं आज वहिनींच्याबरोबर विश्वनाथांच्या घरीं गेलों होतों."

"इंदुताईनीं आणखी विश्वनाथांनीं खूप गम्मत केली." विमल ह्मणाली.

"आणखी कुणाला तरी विश्वनाथांनीं बोलावलंय, हें सांगायचं विसरायचंच का?"

शांतेनें माझ्याकडे पहात दोघांनाही उद्देशून ह्मटलें.

"मला बोलावलंय विश्वनाथानं?" घरांत येऊन कपडे काढून टाकून वळकटीला टेंकत असतां मी सावकाश विचारलें, "कां बोलावलंय?"

"तें समक्ष जाऊन ऐकावं!" शांता उत्तरली.

शांता आज विशेष आनंदी दिसत होती. तिच्याकडे मी पाहिलें, आणि दिवसांचा श्रमभार मी खरोखरच विसरलों. तिचें मंदस्मित, आणि आत्राजाची हुकमत यांनीं माझ्यावर निराळाच कांहीं परिणाम केला. मी विशेष चौकशी न करतां आशेच्या ' उद्यां'कडे पाहात शांतेला सांगितलें, " ठीक आहे. उद्यां सकाळीं मी विश्वनाथाकडे जरूर जाईन ! "

माझ्या उत्तरानें शांतेला अधिक आनंद झाला. आई घरीं नसल्यामुळें शांतेला जवळ येऊन तितकें मन मोकळेंपणानें बसायला बोलायला बरें वाटत होतें. बाहेर जायच्या अगोदर तिनें मला कायसेसें खायला करून ठेवलें होतें, तें आणलें. मीही तें मोठ्या आवडीनें उठून खायला आरंभ केला. जवळ असणाऱ्या भावंडांना त्यांतला अर्धाअर्धा घांस दिला. भावंडें माझ्या अंगावर बेगुमान लोळत होतीं. मला शांतेच्या विशेष आनंदाचें कारण कळत नव्हतें; व विचारलें, तरी ती थांग लागूं देणें शक्य नव्हतें. मी खात असतांच मनाशीं विचार करीत होतों—

"उद्यां विश्वनाथाकडे मला काय ऐकावयाला मिळणार होतें ?"

---

## —प्रकरण ४ थें—

# ओझरतें दर्शन

**ओझरतें मुख मजला । तव दिसतां किति हो हर्ष मनाला ॥**

रे. टिळक

दुसरे दिवशीं झोंपेंतून उठलों, तों बाहेर बरींच उन्हें आल्याचें आढळून आलें. कालच्या सर्व दिवसाच्या निष्फळ दगदगीनें मन व शरीर इतकें दमून गेलें होतें, कीं त्यामुळें मी रात्रीं जेवण करून अंथरुणावर पडलों केव्हां, आणि झोंपेच्या स्वाधीन झालों केव्हां हें मला कळलें सुद्धां नाहीं. उजाडेपर्यंत या कुशीचा त्या कुशीवर तरी वळलों कीं नाहीं कोण जाणें. झोंपेंतून उठलों म्हणण्यापेक्षां मला उठविलें, त्यावेळीं जरा जुलमानेंच मी उठलों. मनाला कसला उत्साह नव्हता. सर्वांग ठणकत होतें; आज दिवसांत आणखी कुठें कुठें भटकावयाचें हेंही ठरलें नव्हतें. मग उठून करायचें तरी काय?–म्हणून जरी ठराविक वेळीं जाग आली होती, तरी तसाच पडून राहिलों होतों. शनिवार असल्या-मुळें मुलें शाळेंत जाण्यास सज्ज झालीं होतीं. मुलांना मी आज बराच उशीर निजलों असल्याबद्दल चमत्कारिक वाटत होतें. दररोजचा क्रम म्हणजे मी उठल्यावर बऱ्याच वेळानें मुलें उठावयाचीं. त्यांना मी हलकेंच उठवावयाचें. पण तेंच आज त्याच्या उलट झाल्यावर मुलांना कसेंसेंच वाटलें. कपडे करून तयार होत असतां, आणि आईनें खायला दिलेलें खात असतां मधुकर आईला विचारीत होता, "आई, भाऊ आज उठला नाहीं ग! आम्हीं त्याच्या अगोदर आज कसें उठलों! मग आम्हीं शहाणे आहोंत ना?"

"वाः रे शहाण्या!" विमल त्याला मध्येंच थांबवून म्हणते, "आई! आपला भाऊ आजारी आहे होय? म्हणून निजला आहे?–त्याच्या अंगाला हात लाऊन पाहूं जाऊं का?"

"नको. निजूं दे. काल दमून गेला आहे ना? म्हणून निजला आहे. उठेल मग तो. तुम्हीं खाऊन शाळेंत जा म्हणजे झालें." आईनें मुलांची समजूत केली. भावंडांचें आणि आईचें बोलणें ऐकून मला काय वाटलें हें

कांहीं सांगतां येणार नाहीं. मुलें शाळेंत गेलीं. आई घर कामाला लागली. मी अजून तसाच पडून होतों. जरा वेळानें माझ्या अंगाला गार–पण मऊ असा स्पर्श झाला. मी डोळे उघडले. शांतेच्याच मृदु हाताचा तो गोड स्पर्श होता ! शांता स्निग्ध दृष्टीनें मजकडे पहात होती. मी पडल्या स्थितीतच तिच्याकडे पहात राहिलों. तिचें सकाळचें सर्व घरकाम झालें होतें. वेणीफणी झाली होती. जरी तिचें अंगधुणें व्हावयाचें होतें, तरी तिच्या नीटनेटकेपणांत आणि स्वच्छतेंत कमतरता मुळींच नसल्यामुळें 'जातीच्या सुन्दरांना कांहींही शोभतें' याप्रमाणे शांता खरोखरच किती तरी सुन्दर दिसत होती. मी तिच्याकडे पाहिलें, त्यावेळीं क्षणमात्र अशी एक कल्पना माझ्या मनांत येऊन गेली कीं, " मी आळशासारखा निजलों आहें, त्या मला कोणी उद्योगदेवता हंसतमुखानें, प्रसन्न नजरेनें, सतेज शब्दांनीं जणूं काय म्हणत आहे, "उत्तिष्ठत ! जाग्रत ! ! प्राप्य वरान्निबोधत ' ! "

माझ्या शरीरांत त्या क्षणीं नवजीवनाची तडित् चमकून गेली. माझ्या तोंडावर आपोआप हास्य चमकलें. माझा हंसरा चेहरा पाहून शांतेच्या अगोदरच खुलणाऱ्या तेजांत आणखी लखाकी आली. तिची अर्धस्फुट दंतावलि विलसली; गालाला किंचित् खळी पडली. कुंकुमतिलकाभोंवतीं, भालप्रदेशीं घर्मबिंदूंची शोभायमान दाटी थाटली ! तें अवर्णनीय व अनिर्वचनीय दृश्य पाहून मला काय वाटलें तें सांगतां येत नाहीं. शांतेच्या डोळ्यांतील ती अनुपमेय लखाकी, मी अतृप्तपणानें लुटीतच राहिलों. मला जागे करण्याकरितां माझ्या अंगाला लावलेला गारसा हात मी पण तसाच्या तसाच धरून ठेवला ! शांतेला माझ्याशीं कांहीं बोलावयाचें होतें कीं नाहीं, हें माझ्या ध्यानांत आलें नाहीं, पण मला मात्र तिच्याशीं कांहीं तरी बोलावेंसें वाटत असूनही बोलावयाला शब्दच सुचत नव्हते. आम्हीं त्यावेळीं निःशब्द कितीतरी बोलत आहोंत, असें मला वाटलें. नाहीं तरी शब्दातीत परिस्थिति शब्दांनीं कोण झालें तरी कशी वर्णन करणार ?

त्या मन्त्रमुग्ध स्थितींत आम्हीं किती वेळ होतों–आणि आणखी किती वेळ राहिलों असतों कोण जाणें; पण मध्येंच कुणी तरी, आणि कसला तरी विक्षेप आणिला–जवळच कशाचा तरी खडबडाट झाला, आणि आमची तंद्रा

अंग पावली ! माझ्या हाताखालचा आपला हात झटकन् बाजूला घेण्याचा प्रयत्न शांता करीत असतां मी तो त्याच स्थितींत ठेवण्याचा जरासा प्रयत्न केला. शांता तोंडावरचें हंसू आवरीत म्हणाली, " इश्श ! हें काय ? "

" काय ? " मी प्रश्नाचें उत्तर प्रश्नानेंच दिलें.

" उठायचें नाहीं का आतां ? "

" कां ? "

" कां म्हणजे ? " एवढेंच शांता म्हणाली, आणि मजकडे अशा कांहीं दृष्टीनें पाहिलें कीं, तिचा बोलण्याचा हेतु बाजूलाच राहिला. मला वाटलें, तेंदाळकरांच्या प्रबोधनांतलें,:—

" मधु रजनी सरली—
गडे हीं,
मधु रजनी सरली
ही प्रभात झाली । तरी पुरेशी होय न झोंप कशी ? "

हें कडवेंच मला उद्देशून म्हणतें आहे !

" उठायचं ना आतां ? " शांतेनें शेवटीं पहिलाच गद्य प्रश्न केला.

" मी उठलोंच आहें. पण मध्येंच जर कसला खडबडाट झाला नसता तर ?-कसला खडबडाट झाला, कुणीं केला ?–" मी बोलत होतों. खडबडाट झाला, तो माझ्याप्रमाणें शांतेलाही आवडला नव्हताच. माझ्याप्रमाणेंच खडबडाट कशाचा झाला, आणि कुणी केला हें पाहण्याकरितां तिनें चोहोंकडे दृष्टि फिरविली. प्रकाश येणाऱ्या झरोक्यांत आमची मनी मांजरी आपल्या पंजानें आपलें तोंड धुवीत असलेली आम्हां दोघांनाही एकदमच दिसली.

" मनी मांजरीचाच तो पराक्रम वाटतं ! " शांता हंसून म्हणाली.

" पण रागवूं नको हं तिच्यावर ! आज कांहीं तरी शुभचिन्ह आहे. मनी तोंड धुतें आहे. मांजर आपलें तोंड धुतांना पाहिले म्हणजे म्हणतात, कांहीं तरी लभ्यांश असतो, खरें ना पण हें ? " मी म्हटलें.

" मग आतां सकाळींच चहाला जायचं आहे ना ? "

" वाः ! चांगलाच लाभ आहे म्हणायचा ! "

" लहान का असेना, पण ठरल्या वेळेवर तरी जायला हवं ? "

" तें का ? "

" वेळेचं महत्त्व म्हणून ! "

" अगदीं बरोबर ! " मी त्याबरोबर चटकन् उठलोंच. " वेळेचं महत्त्व जाणलंच पाहिजे. 'चहा' सारख्या साध्यासुध्या गोष्टींत जर आम्हांला 'टाईम काप अप' करितां आला नाहीं तर 'टाइम इज मनी' या तत्त्वापर्यंत आमची कृति केव्हां, आणि कशी पोंचणार ? " ही विचारमाला माझ्या मनांत भर्रकन् येऊन गेली. कंटाळा, श्रम, थकवा, इत्यादि सर्व चट दूर पळालें होतें. मी उठलों. झटपट प्रातर्विधि उरकले. कपडे केले, आणि विश्वनाथाकडे मी आज किती तरी दिवसांनीं 'चहाला' म्हणून निघालों होतों. वास्तविक ज्या स्थितींत मी विश्वनाथाकडे चहाला निघालों होतों, ती स्थिति कितीतरी मनाला क्लेश देणारी. स्नेह्यांदिकांच्या जितक्या गांठीभेटी न पडतील तितक्या चांगल्या, असें वाटायला लावणारी होती. त्यांत कित्येक दिवसांत मीं विश्वनाथाकडे फिरकलों नव्हतों, कीं त्याची माझी गांठही पडली नव्हती. आजसुद्धां त्याची समक्ष गांठ पडून त्यानें चहाला बोलावलें होतें, आणि मी चाललों होतों, असें तरी कुठें झालें होतें ! काल शांता, आणि माझीं भावंडें तिकडे गेलीं होतीं. शांता आपल्या मैत्रीणीकडे–इंदूकडे ह्मणून गेली होती. येतांना सांगितलें असेल सहज तिच्याजवळ. आणि मी पण जसा कांहीं पडत्या फळाची आज्ञा घेऊनच निघाल्यासारखा निघालों होतों. मध्यंतरींच वाटेंत आभिमान-स्वाभिमानाचा प्रश्न उत्पन्न होऊन मी परतही फिरावयाचा. पण आज तसें कांहीं झालें नाहीं. घरून जों निघालों तों कुठेंही वाटेंत न रेंगाळतां संवरता थेट विश्वनाथाच्या घराच्या उंबरठ्यांत जाऊन थांबलों. सकाळीं अंथरुणांतून उठल्यापासून, नव्हे शांतेनें उठविल्यापासून, मन अतिशय प्रफुल्ल असें झालें होतें. एरव्हीं कोणाकडे 'चहा' ला किंवा उगीच बसायला वगैरे जायचें ह्मटलें तर शांतेची सल्ला किंवा फारशी उत्सुकतासुद्धां असावयाची नाहीं; पण आज अगदीं वेळेवर जागे करून, 'चहा' ला जाण्याची आठवण देऊन, वेळेवर मी जाण्याची एक प्रकारची दक्षता ठेवतांना तिला मधुर मौज वाटत असल्याचें दिसत होतें. इतक्या हौसेनें शांतेनें मला 'चहा' ला धाडलें. तें कां ? मीही उत्कंठेनें आलों, तो तरी कां ? विश्वनाथाकडे कांहीं विशेष

होतें का ? कीं पुष्कळ दिवसांनीं आमच्या सारख्या शतदरिद्र्याचें सुस्वागत करण्याची सुबुद्धि शांतेच्या मैत्रणीला सुचली, आणि त्याचें कौतुक वाटून शांतेला मला, मी तिकडे जाण्याबद्दल प्रोत्साहन द्यावेसें वाटलें ? काय झालें होतें कुणास ठाऊक, शांतनें 'जा' म्हटलें, आणि मी एकाद्या आज्ञाधारक विद्यार्थ्यासारखा विश्वनाथाच्या घरीं आलों खरा. अंथरुणांत तोंडावर पांघरूण घेऊन लोळत असतां, मनाला प्रोत्साहक अशी मजविषयींची निर्व्याज प्रेमाची भावंडांची बालभाषा; त्यांची समजूत घालतांना आईनें एकदोनच वाक्यें उच्चारलीं असतील, पण त्यांत मजविषयींची विश्वाला व्यापून उरणारी आईच्या वत्सलतेची अथांग उत्कटता; आणि घरकामें उरकून, थंड पाण्यांत हात बुच-कळल्यानें गार झालेला शांतेचा तो मला झोंपेंतून जागे करायला आलेला अननुभूत प्रेमाचा हात, आणि थकल्या भागलेल्या, कंटाळलेल्या, भारावलेल्या शरीराला आणि मनाला, ताजेंतवानें करणारी ती शांतेची अमृतमयीदृष्टि, या सर्वांचा परिणाम माझ्यावर केवढा तरी झाला होता ! शरीरांत नवजीवन संचारलें होतें. मनाला नवा हुरूप प्राप्त झाला होता. वाटत होतें कीं, आज 'शुभदिन' आहे. आज आपले पाय कुठेंतरी भुईला टेकणार ! बेटी मनी-मांजरीसुद्धां सकाळींच आपलें तोंड धुवीत होती !

याच मनाच्या उल्हसित स्थितींत मी विश्वनाथाच्या घरांत पाउल टाकलें. विश्वनाथ माझी वाटच पहात होता. माझ्या आगमनानें त्याच्या चेहऱ्यावर नेहमींप्रमाणेंच किंचितसा फरक झाला. इंदूला मी आल्याचा फार आनंद झाल्याचें दिसलें. मी जरी ठरल्या वेळेपेक्षां फारसा आधीं आलों नव्हतों, तरी उशीरही मुळींच केला नव्हता. अगदीं बरोबर वेळेवरच दारांत दिसल्याचें पाहिल्यावर विश्वनाथासारख्या प्रथमपासून कांटेतोल वागणाऱ्या माणसाला संतोष होणें साहजीक आहे. कदाचित् माझ्या वेळेवर येण्यानें विश्वनाथाच्या ओंठावर "वा: ! सर्व हिंदुस्थान असें जर वेळेचें महत्त्व जाणील,—आणि बाब क्षुल्लक असो कीं कितीही महत्त्वाची असो, वेळेची किंमत कळून वळली पाहिजे—तर हिंदुस्थान हां हां म्हणतां निराळा दिसायला लागेल. त्याला कशाची कधीं कमतरता भासणार नाहीं; कीं तो कधीं दीनवाणा दिसणार नाहीं ! " अशी

वाक्यें येऊन गेलींही असतील. त्याला जर फार बोलायचा कंटाळा नसतां तर त्यानें हीं वाक्यें उच्चारून दाखवायलाही कमी केलें नसतें !

" आलास वामन ? "

" हा तुझ्या पुढें उभाच आहें ! "

" कसा आलास ? "

" पायीं-पायीं ! "

" तसें नव्हे. कसा आलास ? "

" इश्श ! हें काय विचारायचं ? बोलावलं होतं ना घरीं काल ? मग काय हें विचारायचं ? " इंदू म्हणाली. तिला वाटलं, विश्वनाथाच्या मनांतून माझा अपमान करावयाचा आहे, म्हणून मला तो तसा कांहींतरी खोंचून बोलतो आहे, आणि म्हणूनच ती मध्यें पडून सारवासारव करण्याकरितां बोलली. विश्वनाथ इंदूची तीं वृथा गडबड पाहून नुसतांच हंसला.

" मी विचारीत होतों कीं, मी बोलावलें म्हणून तूं आलास कीं—"

" नाहीं तर काय ?–" इंदू फिरून मध्यें बोलली,

" कीं शांतावहिनींनीं तुला पाठविलें म्हणून आलास ? " विश्वनाथानें इंदूला थांबवून विचारलें. या विचारण्यानें इंदूचें गडबडणें थांबलें. उलट ती हंसली. मलाही हंसूं आलें. मी उत्तरादाखल म्हटलें, " तुला कसें वाटतें ? "

" मला वाटतें, शांतावहिनीनें पाठविलें म्हणून तूं आलास ! "

" तें कांहीं अगदींच खोटें नाहीं ! " मी हंसत उत्तरलों.

" बरं कां आलास ? "

" कां आलों ? तुझा नेटका, टापटीपीचा, आखींव रेखींव, भपक्याचा नाहीं, किंवा श्रीमंतदरिद्र्याचा नाहीं, अशा तऱ्हेचा तुझा संसार असतो, अशी ख्याति ऐकत होतों, ती प्रत्यक्ष आज स्थिति काय आहे, म्हणून पाहायाला आलों झालें ! "

" अस्सें ! " विश्वनाथ माझ्याकडे किंचित् सरोष पाहात उद्गारला, " वामन, बराच हा झालास कीं ! "

" हो तर ! आतां मी तो तसाच किती दिवस राहावयाचें रे ?" आमच्या प्रश्नोत्तरानें-कांहींशा विचित्र प्रश्नोत्तरानें-फिरून सगळ्यांत हंशा पिकला !

" जशास तसा भेटे ! मनाचा संशय फिटे ! " इंदूनें आपल्या बोलण्याची मध्येंच भर टाकली !

वरीलप्रमाणें आमच्यांत कांहीं तरी आणि कसला तरी संवाद सुरू झाला. मी आल्यावर मग इंदूनें चहाची तयारी केली. इंदू चहा करण्याच्या धांदलींत होती खरी, पण तिची तारंबळ कांहीं तरी निराळ्याच कारणाकरितां उडालेली आहे असें सूक्ष्म रीतीनें पाहाणाराच्या लक्षांत आलें असतें. ती एकसारखी विश्वनाथाकडे सहेतुक दृष्टीनें पाहात होती. ती त्याच्याकडे पाही; मजकडे निमिषभर टक लावी, आणि पुन्हां आपल्या उद्योगाकडे वळे ! विश्वनाथाकडे टक लावणारी इंदूची दृष्टि " बोलायचें ना ? कांहीं तरी धीराचे शब्द माझ्या मैत्रिणीच्या नवऱ्याला–आपल्या स्नेह्याला ऐकवायचे ना ? " अशा अर्थाची जशी कांहीं दिसे. मजकडे जो दृष्टिक्षेप लवमात्र होई त्यांत " मी तरी काय करूं ? माझ्या मैत्रिणीचा नवरा–मैत्रिणीकरितां तरी–सुखासमाधानांत असावा, असं मला कसं वाटणार नाही ? पण माझ्या हातीं कांहीं नाहीं. माझं कुणी ऐकत नाहीं. माझा इलाज नाहीं. " असा भाव दर्शवी, असें वाटे !

मजसारख्याला इंदूसारख्या निष्पाप जीवाची मूक–निःशब्द सहानुभूति आहे, मी सुखी असावें, ' पैशां'ची उणीव मला असूं नये, अशी सदिच्छा अशा निर्मळ अंतःकरणांतून वावरते आहे, हेंच जास्त नाही काय ? हें असें असणें, आणि असलेलें आपल्याला कोणत्या तरी मार्गांनीं कळणें, हें देखील एक प्रकारचें भाग्यच नाहीं का ? जनमनाची ही मजविषयींची आंतरिक इच्छा मला कधींच नवसाला पावणार नाहीं का ? या प्रकारचे विचार मला मधून मधून भारी सुखवीत, व कार्योन्मुख करीत, यांत शंकाच नाहीं.

इंदूचा चहा तयार झाला. पेले भरून तिनें आमच्यापुढें ठेविले. खरेंच आमच्या विश्वनाथाची घरचा टापटीप आणि व्यवस्था एकाद्या कादंबरींत वर्णन करण्यासारखी, एकाद्या नाटकांत देखावा दाखविण्यासारखी होती, ह्मटलें तर त्यांत मुळींच अतिशयोक्ति होणार नाहीं. मी चहा पीत सभोंवतीं, विश्वनाथाच्या टापटिपीच्या संसाराचें कुतुहलानें अवलोकन करीत होतों. माझ्याकडे लक्ष जाऊन विश्वनाथ ह्मणाला,

" काय रे इतका निरखूनसा पाहातो आहेत ? " त्यावर मी आनंदून म्हटलें, " विश्वनाथ, या सुन्दर चहाची शपथ घेऊन सांगतों, हा चहा जितका सुन्दर आहे, तितकाच तुझा संसारही सुन्दर आहे ! कोणीही तुझ्या या संसाराचा हेवा करावा असें म्हटलें तर त्यांत कसली चूक होणार नाहीं. खरा खरा तुझा सुखाचा संसार आहे–"

" पण वामन, खरंखुरं संसाराचं सुख तुला आहे. " विश्वनाथ उद्गारला.

" म्हणजे ? " मी चकित होऊन विचारलें.

" मला सुखाचा संसार करण्याकरितां संसाराच्या या अधिष्ठात्री देवतेपुढें ती प्रसन्न रहाण्याकरितां दिवसांतून किती वेळां तरी लोटांगणें घालावीं लागतात. आपल्या जगन्नाथला तर, त्याच्या ' आनंदीबाईसाहेबां'च्या मुखांतून आज्ञेचा आवाज ऐकावयाला येण्याचा अवकाश ती अमलांत आणण्याकरितां ' जी हुजूर ' म्हणून हात जोडून उभें असावें लागतें. पण तुझी देवता–आमची शांता वहिनी–सदासर्वकाळ तुझी आराधना करण्यांत, तुला प्रसन्न ठेवण्यांत तुला सुखी पाहाण्यांत, आयुष्यांतलें सुखसर्वस्व मानते ! कॉलेजांत असतांनाच शांता वहिनीसारखें संसारसुखाचं अत्युच्च शिखर तूं गांठलंस ! आणखी ' म्हणजे? ' म्हणून मलाच विचार." कधींही एक शब्द अधिक न बोलणारा विश्वनाथ आज एकदम किती बोलून गेला, आम्हांला आश्चर्यच वाटलें. इंदू तर आपल्या पतीकडे टकमक पाहातच राहिली. त्याच्या साऱ्या बोलण्याचा विषय माझ्या ' शांते'च्या गुणवर्णनाशिवाय दुसऱ्या एकादाचा असता, तर इंदूला काय वाटलें असतें, किंवा शांतेच्या गुणवर्णनांत सात्विकता भरपूर भरलेली नसती तर मला काय वाटलें असतें, याचें वर्णन करणे कठीण नाहीं !

चहापानाबरोबर शांतेच्या गुणांचें पानहीं विश्वनाथानें यथास्थित करविलें. इंदूला बरें वाटेल असेल, पण त्याहून माझ्या आत्म्याला कोण आनंद झाला ! शतदरिद्री मी ! पण माझी मला कोण धन्यता वाटली ! शांतेच्या रूपानें व गुणानें विश्वनाथासारख्या घुम्याला बोलायला लावलें हें काय थोडें झालें ?

चहापान झालें. माझी उठायची वेळ झाली. इतरत्रच अवांतर गोष्टी झाल्या. पण मला कां बोलावलें होतें, हें विश्वनाथ बोलला नाहीं, मी ' कां बोलावलें? ' म्हणून विचारण्याचें टाळीत होतों. ' बोलावण्याचें काम कांहींच झालें नाहीं,

म्हणून इंदूचा जीव खालींवर होतो आहे असें दिसत होतें. विश्वनाथाचा चेहरा नेहमींसारखाच निर्विकार दिसत होता.

स्नेह्याच्या संगतींत गेलेला काळ किती तरी सुखाचा गेला. जरा वेळ वस्तु-स्थितीच्या यमयातनासुद्धां त्या संगतींत मी विसरलों.आतां उठून चालूं लागायचें याची जाणीव झाली, आणि त्याबरोबर " पुढें काय करावयाचें ? पैसा मिळवि-ण्याचा मार्ग कसा शोधावयाचा ?" या जळजळीत विचारांनीं डोळ्यापुढें हिरवीं पिवळीं चित्रें उभीं केलीं. मी आपला उठलों, विश्वनाथाचा किंचित् जड शब्दांतच निरोप घेतला. त्यानेंही तितक्याच प्रेमळपणानें माझा हात हातांत घेऊन निरोप दिला. त्याच्या तोंडावर मंदस्मित चमकत होतें .विश्वनाथाचे डोळे मोठे चम-त्कारिक होते. एका डोळ्यांत लहानसें फूल होतें. डोळे तसे चकचकणारे किंवा झगझगणारे नव्हते. उलट सकृद्दर्शनीं कांहीसे निस्तेजच दिसत. त्याच्या मनोव्यापाराची कोणालाही कल्पना होत नसे. तो रागांत आहे कीं लोभांत आहे, त्रासला आहे कीं खुषींत आहे, हें समजावयाला अपरिचिताला पंचाईत पडे. त्यामुळें पुष्कळांचा त्याच्याबद्दल, घमेंडखोर, कुढ्या मनाचा, खुनशी, गर्विष्ठ,' अशा सारखा गैर समजही होई. पण आम्हां त्याच्या लंगोटी मित्रांना त्याची पूरेपूर माहिती असल्यामुळें, त्याचे शब्द, त्याचें पाहणें त्याची चालचलणूक हीं कळण्यास कधीं प्रयास पडत नसत.आतां देखील त्यानें माझा इतका खुल्या दिल्यानें–शुद्ध भावानें--खऱ्या जिव्हाळ्यानें आपल्या हातांत हात घेतला होता, कीं धरलेल्या हातांनीं परस्परांच्या अंतःकरणाची ग्वाही परस्परांच्या अंतःकरणांना तेव्हांच दिली. इंदूसारख्या नवख्या आणि अल्लड बालेला कळ-ण्याच्या पलिकडे अजून ते होतें. मी निघालों, विश्वनाथानें जायला परवानगी दिली. इंदूच्या चेहऱ्यावर ' खट्टूपणा'चा छाप उमटला. ती मनाशी म्हणालीही असेल कीं, " नुसतं चहाचं कढत पाणी पाजलं म्हणजे झाली जशी कांहीं मित्राविषयींची कर्तव्यता! सगळे आपले दुरून डोंगर साजरेच!" जेव्हां विश्वनाथानें माझा हात धरला होता, त्यावेळीं मला मात्र वाटलें कीं, " हा उबदार गुबगुबीत हातच कधीं काळीं माझ्या उपयोगी पडावयाचा असला तर खात्रीपूर्वक पडेल."

निरोप देतांना विश्वनाथ सहज गंमतीनें म्हणून ह्मणाला, " वामन, आतांशा खराच भारी महाग झाला आहेस बोवा ! "

" बरोबर आहे ! " मी उत्तरलों.

" कां ? "

" मला सारं जग महाग झालें आहे. सगळ्या जगापेक्षां जग राखायला, किंवा तुझ्यासारख्या मित्राला मी सवंग व्हावयाला अत्यावश्यक जो ' पैसा ' तो त्याहूनही मला महाग झाला आहे म्हणून ! " मी ह्मटलें !

" हात् तेच्या ! ' पैशा'बद्दल एवढी का तुला काळजी ? आश्चर्य आहे ! " विश्वनाथ हंसत ह्मणाला

" अरे, ' पैसा ' मिळण्याची क्लृप्ति मी तुला सांगतों. " इंदूला वाटलें, बरें झालें आपण ज्याकरितां हा ' चहा 'चा योग जमवून आणला, त्याचें सार्थक होणार. ती कान व डोळे टवकारून विश्वनाथाकडे अवधान देऊन जागच्या-जागीं उभी राहिली.

" कोणती पैसे मिळविण्याची क्लृप्ति ? " मी मिस्किलपणानेंच पृच्छा केली.

" अरे मुंबईला जावं; चांगल्या चारपांच चाळी बांधाव्यात. आणि त्या चाळी भाड्यानें देऊन टाकाव्यात. चारपांच चाळींचें भाडें तुला मुंबईला महिन्याकांठीं किती येतं याची कल्पना तरी आहे का ? नुसतें चाळीच्या भाड्यावर महिन्याकांठीं कित्येक हजारांवर किफायत करशील, आहेस कुठें तूं ? "

" शाबास विश्वनाथ ! असली सत्रा आणे ' पैसा ' मिळविण्याची कल्पना सांगितलीस, याबद्दल मी तुझा फार फार आभारी आहें. पण दोस्त, आजच्या घडीला मला तुझी ही सत्रा आणे क्लृप्ति झेंपण्यासारखी नाहीं. एवढेंच वाईट आहे. सोळा आणे, पावणे सोळा आणे जरी कल्पना दिली असतीस, तरी झेंपली असती. कशी म्हणून नाहीं विचारलंस ? "

" कशी ? "

" पांच चाळीऐवजी, एकादी किंवा अर्धीच चाळ बांधायला सांगितलं असतंस, तरी चाललं असतं. पण त्याच्याबरोबर चाळी बांधायला लागणारा 'पैसा'

कुठून आणावयाचा हें सुचविलं असतंस तर--सध्यां मी दुपारच्या अन्नाला मोताद आहें, हें तुला माहित आहेच ! ”

“अरे ! खरेंच कीं ! तें माझ्या ध्यानांतच नाहीं !” विश्वनाथ हंसला. मीही हंसलों. विश्वनाथाचा विनोद मला लागण्यासारखा नव्हता, व मी लावूनही घेतला नाहीं. मात्र अजाण--पण सद्भावी इंदूला तो असह्य झाला. ती तोंड कसेसेंच करून झटक्यानें घरांत गेली.

मी पण घराबाहेर झटकलोंच. दुसरी कोणी कामाचीं कुळें विश्वनाथाकडे आलीं होतीं; त्यांच्याकडे तो वळला.

मी घरीं आलों. वाटेंत अनंत विचार मनांत पंजाबमेलच्या वेगानें धडधडत येऊन किरकोळ स्टेशनावर न थांबतां पुढें जात होते. ‘ ‘ शांतेचें मंगलस्मित, इंदूची निर्हेतुक सहानुभूतियुक्त तळमळ, लक्ष्मीकांत विश्वनाथाचा उबदार हाताचा बहुता दिवसांनी झालेला’स्पर्श आजचा शुभदिन आहे, हें सप्रमाण मला कसा पटवून देणार ? ’ हा विचार मनांत यायला, मी माझ्या दारांत पाऊल टाकायला, आणि पोस्टमननें एक लांबसा लखोटा माझ्या हातीं द्याव-याला एकच गांठ पडली. मी जरा उतावळ्या मनानें, कापऱ्या हातांनीं, धड-धडणाऱ्या हृदयाच्या स्थितींत लखोटा तेथल्या तेथेंच फोडला, वाचला. त्यांत काय होतें ?

लखोट्यांतल्या मजकुराचा निष्कर्ष--“ × × × × ऑफिसांत × × × × उमेदवार म्हणून नेमिलें आहे ” मी मनांत म्हटलें, “ पैशाचें हें माझ्या आयुष्यांतलें पहिलें आणि ओझरतेंच दर्शन आहे !”

——— —

## —प्रकरण ५ वें—

# नोकरीच्या जगांत

**वरच्या लत्ता झेलित माथां । सर्वे खालतीं झाडित लाथा**
**ती न आवरी, ही न आवरी । बेशरमी हैवान ॥**

—गोविन्दाग्रज

अखेर अस्मादिकांची स्वारी ऑफिसांत आपल्या कामावर रुजूं झाली. आणि दरमहाच्या दरमहा ठराविक ' पैसा ' घरीं यायचें मुक्रर झालें. हें काम विश्वनाथाच्या शब्दानें झाल्याचें कळलें; तेव्हां मित्रप्रेमाला तो जागला म्हणून मला त्याचे मनःपूर्वक आभार मानणें भाग आहे. विश्वनाथानें अगोदर सांगितलें नाहीं, व न सांगतां सहाय्य केलें तरी त्यामुळें त्याच्या मित्रकार्यांत वैगुण्य मुळींच आलें नाहीं. उलट त्याची माधुरी एक तऱ्हेनें कितीतरी वाढली.

मला नौकरी लागली म्हणून आमच्या शेजाऱ्या पाजाऱ्यांना, आम्हांला आतांपर्यंत उधार माल देणाऱ्या कोपऱ्यावरच्या दुकानदाराला बरें वाटलें. शेजारच्या खट्याळ काकूला तर भारीच आनंद झाला. कधीं काळीं त्यांना आमच्याकडून उधारपाधार मागण्याचा त्रास व्हायचा, तो चुकला, मग त्यांना कां आनंद होणार नाहीं ? त्यांना समजल्यावर त्या दुसऱ्या दिवशीं मुद्दाम आमच्या घरीं येऊन आईची गांठ घेऊन " झालं बाई बरं एकदाचं. तुमच्या लेकाला रोजगार लागला. काळजी सरली. आतां पहा हां हां म्हणतां तो आपली स्थिति सुधारेल. लेक तुमचा पाणीदार आहे. आम्ही पहिल्यापासूनच म्हणतों आहोंत हें " वगैरे वगैरे. माझ्या आईला किंवा शांतेला मला नौकरी मिळाल्याबद्दल काय वाटत होतें. हें सांगणें बरेंच कठीण आहे. कारण त्यांच्या वागणूकींत नौकरीच्या आधीं किंवा नंतर लक्षांत येण्यासारखा फरक मला मुळीं दिसलाच नाहीं. माझ्या भावंडांना आनंद फार झाला. मधुकरानें तर संध्याकाळीं घरीं येतांना माझ्याकरितां अमुक अमुक आणलेंच पाहिजे, म्हणून बजावलें. विमलनें गळ्यांत चिमुकल्या हातांची मिठी घालून लडीवाळपणानें म्हटलें, " भाऊ, मला तें संध्याकाळीं हें घेऊन ये बरं का ! "

मलाही तें कबूल करावें लागलें. व पुढील महिन्यांत पगार मिळावयाचा तर मी भावंडासाठीं आजच त्यांना हव्या त्या जिनसा घरीं येतांना घेऊन आलों.

अशा रीतीनें 'पैशा' करितां ऑफिसचा हमाल मला आपखुषीनें बनावें लागलें. नोकरीचें तें जग ! अरेरे ! कोण ती दुर्गंधी ! त्या जगांतले ते लोक काय ? त्यांचें ज्ञान त्यांच्या आवडीनावडी, त्यांची वागणूक, आणि त्यांची एकंदर आयुष्याबद्दलची कल्पना तरी काय ? ' येरे दिवसा आणि भररे पोटा ! ' या पलिकडे त्यांचें जगच नाहीं.

मी ऑफिसांत दाखल झालों. दाखविलेली खुर्ची अडविली. आणि पुढील टेबलावर पडलेल्या कामाकडे नजर दिली. कामाची समजूत करून देण्यासाठीं एक-उतार वयाचे सद्गृहस्थ निकलफ्रेमचा चष्मा कपाळावरून डोळ्यावर, आणि डोळ्यावरून कपाळावर नेत आणीत मजकडे आले. आणि कामाची समजूत करून देत असतां मधून मधून त्यांनीं, " हं ! हें असं असं आहे ! फार अवघड, जिखीराचें, डोळ्यांत तेल घालून करण्याचें,आणि भारी डोक्याचें हें काम आहे; जरा नजरचूक झाली कीं वरिष्ठाची पुष्पांजली, आणि एकाद-वेळीं नोकरीवर पाणीही पडायचें. समजलांत ? " हें माझ्यावर लादण्यास सुरुवात केली.

मी लक्षपूर्वक कामाची समजूत करून घेत होतों. ऑफिसांतल्या दुसऱ्या एका गृहस्थास आज यायला थोडासा उशीर झाला होता. त्याच्यावर हेड-क्लार्कसाहेब अगदीं गरमागरम झाले होते. आणि त्यांची चांगलीच हजेरी घेत होते. त्यांच्या तोंडांतून किती आणि कोणते अर्वाच्य शब्द बाहेर पडत होते, आणि त्या शब्दांना कांहीं अर्थ आहे, हें तरी त्यांना कळत होतें कीं नाहीं, कोण जाणें. बोलणाराच्या अधिकाराच्या तोऱ्यांत मगरुरीचे शब्द येत होते; त्या शब्दांच्या अर्थाकडे त्याला लक्ष पुरविण्याचें तितकें कारणही नसेल; पण ऐकणारा निमूट कसा ऐकून घेऊन स्वस्थ आहे, त्याच्या अंगांतलें रक्त उसळ्या कां घेत नाहीं, त्याला संताप कां येत नाहीं ? मनुष्यपणाचा उपमर्द ऐकून घेण्याइतका नामर्दपणा त्यानें कसा धारण केला आहे, हेच विचार माझ्या डोक्यांत जागृत व्हावयाला लागले. माझें रक्त गरम झालेसें वाटलें ! कपाळा-

वरच्या शिरा ताड् ताड् उडूं लागल्या. कामाची समजूत करून घेण्याकडील माझें लक्ष जरा वेळ उडालें देखील !

आतां आणखी एक देखावा डोळ्यापुढें आला. तिसरे एक गृहस्थ ' विडी ओढण्याच्या ' निमित्तानें आपल्या जागेवरून उठून बाजूला जातां जातां आमच्याकडे वळले. जवळ येऊन मला समजूत करून देणाऱ्यांच्या पाठीवर हात ठेवून, त्यांचें लक्ष त्यांनीं आपल्याकडे वेधविलें. " केळकराची कंबक्ती आज चांगलीच चालली आहे ! "

" केळकर तसाच मूर्ख आहे ! त्याला कितीही बोला. त्याचा उशीर ठरलेला. ऑफिसची वेळ संभाळतां येत नाहीं म्हणजे काय ? " मला समजूत करून देणारे गृहस्थ इकडे समजूत करून देत असतां, तिकडेही बोलूं लागले, " म्हणजे त्याचं असं ! ऑफिस म्हणजे ऑफिस ! तें कां आपल्या घरचें आहे ! पण हें केळकरला कळायला पाहिजे ! "

" तें कळलं नाहीं तरी चालेल. पण, " दुसरे गृहस्थ विडीचा एक झुरका घेऊन म्हणाले, त्याला "साहेबाची मर्जी संभाळतां येत नाहीं. कामाचं राहूं दे बाजूला. साहेबांच्या पुढें पुढें केलें पाहिजे, हात जोडून, एक पाय किंचित् घोड्याच्या पायासारखा लंगड्यासारखा ठेवून तोंडावर चार खेटरें मारल्यासारखा आंव आणून वागत असलें, म्हणजे मग साहेब असो, कीं त्याचा कोणी पूर्वज असो, सगळे थंडे पडतात ! ! पण तें आपल्या केळकरला अजून जमत नाहीं. मी त्याला हजारदां समजावून सांगितलं असेल हें. "

माझ्या पोटांत धस्स झालें ! काय ? ऑफिसला यायचें तें ऑफिसराची थुंकी झेलण्याकरितां, त्याच्यापुढें लांगूलचालन करण्याकरितां ? आणि मला हें करावें लागणार ? इतक्यांत कामाचा कागद उलटला गेला, आणि त्या गृहस्थांनीं आणखी कांहीं सांगण्यास सुरुवात केली. माझ्या चलबिचल झालेल्या मनाकडे--त्याचें प्रतिबिंब माझ्या चेहऱ्यावर उमटलें असलेंच पाहिजे.--पण त्याकडे कचेरींतल्या लोकांचें लक्ष कसें जाणार ?

विडी ओढणारा गृहस्थ मजकडे वळून, अगदीं सलगीच्या आवाजानें, जशी काय त्याची माझी जानपच्छान आज कित्येक वर्षांची आहे, असें दाखवीत म्हणाला, " बरं काय मिस्टर, आपला हा साहेब भारी स्तुतिप्रिय आहे. सगळं चुकलं

तरी चालेल. काम नाहीं झालं तरी चालेल, पण साहेबाची टिमकी ही वाजविलीच पाहिजे. एवढं ज्यानं संभाळलं, त्यानं ऑफिस जिंकलं."

"पण हे आजकालच्या शिकलेल्या यांच्या सारख्या ताज्या रक्ताच्या तरुणांना कसं जमायचं, याचीच पंचाईत आहे!" मला समजूत देणारे गृहस्थ म्हणाले, "कायहो, कशाला असल्या नरकपुरींत शिरलांत? पोट भरायला या पेक्षां दुसरी एकादी सोय नव्हतीच का कुठें? आम्हीं एक जन्मभर जोडे खात खात दिवस काढले, शिकलों नव्हतों, दुसरा कुठचा तरणोपाय नव्हता, ह्मणून इथें आम्हांला तुरमुंडी द्यावी लागली.पण तुमचं तसं नाहीं.तरुण आहांत, शिकलेले आहांत, लाथ माराल तिथं पाणी काढाल, अशी तुमची धमक आहे, मग अशा ठिकाणीं कां घुसलांत हेंच कळत नाहीं!"

"अगदीं बरोबर आहे. एकाद्या चांडाळाच्या घरीं फुकट पाणी भरावं; पण आमच्या साहेबाच्या हाताखालीं काम करणें नको!" दुसरा गृहस्थ उद्गारला. "त्याला समाधान म्हणून कधीं नाहींच. कशावरून खवळेल याचा सुमार नाहीं. एकटा केळकरच बोलून घेतों असें नाहीं. ऑफिसांतल्या प्रत्येकाला महिन्यांतून एकदांतरी त्या पक्वान्नाचें सेवन करावें लागतेंच!"

"पण कांहीं झालें, तरी आपला गोरे साहेब गरीब आहे. पाठीवर हाणील, पण पोटावर नाहीं हाणायचा हं कधीं! बोलेल हवें तें, अगदीं कुत्र्यासारखा वस्सकन् अंगावर येईल–येतोच. पण अंतःकरणांत तसा दयाळू आहे. अंतःकरणांत त्याला जाणीव असते. बोलून गेल्यावर त्याचं त्याला तें टोंचतं, असंही कित्येक वेळां आढळून आलं आहे."

"तसा आपला साहेब मूर्खही आहे हो! एकाचा राग दुसऱ्यावर रागाच्या भरांत काढतो, आणि त्याची चूक त्याच्या लक्षांत आल्यावर पश्चातापही दाखवितो."

"त्याचं काय आहे, मी सांगतों तुह्मांला. त्याचा सारा जन्म अशा नोकरीपेशांत गेला आहे. त्याचा बाप नोकर, आजा नोकर, सगळा गोतावळा नोकरींतच. त्यामुळें त्याला नोकरींतच विलक्षण परब्रह्म वाटतं. घरीं न जातां चोवीस तास त्याला 'ऑफिसांस' च राहायची वेळ आली तरी तो त्यांत

आनंद मानतो, आणि त्याला वाटतें, आपण जसें वागतों तसेंच आपल्या ऑफिसांतल्या सर्व माणसांनीं वागावें ! तसा वागेल तो त्याच्या दृष्टीनें चांगला. वागण्याचा प्रयत्न करील तो बरा ! त्यांत चुकारतट्टूपणा करील त्याच्याविषयींचं त्याचं मत कसलं असलं आहे ? ”

ऑफिसमधल्या लोकांच्या तोंडचें हेडक्लार्कच्या स्वभावासंबंधाचें, हें वर्णन जसजसें ऐकूं लागलों, तसतसें मस्तक अगदींच सुन्न होऊं लागलें. डोळ्यापुढें चक्कर येऊं लागली. विचार–विकारांची भरमसाटच भ्रमंती सुरू झाली. त्या ठिकाणीं बसूं नये असें मनाला वाटूं लागलें. अंगाला ठणका लागल्याचा भास होऊं लागला. आज जावें तें परत उद्यां येऊंच नये, असें एक मन हळूंच सल्ला देऊं लागलें. एक तऱ्हेनें मनोव्यापार असे चालू होते. बाह्योपचारी मी कामाची समजूत करून घेत होतों. कामाची समजूत ती काय करून घ्यायची ? असें त्यांत आवघड तें काय असणार ? समजावून देणारे गृहस्थ जरी शिरा ताणताणून, गंभीर चेहरा करून, ‘ हें काम अवघड आहे, तसें किचकट आहे. या कामाबद्दल साहेब जास्त दक्ष असतो. ’ वगैरे वगैरे पुन्हां पुन्हां पाजण्याचा प्रयत्न करीत होते, तरी मला त्यांची कींव येत होती; हंसूं येत होतें, क्वचित् रागही येत होता ! माझ्या मनांत दोनचारदां येऊनही गेलें कीं, जें हा गृहस्थ बजावून बजावून सांगतों आहे, तेंच उलट लवकरच मलाच त्याला समजावून देण्याची पाळी मजकडे येईल. आणि पद्धति दाखविली, त्यापेक्षां अधिक थोड्या वेळांत, जास्त चांगलें, लवकर व पुष्कळ काम कोणत्या पद्धतीनें केलें तर होईल, हें मलाच त्यांना सांगावें लागेल. पण एकंदरींत तें ऑफिस, त्या ऑफिसांतील काम करणारीं तीं माणसें, आणि ते ‘साहेब’, या सर्वांचा माझ्या मनावर कांहीं विचित्रच परिणाम झाला. ऑफिसांतल्या कामांचा अगडबंब बागुलबोवा, स्वतःचें अज्ञान सफाईनें झांकून त्या कामाचें महत्त्व वर्णन करण्याची शिताफी, ‘ साहेबा ’ ची एकदा भरपूर निंदा, कुचेष्टा, तर दुसऱ्यांदा तितकीच श्ववृत्तीला लाजविणारी स्तुति ! मला तें सहनच होईना.

नोकरीच्या जगांतला माझा पहिला दिवस वर वर्णिलेले देखावे पहात आणि त्याचे निरनिराळे अगदींच अपरिचित परिणाम मनावर घडण्यांत संपत आला, ‘ साहेब ’ ठराविक वेळीं बाहेर पडला. त्यानंतर ‘ नोकरांनीं जितके वाजतां

ऑफिसांतून बाहेर पडावयाचें असतें, त्यावेळीं, उपरणीं झाडून, रुमालटोप्या सांवरीत टांके तुटलेल्या जुन्यापान्या छत्र्या काखोटीला लावीत, आणि फाटके जोडे, तुटक्या वहाणा, फरपटवीत, जो तो बाहेर पडूं लागला. मीही त्यांच्या बरोबरच निघालों. त्यावेळीं माझें मन कोणत्या विचार-विकारांनीं व्याप्त झालें होतें, हें सांगतां येणार नाहीं. मंडळी बाहेर पडली. वाटेंत, कोणी संध्या-काळची भाजी घरीं नेण्याकरितां मंडईकडे वळला. कोणी कुठल्या तरी दुकानावर ' खातेवही ' खरडण्याकरितां चालता झाला. कोणी बरोबरच्याला चढवून, खुषींत आणून, त्याच्याकडून ' चहाचिवडा ' उकळण्यासाठीं गळ्यांत हात टाकून ' चलाहो, आज आम्हांला ' चहा ' तर पाजा, म्हणून शेजा-रच्या " जंटलमेन-सभ्य-संभावीतांच्या विश्रांती गृहांत," घेऊन गेला. मी माझ्या घरच्या दिशेनेंच सरळ निघालों. ऑफिसांतल्या लोकांशीं मी अगदींच नवखा असल्यामुळे बाहेर पडल्यावर माझ्याशीं कोणी फारसें बोललें नाहीं. मी तरी कुणाशीं काय बोलणार ?

पहिल्या दिवशींच इतका मनाचा कोंडमारा झाला, निरनिराळ्या तेवढ्यां-प्रसंगांनीं मन इतकें भांबावून गेलें, कीं त्यामुळें अगदीं गळल्यासारखेंच होऊन गेलें. केव्हां एकदां घरीं जातों, आणि वळकटीला टेंकून आंग टाकतों, असें झालें होतें. रस्त्याच्या बाजूनें मी माझ्याच विचारांत गढून चाललों होतों. वाटेंतच आठवण झाली, कीं मधुकरानें आणि विमलनें आपल्याला कांहीं कांहीं आणायला सांगितलें आहे. आज मी नोकरीला लागलों; म्हणजे आजच कांहीं पगाराचा ' पैसा ' हातीं येत नाहीं. पण हें त्या अजाण अर्भकांना काय सांगायचें ! कसें सांगायचें ? मी कांहीं न नेतां घरीं गेलों, माझीं भावंडें पुढें आशेनें आलीं, आणि मी कांहीं आणलें नाहीं, असें सांगितलें, तर तीं काय करणार आहेत बिचारीं ! हिरमुसलीं होऊन बाजूला होतील. तें मला बरें वाटेल काय ? तें मला सहन होईल काय ? आज नाहीं तरी महिना भरल्यावर तरी ' पैसे ' मिळतील कीं नाहीं, मग भावंडांना हिरमुसलें कां करा ? मनांत आलें, निश्चय केला, आणि आमच्या खातेवाल्या दुकानदाराच्या दुकानासमोर आलों. त्यानें मला पाहिलें. मी आज ऑफिसांतून-नोकरीवरून परत आलों आहें, हें त्यानें ओळखलें. त्याची हास्यमुद्रा झाली, " जी गोपाळ,

या साहेब!" म्हणून त्यानें हटकलें. मी गेलों. गर्दीतल्या बाकवजा फळीवर बसलों. दुकानदारानें मोठ्या आदरानें 'विडी' पुढें केली. मी त्याच्या या आदरातिथ्याबद्दल किंचित् हास्यमुद्रा केली. " घ्या, घ्याहो, आतां काय तुम्हीं हफीसर झाले–जंठलमेन झाले. बिडी प्यायला काय हरकत नाहीं! म्हणून दुकानदारानें मोकळ्या मनाचा विनोदही केला. मला नोकरी मिळाल्याबद्दल त्यानें सहानुभूतियुक्त समाधान व्यक्त केलें. "आजकाल नोकऱ्या मिळताहेत कुठं? सगळीकडेच चणचण झाली आहे, त्यांत तुम्हांला नोकरी मिळाली फार चांगलं झालं. आपण तुम्हांला याच भरंवशावर उधारपाधारीची मदत करीत आलों. अशीही मदत आजकाल कोणी करीत नाहीं. जग मोठं कठीण आहे. कोणी कोणाला ओळखांत नाहीं. माणसाची पारख राहिली नाहीं." वगैरे वगैरे अघळपघळ बोलला.त्यांत स्वतःची स्तुति,व माझ्या 'नोकरी'बद्दल आनंद,याचा भाग किती वेळां तरी आला.उभ्या आयुष्यांत सदर शेटजी माझ्याशीं मोकळ्या मनानें आजच अघळपघळ इतकें बोलला. इतका माझा मान सन्मान केला. यापूर्वि साभानसुमान न्यायच्या वेळीं बोले, पण अगदींच तोलून. गंभीरपणा जास्त ठेवी. आजचा मान 'माझ्या नोकरीला, नोकरीमुळें माझ्या हातीं मिळणाऱ्या 'पैशा'ला होता, मला नव्हता. माझ्या मनांत एक विचार उभा राहिला. "जग हें असेंच!" दुकानांतून उठायच्या वेळीं मी दुकानदाराकडून हव्या होत्या त्या जिन्नसा घेतल्या. त्यानेंही दिल्या. मी दुकानदाराचे हस्तिदंतीयुक्त औपचारिक आभार मानून बाहेर पडलों.

आणखी जरा पुढें आलों. भावंडांना हिरमुसलें न करतां आनंदित करतां येईल, या कल्पनेनें मीही कांहींसा आनंदित झालों होतों. त्या हंसऱ्या चेहऱ्यानें मी आजूबाजूला पहात चाललों, माझें मलाच वाटलें, जग मी हंसत आहें, हें पाहून हंसणार तर नाहीं? इतक्यांत शेजारच्या एका जागेंतून ओळखीचा हास्यध्वनि ऐकावयाला आला. लक्ष गेलें. तों खरेंच. तो हंसणारा आमचा श्रीमंत सावकार 'जगन्नाथ' होता. त्या ठिकाणीं तो सहज गप्पाटप्पा मारीत बसला होता. मी त्याला पाहिलें.त्यानें मला पाहिलें, आणि त्यानें मला बोलावलें.

"वाः वामन! पाहून पुढें चाललास काय?–चल ये!"

मी मुकाट्यानें त्याच्याकडे गेलों.

" हं ! कसें काय ? ठीक ! "

मी मानेनेंच ' होय ' ह्मटलें.

" बरें, बरेच दिवसांत कुठें दिसला नाहींस ? बाकी मी तरी बरेच दिवसांत इथें आहे कुठें ह्मणा ! बरें, काय तुझ्या नोकरीबिकरीचें कुठपर्यंत आलें आहे ? मिळाली कां कुठें ? आजकाल नोकरी मिळणें ह्मणजे पूर्वपुण्याईच ह्मटली पाहिजे, असें झालं आहे !--मिळाली कां मग नोकरी ? " जगन्नाथानें चौकशी केली. जगन्नाथासारख्या श्रीमंताला, माझ्याबद्दल इतकी चौकशी करायची आठवण झाली; हेंच मी जास्त समजलों.

" मी आजच नोकरीवर रुजू झालों ! " मी माहिती दिली.

" आजच नोकरी मिळाली ? आजच ?" जगन्नाथानें कपाळावरच्या आपल्या दोनच आठ्या चढवून, डोळे ताणून, हात पुढें करीत उत्सुकतेनें विचारलें, " तरीच तूं हंसत हंसत इकडे तिकडे पहात, विजयी मुद्रेनें चालला आहेस ! मला देखील ओळखलें नाहींस. पाहून तसाच पुढें चालला होतास ! वाः ! वाः! काय हें वामन ! अरे, आम्हीं तुझे मित्र ना ?--बरें, तुला नोकरी मिळाली. ठीक झालें. पेढे काढ नोकरीचे. फीस्ट दे आह्मांला ! आमचा हक्क आहे !--कां हो ? घ्यायची कीं नाहीं याच्याकडून फीस्ट ? दिली पाहिजे कीं नाहीं यानें?" ज्याच्याकडे जगन्नाथ बसला होता, त्याच्याकडे वळून त्यालाही त्यानें साक्षीला बोलावलें. मी स्थिर दृष्टीनें जगन्नाथाकडे नुसता पहात राहिलों.

माझ्या पाहाण्याचा हेतु जगन्नाथाच्या कदाचित् ध्यानांत आलाही नसेल.पण त्या तिऱ्हाईताच्या ध्यानांत आल्याशिवाय राहिला नाहीं. तो जगन्नाथाला उद्देशून म्हणाला,

" सावकार ! परवां त्या याच्याशीं धंद्यांत–फुकटांतच–भागिदारी तुह्मीं मिळविली म्हणून सांगितलें, त्याला किती दिवस झाले ? "

" कां ? " डोक्यावरची फरकॅप पुढेंमागें सारीत जगन्नाथानें डोळे ताणून उत्तर दिलें, " दोन महिने होऊन गेले कीं त्याला ! "

" असें ! दोन महिने होऊन गेले ? " तो तिऱ्हाईत किंचित् हंसून म्हणाला, "अन् सावकार, त्याबद्दलचे पेढे, तुमच्याकडून अजून नाहींत !

आहे काय हें?" नंतर तो गृहस्थ मजकडे वळून ह्मणाला, अहो, यांच्याकडून फीस्ट-पेढे, घेतल्याशिवाय तुह्मांला यांना पेढे-फीस्ट द्यायची जरूरी नाहीं अं!"

"वाः! वाः! वाः! वाः! हें काय? हें काय? दादासाहेब! ती गोष्ट आतां जुनी झाली!"

"तशीच यांच्या नोकरीचीही गोष्ट दोन महिन्यांनीं जुनीच होईल!" तिऱ्हाईतानें टोला मारला! जगन्नाथाचा चेहरा पाहण्यालायक झाला! कपाळ घामानें डबडबलें! कपाळावरच्या एका बाजूस कशानेंशा पडलेल्या खांचेंत कितीतरी घाम सांचला. आणि काळ्या जमीनिवर पाऊस पडून गेल्यावर, सांचलेल्या पाण्यावर मावळत्या सूर्याचे तिरपे किरण पडले म्हणजे जसें दिसतें, तसें जगन्नाथाचें तोंड दिसूं लागलें! त्याला कांहीं बोलतां येईना! पण नुसतेंच "आँ? काय? हें कसें?" अशा अर्थाची त्यानें डोळे वटारून शुष्क मुद्रा करून त्या तिऱ्हाइताकडे पाहिलें. झक् मारली, आणि वामनाला बोलावून, त्याच्या नोकरीच्या आनंदाकरितां त्याला फीस्ट मागून, आपण आपलीच फजीती करून घेतली, असें त्याला झालें असेल, असें मला वाटलें, आणि मी त्या दृष्टीनें त्याच्याकडे पाहिलें. पण मला त्याचा कांहीं फारसा तेथें मुद्दापत्ता लागला नाहीं. त्या तिऱ्हाईतानें जगन्नाथाची हजेरी पुढीलप्रमाणें आणखी घेतली,—

"सावकार, खरेंच, तुमचा हा चॉकोलेट रंगाचा पपलिनचा अबलॉंग, एकच बटणी, मोठा फॅशनेबल कोट, हा सिल्कन शर्ट, ही सुन्दर किनारी तलम धोतरें, हा क्रोमचा उंची-नटवा पंप, सोन्याचें रिस्टवॉच, यासहित जी आपली सदा नटलेली 'नटा'सारखी भूमिका, ती स्वतः घरच्या पैक्यानें सजवितां, कीं--"

"वाः! वाः! वाः! वाः! म्हणजे? हें काय?-" जगन्नाथ मध्येंच गरजला.

"तसें नव्हे. स्वतःची फीस्ट दुसऱ्याला द्यायची टाळून, दुसऱ्याची मात्र घेण्यांत दक्षता बाळगणारी तुमची 'सावकारी' बुद्धि असल्यामुळें इतकी ऐट तर झाली पाहिजे, पण ती स्वतःच्या घरच्या पैशानें नव्हे, तर ती अशीच

इकडून तिकडून आडवा हात मारून, झाली पाहिजे, असें त्या बुद्धीला वाटणें साहजिक नाहीं का ? म्हणून आपलं विचारलं. दुसरं कांहीं नाहीं ! ”

“बस्स! फार झालं! ” मी मनाशीं म्हटलें. जगन्नाथाला त्याचें कांही कदाचित् वाटलें नसेल. पण मलाच तें असह्य झालें. मी त्यांचा निरोप घेऊन निघालों. त्या तिऱ्हाईतानें जगन्नाथाची केलेली भलती थट्टा मी मनावर घेतली नसून त्यामुळें माझा ग्रह त्याच्या विषयीं बदलला नाहीं, हें जाणविण्याकरिता म्हटले, “ जगन्नाथ, इतक्यांत कुठें परगांवीं जाणार नसलास, तर एकदां घरीं तर ये कीं ! ” एवढें म्हटलें आणि झटकलों, तों नीट घरीं आलों.

नोकरी; नोकरीचें जग; तिथले लोक, त्या बाहेरचे लोक, जगन्नाथासारखी मित्रमंडळी, एक ना दोन, हजारों, लाखों, विचारांची उलथापालथ डोक्यांत चालली होती. सर्वांच्या बुडाशीं काय ? फक्त एक पैसा ! पैसा मिळविण्याकरितां, पैसा टिकविण्याकरितां, पैसा वाढविण्याकरितां, पैशाच्या जोरावर, नुसता दाखवून, नुसतें त्याच्या कल्पनेवर झुलवून, किंवा पाण्यासारखा उधळूनही—सुखाच्या, चैनीच्या, हौसेच्या पाठीमागें लागणारांचा वर्ग, केवळ पोट भागविण्याकरितां, दुपारची वेळ शांत करण्याकरितां ‘ पैसा ’ ‘ पैसा ’ करून त्याच्यामागें लागणारा गरिबांचा वर्ग, केवढ्या तरी मालिकांच्या मालिकाच ‘ सिनेमा चित्रपटा’प्रमाणें नजरेपुढून एकसारख्या सरकत चालल्या होत्या.

त्याच विचारांच्या तंद्रेंत मी घरांत पाऊल टाकलें. दिवे लागणीची वेळ झाली होती. बाहेरच शांता दिवा लावून घेऊन ठेवण्याकरितां येत होती. आई–मधुकर व विमलेला जवळ घेऊन “ शुभं करोति कल्याणं, आरोग्यं धन संपदा–” वगैरे शिकवून दिव्याला नमस्कार करावयाला सांगत होती !

माझें गरीबाचें तें घर ! आईसारखी देवता ! शांतेसारखी पवित्र प्रेमळ मैत्रिण, मधुकर–विमलसारखीं निष्पाप, गोड भावंडें पाहून क्षणभर मी दिवसाचा सर्व ताप, दिवसभरांत नानातऱ्हेच्या चित्रांच्या दर्शनांनीं मनाला आलेली प्रक्षुब्धता, वगैरे पार कोठच्या कोठें विसरून गेलों !

मला पाहतांच भावंडें धांवत येऊन बिलगलीं ! “ आई, भाऊ आला आपला ! ” मी त्यांच्या हातीं आणलेल्या जिन्नसा दिल्या. तीं मुलें आनंदानें नाचूं बागडूं लागलीं. मी कपडे वगैरे काढून आईजवळ येऊन बसलों. नोकरी

पत्करून, एक दिवस नोकरी करून घरीं येण्याचा पहिला दिवस तो. मला नोकरी मिळण्याचा सात्त्विक आनंद, आईला किंवा शांतेला होणें अपरिहार्य होतें. आईनें अगदींच खोटक प्रश्न माझ्या ऑफिससंबंधानें, कामाच्या त्रासदायकपणासंबंधानें, विचारले. मीही कामाच्या त्रासाची, किंवा ऑफिसच्या माथे फिरणाऱ्या कुजक्या वातावरणाची कल्पना न येऊं देतां झालें हें ठीक झालें. व मला तेथें त्रासाशिवाय काम करतां येईल असें सांगितलें. आईला बरें वाटलें. आईनें माझ्या पाठीवरून वात्सल्यानें हात फिरविला! माझा सर्व श्रमभार हलका झाला! त्या तशाही स्थितींत सुखाच्या शिखरीं बसलों असतांना, मनांत असा विचार केला कीं, "पैसा" मिळवून या प्रेमळ जीवांना सुखांत ठेवायचं, म्हणजे 'नोकरीच्या जगांत,' कितीही यमयातना असल्या, प्रत्यक्ष मृत्यू आला, तरी तो मला नको का पत्करायला?" मी आईच्या मांडीवर डोकें टेकलें, आणि पाय पसरले. आई हलक्या हातांनीं कुरवाळीत "माझा वामन दमला!" असें कायसेसें पुटपुटली! त्या अनिर्वचनीय आनंदांतच मी किती तरी वेळ डोळे मिटून पडलों होतों!

---

## —प्रकरण ६ वें—

# संसाराची सुरुवात

**ठाऊक कुणाला नाहीं, हा अनुभव सकलांलाही ?**

—श्रीनिवास

सकाळचा सूर्य कोणाला सुखवीत नाहीं ? मनुष्य कितीही कंटाळलेला, त्रासलेला असला, तरी सकाळचीं सूर्याचीं कोवळीं किरणें किती तरी आल्हाद-दायक होतात. जिकडे पहावें तिकडे, आनंद, शोभा, उत्साह, याचाच पसारा पसरल्याचें तीं किरणें आपल्या गुणांनीं व तेजांनीं दाखवितात. त्या शोभेंत दंग होणारा जीव मागील गोष्टी, मागील हालअपेष्टा थोडा वेळ तरी विसरतो. बागेंतल्या एखाद्या सुन्दर फुलाची मिळकत करून घेण्याच्या घाईत, त्याचे सभोंवतालचे काटे हाताला रुतले, तरी त्याकडे त्या वेळचें बेफिकीर मन दुर्लक्षच करतें. चालण्याच्या झपाट्यांत, पादत्राणांत शिरलेला सडकेचा खडा सारखा खुपत राहिला, तरी त्याला झाडून टाकल्याशिवाय बेगुमान मन लांबपर्यंत तसेंच चालावयालाही लावतें. परंतु हें सर्व सहन करून घेण्याच्या बुडाशीं त्यावेळची दैवी अननुभूत प्रसन्नताच कारण होत असते, हें विसरून चालावयाचें नाहीं !

तोच सूर्य जरा वर आला, उन्हाची तिरीप वाढूं लागली, म्हणजे दिवसांतल्या कोणत्याही भागापेक्षां, त्या वेळचीं किरणें अशीं कडकूं लागतात, कीं चांगल्या चांगल्याचा देखील तीं प्राण कासावीस करतात. सनस्ट्रोक होऊन तेथल्या तेथें गतप्राण होण्याची वेळ सुद्धां बहुधा तीच असते. त्या वेळच्या उन्हाचा जाच सहन करणें, आणि त्यांतून सही सलामत निभावून निघणें, ही एक आयुष्यांतील खरी टिकाव धरण्याच्या परीक्षेची महत्त्वाची वेळच आहे, असें म्हणावयाला हरकत नाहीं. माझ्या संसाराच्या सुरुवातीची थोडीशी बाब अशीच नाहीं काय? माझ्या संसाराच्या खऱ्याखुऱ्या सुरुवातीला, मी प्रत्यक्ष मिळविता होऊन, माझ्या कष्टाचा, माझ्या बुद्धीचा ‘ पैसा ’ संसाराकरितां घरीं आणा-

वयाला लागून आज उणेपुरे सहा सात महिने होत आले आहेत. माझा नोकरीचा पहिला दिवस अगदीं कालच संपला आहे,असें जरी वाटत असलें,आमच्या ऑफिसांतल्या भानगडी, ते बेसुमार लोक, तो त्यांचा कुजकट कोतेपणा, त्या जगाची 'सोमलाच्या किड्या'सारखी वृत्ति, अरेरावी, उद्दाम वरिष्ठ, व त्याची खुनशी वृत्ति, या सर्वांचा अगदीं निकट व सततच्या परिचयानें चांगलाच काळाकुट्टपणा दिसूं लागला असला, व नोकरीचें जगाचा वीट, तिटकारा आला असला, तरी पण इकडे त्याच अवधींत काय झालें होतें ?

ऑफिसांत सहासात महिने काढूनही तिथली परिस्थिति माझ्या मनाला संवयीची जरी होईना, उलट दिवसेंदिवस मनाला भिरभिरायलाच लावीत होती, मनाला मुरदाड होऊं देत नव्हती, तरी तेथें केलेल्या कामाचा—शरीरकष्टाचा म्हणा वाटेल तर—कारण माझ्या बुद्धीला करावें लागणारें काम, मी मिळविलेल्या ज्ञानाचा उपयोग तेथें मुळींच नव्हता-पगार जो मिळत असे, तो मी जशाचा तसा घरीं आईजवळ आणून देई. आई शांतेच्या हातीं ठेवी. आणि आई व शांता एक विचार करून त्याचा योग्य विनियोग करीत. लोकांच्या मागल्या देण्यापैकीं किती द्यावयाचे, चालू खर्च किती यांत भागवावयाचा, महिन्याचा महिन्याला त्या पगाराचा वेढा कसा आणावयाचा, याचा दूरवर विचार करून सर्व कांहीं चाले.त्यामुळें पांचसहा महिन्याच्या आंत फारशी जरी कधीं जमाखर्चाची तोंडमिळवणी झाली नाहीं, महिन्याच्या शेवटीं शेवटीं जरी जीव कंठाशीं यावयाचा, तरी संसाराला निश्चित स्वरूप, स्थैर्य, वगैरे येत चाललें होतें, यांत शंकाच नाहीं. चार स्नेही सोबती घरीं आले, एकादा पाहुणा कामानिमित्त चार आठ दिवस येऊन राहिला, मुलांना कांहीं घेऊन द्यावयाचें म्हटलें, तर आतां जीवाची धाकधुक 'आतां काय करावयाचें ? कसें करावयाचें ?' अशा मंत्रानें होईनाशी झाली होती !

विश्वनाथ आणि जगन्नाथ मला नोकरी लागल्यावर चारदोन वेळां घरीं येऊन गेले होते. शांतेच्या मैत्रिणी इंदू व आनंदी पण नुकत्याच येऊन गेल्या होत्या. ती त्यांच्याशीं निःसंकोच मनानें, खुल्या दिलानेंच वागली. मैत्रिणींचा मनासारखा परामर्ष घेण्यांत तिला नको कोण म्हणणार ? आई तर म्हणाली, "बाई, तुझ्या मैत्रिणींचं कांहीं कमी पडूं देऊं नकोस हो ! आपण गरीब

असलों, तरी जें त्यांतल्यात्यांत करायचें, तें मनापासून आणखी भरपूर. खाल्ल्यासंवरल्यानें कांहीं कुणाचं कधीं कमी होत नसतं! कोण खाऊन जाईल, कोण देऊन जाईल."

शांतेला आईच्या या सांगण्याचा कितीतरी आनंद वाटला. आपण, आणि आपल्याला आवडणारीं माणसें, यांचें कौतुक दुसऱ्यांनीं केलें पाहिजे, त्याकरितां आपण आकांडतांडवही करावयाचें, भांडावयाचें, रुसावयाचें, धुसपुसायचें, किंवा जाजवायचें, यापेक्षां आपण कांहींच न बोलतां दुसऱ्यांनीं आपण होऊन गुणगौरव करावयाचा, यांत किती मौज आहे! आणि असेंच व्हावें, असें शांतेला वाटत असे; ती त्याच धोरणानें नेहमीं वागे. "सासूबाईंनी मला इतकें इतकें स्वातंत्र्य दिलेंच पाहिजे, माझीं माणसं येणार, मी अशी अशी वागणार. घर माझं आहे. मी वाटेल तशी वागेन," अशा तऱ्हेनें वागण्यांत पुष्कळ सुनांना गोडी वाटत असेल व वागण्यास मिळतही असेल. पण त्यांत सारा जुलमाचाच राम राम असतो, हें त्यावेळीं लक्षांतही येत नाहीं. त्यापेक्षां सुनेला योग्य स्वातंत्र्य दिलें, म्हणजे तिच्या परिस्थितिची जाणीव झाल्यानंतर, ती कशीही वागली, तरी तिला कोण बोल लावणार? तसें शांतेचें होतें. शांता शिकलेली, व आई जुन्या काळची एक साधीभोळी बाई. पण आईनें आपण शिकलेल्या नसलों, तरी 'सासूपणा' गाजविलाच पाहिजे, या समजुतीनें ती कधीं वागली नाहीं. किंवा शांताही शिकलेली असली तरी सासूचा अडाणीपणा व जुना भोळसटपणा वेळींअवेळीं काढून, तिनें तिचा पाणउतारा केला नाहीं. आपला चांगुलपणा भडक दिसण्यापेक्षां, आपल्या वागण्याचा देखावा दाखविण्याकरितां, ती फाजील बडेजावही कधीं करीत नसे. त्यामुळें माझ्या संसाराची घडी बसायला, शांततेचें, प्रेमाचें, समाधानाचें वातावरण तयार व्हावयाला कितीतरी सुकर गेलें होतें.

शांतेच्या मैत्रीणी शांतेकडे येऊं लागल्या होत्या. पण शांता मात्र अजून कोणाकडे फारशी जात नसे. गांवांतल्या गांवांत तिचें माहेर, पण तिकडेही फारशी फिरकत नसे. लग्न होऊन चुकलें, कितीतरी दिवस होऊन चुकलें, तरी शांतेच्या माहेरच्या माणसांची तिनें असें गरीबीचें स्थळ, माझ्यासारखा वर पसंत केला, म्हणून पडलेली अढी कमी झाली नव्हती. तिचा धाकटा भाऊ,

किंवा त्याच्या बरोबर त्याची थोरली भावजय अधूनमधून घरीं न कळवितां येत असत. शांता त्यांच्याशीं जितक्या चांगल्या मनानें वागतां येईल, तितक्या तऱ्हेनें वागत असे. फक्त त्यांनीं घरीं बोलावलें, तर ती मनःसंयमन करण्याचा प्रयत्न करी, पण तिच्या कपाळाला नाखुषीच्या आठ्या पडत, आणि मान मात्र नकारार्थी हाले. जास्तच झालें, तर ती एवढेंही म्हणे, "बाबांनीं व्यवहारी मनाच्या दृष्टानें मजकडे पहाण्याचें अजून सोडलेलं नाहीं. आईवेगळी मी. आई जिवंत असतीच, तर मला इतकं मनःसंयमन करतांही आलं नसत. पण बाबांच्या व्यवहारी मनानें मला तें शिकवलं आहे. कधींकाळीं मी शोधलेली जागा चुकीची नाहीं, त्यांनीं मला दिलेल्या शिक्षणाचा उपयोग माझ्या इच्छेप्रमाणें करून सुन्दर संसार सजविला आहे, असें त्यांना कळेल, त्यांना पहावासा वाटेल, ते येतील, त्यावेळीं मग काय होईल तें पहातां येईल. तोंपर्यंत चाललेंन आहे. तुह्मीं येतां, भेटतां, बोलतां, बसतां; झालें. असेंच येत चला, ह्मणजे सरलें." अशा तऱ्हेनें, आखीव, रेखीव, स्पष्ट, ठसठशीत, पण नम्रता राखूनच ती प्रसंगोपात्त बोलून जाई.

आईच्या सल्ल्यानें, तिच्याच नजरेखालीं आमचा गरिबीचाच संसार असा टुमदार करायला सुरुवात केली होती कीं, कोणीही निरभिमानानें पाहिलें तर त्यानें मानच डोलवावी. 'पैसा' पुरुषांनीं मिळवावा, पण त्याची व्यवस्था स्त्रियांनीं लावावी; त्यांत त्यांच्या इतकें कौशल्य कोणालाच दाखवितां येणार नाहीं. शिकलेल्या स्त्रियांची कल्पना स्वतः 'पैसा' मिळविण्याकडे वळणें आर्यस्त्रियांच्या दृष्टीनें तरी कमी प्रतीचेंच समजलें पाहिजे, अशी शांतेची समजूत ठाम होती. संसारांत काटकसर, खर्चाची योग्य ठिकाणीं योग्य बचत, कोणतें आवश्यक, कोणतें नावश्यक, याचा दूरदर्शी दृष्टीनें बरोबर विचार करणें, आणि त्या अमलांत आणणें. 'आपण वास्तविक आहोंत' त्यापेक्षां जास्त आहोंत, हें दाखविण्याची बुद्धि, बहुतेकांना असतें, आणि तिला बळी पडून ते वहावत चाललेले असतात, पण त्यामुळेंच केवळ केवढें अनर्थपात होण्याचा संभव असतो, याची पूर्ण कल्पना शांतेला कशी कोणजाणें पण विलक्षण अशी होती. मला आश्चर्य वाटे. मीच एकादे वेळीं वहावें. शांतेला 'अमूक अमूक केलें तर बरें वाटेल' अशा कल्पनेनें कांहीं कमावयाला जावें, तर ती अशा कांहीं

रीतीनें माझी चूक निदर्शनास आणी कीं मी अगदीं ओशाळल्यासारखाच होई.

आपल्या परिस्थितीच्या मानानें दैन्यवाणेंही वागावयाचें नाहीं, याकडे तर तिचा भारी कटाक्ष असे.

याप्रमाणें आमच्या संसाराची घडी बसत चालली होती. 'पैशां'चा पराक्रम पचनी पडत चालला होता. घरची समाधानकारक स्थिति दिसली, तो निर्व्याज आनंद, तो उमदा उत्साह, हीं पाहिलीं, म्हणजे बाहेर केवढेही कष्ट करावयाला, कितीही त्रास सोसावयाला, केवढाही अपमान सहन करून घ्यावयाला मन तयारी करूं लागे. एकाद्या स्नेह्याकडे जाऊन बसायला, मोकळ्या मनाच्या चार गप्पा मारावयाला जावेसें वाटूं लागलें. आणि मी जाऊंही लागलों. रविवारची सुट्टी विश्वनाथाकडे मी गेल्याशिवाय अलीकडे बहुतेक गेली नाहीं. त्याच्याही संसाराची घडी बसत होती. त्याच्याही हातीं कारभार नुकतांच आला होता. त्याचा सावकारीसारखाच कांहींसा धंदा असे. पण तो अगदीं मारवाडीशाही मात्र नसे. त्याच्या वडिलांच्या पासूनची कीर्ती त्याची चांगलीच होती. ती तशीच त्यानें पुढें चालविण्यास सुरुवात केली होती. पुढें विश्वनाथ आपल्या आयुष्यांत ती अतिशय वाढवीलही, असें त्याच्याबद्दल लोक बोलूं लागले होते. तो जसा माझ्याकडे क्वचित् पण मी बोलवीन त्यावेळीं हटकून येई, तसाच, आपल्यासंबंधीं विशेष आस्थेनें सांगेसवरे. माझीही सूचक शब्दांत पूसतपास करी. त्याचें बोलणें थोडेंच. पण त्यांत अर्थ बराच भरलेला असावयाचा. कित्येक वेळेला त्याच्या बोलण्यापेक्षां नुसत्या हंसण्यांत, किंवा कित्येक वेळां मुळींच न बोलण्यांत कितीतरी बोलण्यापेक्षां अर्थ भरलेला आढळून येई. मला त्याची मजा वाटे.

आतांशा जगन्नाथ, विश्वनाथ, व मी यांना वरचेवर वाटेल तेव्हां लहानपणासारखे भेटायला मिळत नसे. जो तो आपापल्या परी निरनिराळ्या रस्त्यानें संसारयात्रेच्या मार्गाला लागला होता. मधूनच कधीं गांठी पडल्यांस एकमेकांची तात्पुरती पण ती मात्र अंतःकरणपूर्वक चौकशी करावयाची, एवढें मात्र होई. त्यावेळीं मित्रांच्या मधूनच गांठी पडल्या किंवा आवर्जून घेतल्या, तेवढ्या वेळांत ज्या गप्पा गोष्टी—हंसणें—खिदळणें—थट्टामस्करी—वगैरे व्हावयाच्या, तर तीं तेवढींच स्थळें संसारांतल्या वाटेवरच्या विश्रांतीच्या जागा वाटत. व त्यामुळें

मागील कष्टांवर विस्मृतीचा बोळा फिरला जाऊन पुढील वाटचालीस जरा अवसान यावयाचें. यामुळें मित्रांच्या गांठीभेटी म्हणजे शीतलचंद्रिकेप्रमाणें वाटत! व सारख्या हव्याहव्याशा वाटत!

पूर्वीचा सलोखा, सलगी, व आपलेंपणा, जगन्नाथापेक्षां विश्वनाथाकडे अजून चांगला आहे, असें आढळून येई. जगन्नाथाची वाटेंत, घरीं, घाईगडबडींत कुठें धूळभेट झाली, तर त्यांच्याशीं निराळेंच बोलावें लागे. किंबहुना, बोलावें लागण्यापेक्षां त्याचें ऐकून घ्यावें लागे असें म्हटलें तर तें जास्त खरें होईल. आणि तेंही त्याचें बोलणें म्हणजे बहुतेक त्याच्याचसंबंधीं, त्याच्या दांडग्या उलाढालीसंबंधीं, मोठमोठ्या प्रवासासंबंधीं, किंवा त्याच्या वैभवाच्या, श्रीमंती ऐषआरामासंबंधीं असावयाचें. त्याला पुष्टी ही दिलीच पाहिजे. मधून मधून त्याच्या आवडत्या-बायकोच्या संबंधानेंही जें सांगेल तें ऐकून घ्यावें लागे. व मीही अगदीं आस्थेवाईकपणानें ऐकून घेई. मनाशीं म्हणे, "मित्राजवळ असें प्रदर्शन नाहीं त्यानें करावयाचें, तर कोणाजवळ? तेव्हां आपलें तरी ऐकावयाला काय बिघडतें आहे? न ऐकण्याची बेपर्वा दाखवून स्नेह्यांत व्यत्यय आणण्यापेक्षां नुसत्या ऐकण्यावरच जर त्याचें समाधान राहून स्नेहाला बाध येत नाहीं, तर आपण तरी तसें कां न करा?"

माझी आणि विश्वनाथाची गांठ पडली, आणि जगन्नाथासंबंधीं जर भाषा निघाली, तर मोठी मजा उडे. पहिला प्रश्न त्यानें मला विचारला, किंवा मी त्याला विचारला, तर अगोदर बहुतेक दोघांनाही हंसूंच येई. अलीकडे तर त्याच्याविषयींचा आमचा सुरुवातीचा संवाद बहुतेक पुढील स्वरूपाचा असे.

"काल जगन्नाथ भेटला होता!"

"मग त्यानें तुला सहकुटुंब प्लेझरट्रिपला एकदोन दिवसांत निघणार असल्याचें सांगितलें असेल."

दोघांनाही हंसू येई. कारण ठराविक छापाचेंच त्याचें तें भाषण त्याच्याजवळ आणि माझ्याजवळही असे.

'फर्स्टक्लासच्या दोन बर्थ रिझर्व केल्या आहेत. हिंवाळ्याकरितां गरम सूट जोड सहा मुद्दाम तयार करण्याची ऑर्डर 'सबनिस कंपनी'स दिली आहे. आनंदीवहिनींकरितांही तशीच बरीच खरेदी झाली आहे, आणि आणखीही व्हावयाची

आहे. ही ट्रीप जवळ जवळ दीड दोन हजार तरी खाऊन बसणार. त्या राव-बहादुरांनीं आपल्याकडे चार आठ दिवस येऊन राह्यचा फारच आग्रह केला आहे. तिकडे गेलंच पाहिजे." वगैरे वगैरे!

"शाबास वामन!"

"कां?"

अगदीं अक्षरन् अक्षर त्याचं लक्षांत ठेवलं आहेस कीं!"

"अरे, आणखी थोडं राहिलंच आहे!"

"काय?"

"सिनेमा प्रोग्रामचीं दोघांचीं सिझन तिकिटं सहासहा महिन्यांचीं काढून आणलीं, संगीत सम्राट मंडळीचींही तशीच विकत घेतलीं, आणखी दुसऱ्याच दिवशीं ट्रिपचें ठरलें! जाणार कीं नाहीं तीं तिकिटं वांया आतां?"

"जगन्नाथाला आतां एकदां सावकाशपणानें सांगितलें पाहिजे!"

"काय?"

"कीं, तुझ्या प्रोग्रामच्या कार्यक्रमपत्रिका तपशीलवार छापूनच काढीत जा!"

"वा:!"

"हो! म्हणजे त्याला नाहा तरी तुझ्यामाझ्यासारख्याला त्याचा विसर पडायला नको!"

या विश्वनाथाच्या बोलण्यानें मला खरोखरच विलक्षण हंसूं कोसळलें. त्यावेळीं त्याच्यामाझ्या मधलें श्रीमंत-गरीबीचें नातें अजीबात विसरूनही जाई. आणि आपल्या मित्रत्वाचीच तेवढी जाणीव शिल्लक राहून मी माझ्या मनाचा कोंडमारा करीत नसे. असें थोडेसें हास्यविनोदाचें बोलणें झाल्यावर, मग किंचित् गंभीर आवाजानें विश्वनाथ मला सूचक असा प्रश्न विचारी, कीं,–

"काय रे वामन, जगन्नाथाच्या आयुष्यक्रमाविषयीं तुला काय वाटतें?"

"मला त्याचा विचार करतां येत नाहीं!"

"कां?"

"तो गर्भश्रीमंत, आणि मी जन्माचा गरीब म्हणून!"

"म्हणजे?"

" म्हणजे असें, गर्भश्रीमंतांनीं जगांत कसें वागलें म्हणजे शोभून जातें, किंवा चालतें, हें मला कसें सांगतां येणार ? आह्मां गरीबांचें जगांत वागण्याचे नियम जवळ जवळ आंखल्यासारखे आहेत, आणि ते मला चांगले अवगत आहेत. तेव्हां मी किंवा माझ्यासारख्यानें कसें वागावें, हें मला सांगतां येईल. त्याचीसुद्धां निश्चित अशी रूपरेषा मला देतां येईल कीं नाहीं, याची माझी मला सुद्धां खात्री देतां येणार नाहींच. "

" असें ! " एवढेंच म्हणून विश्वनाथ थांबे. त्यानंतर मी किंवा विश्वनाथ बोलत बसूं, पण एकमेकांचें मनोगत, जगन्नाथाविषयीं, आम्हांला कळत असे, आणि त्यामुळें त्याच्याबद्दल आह्मी आपापल्या ठिकाणीं कांहीसे उदासवाणे साशंक होत असूं.

अशा प्रकारानें साधारणतः स्थूलमानानें मी, विश्वनाथ आणि जगन्नाथ, यांच्या संसाराची सुरुवात झाली होती. माझ्याबद्दल विश्वनाथ विशेष सहानुभूति दाखवी. आणि जगन्नाथाविषयीं तितकीच बेफिकीरी त्यांच्या बोलण्यावरून नाहीं, तरी वागणुकीवरून दिसून येई. त्याचें कारण मात्र मला--माझ्यासारख्या परिस्थितींतल्या माणसाला ओळखणें शक्य नव्हतें. आणि त्याच्याहीपेक्षां अधिक स्पष्ट, आणि सत्यच बोलायचें म्हणजे, इतकीं वर्षें जगन्नाथ व आह्मी एकत्र सहवासांत राहूनही, मला त्याचा स्वभाव कळला नाहीं. आणि जरी कांहीं चमत्कारिक वाटण्यासारखे त्याच्या वर्तनाचे परिणाम माझ्या मनावर झाले असले तरी, कां कोण जाणें, ते ओठाबाहेर काढावेत, असें मला कधीं वाटलें नाहीं, इतकेंच नव्हे, तर तसें धाष्टर्यही झालें नाहीं. विश्वनाथ मात्र न बोलतांही बेमालूम प्रसंगोपात्त, बरोबर, असें स्पष्ट जाणवून देई कीं, " जगन्नाथ आंतल्या गांठीचा, खुनशी, घातक आणि परोत्कर्ष सहन न करणारा असा असून, स्वतःच्या क्षुल्लक फायद्याकरितां, प्रत्यक्ष जिवश्चकंठश्च मित्राच्या प्राणाविषयींही कठोर होणारा असा आहे. त्याला स्वतांची चैन, स्वतःची बडेजाव, दुसऱ्याच्या जिवावरच गफलतीनें, करावयाला पाहिजे स्वार्थ साधणारा तो आहे. दुसऱ्याचे उपयोगी पडण्याचें त्याला बाळकडूच नाहीं. मिळेल तितकी दुसऱ्याच्या खर्चानें चैनचमन करावयाची, फुकटांत मिळेल तिकडून मोठेपणा पटकावयाचा आणि दुसऱ्याच्या भ्रामक अपराधाविषयीं त्याला रसातळाला

पोंचविण्याची शिकस्त करावयाची. पुन्हां बाह्यात्कारी "वा:! वा:! वा:! काय हें! ठीक!" म्हणून म्हणावयाला केव्हांही तयारीच!

पण कांहीं असलें तरी तो आमचा स्नेहीच होता, आणि त्याला स्नेही या नात्यानेंच शक्य तितकें आम्हीं वागवीत होतों, यावज्जन्म त्याला तसेंच वागवावयाचें असा आमचा निर्धार होता.

आजच्या घटकेला मी कसाबसा स्वतःच्या पायावर उभा राहावयाला लागलों होतों. विश्वनाथ, वडिलांच्या वेळचें मोठेपण कायम ठेवून, आपला बस बसविण्याच्या प्रयत्नाला लागला होता, आणि जगन्नाथानें संसाराच्या सुरुवातीबरोबर, आपण आणि आपल्या अर्धांगीसह–पैशामुळें जगांत मिळणाऱ्या प्रत्येक सुखाची चव– तीही प्रत्यक्ष स्वतःच्या कमाईच्या पैशानें नव्हे हो, तर स्वतःच्या सावकारी बुद्धीचें वाकडें डोकें चालवून, किंवा ऐत्या वडिलांनीं मिळविलेल्या मिळकतीवरच घेण्यास बेछूट सुरवातही केली होती.

सध्यां मला मात्र स्वतःच्या संसाराची घडी बसविण्याच्या उद्योगांत दुसऱ्याच्या चुकीच्या किंवा बरोबर कृत्यांकडे पहाण्यास किंवा त्याच्यावर बरें वाईट बोलण्यासही फुरसत नव्हती. एकदां संसाराच्या आणि व्यवहारी रस्त्याला स्वतःच्या बिऱ्हाडबाजल्यासह प्रवासाला निघाल्यावर दुसऱ्याची विचारपूस करावयाची, किंवा लहानपणची विशुद्ध, अहेतुक, आणि निर्व्याज मैत्री कायम राखण्याच्या आवश्यकतेची आठवण तरी कोणाला व कशी राहणार?

असें आजच आम्हां मित्रत्रयीमध्यें नातें उत्पन्न झालें होतें, गैरसमज पसरत चालला होता, किंवा बुद्धीला भावना व्हावयाली लागल्या होत्या, असें मात्र जरी नाहीं, तरी केव्हां तशी परिस्थिति उत्पन्न होईल, याचा सुमार आम्हां त्रयीपैकीं एकासही सांगतां आला असतां असें कोणासही म्हणतां येणें शक्य नव्हतें.

चालू घडी म्हणजे अशी होती. सकाळच्या कोंवळ्या आणि सुवर्णमय किरणांनीं सुशोभित दिसणाऱ्या संसाराच्या सुंदर बागेंत, तेथील फुलें खुडायला आणि सुखोपभोग भोगावयाला नुकतेंच आह्मी प्रविष्ट झालों होतों, विश्वनाथास, किंवा जगन्नाथास, सुन्दर सुन्दर फुलें काढतांना, त्यांचे कांटे बोंचून त्यांना जर्जर

करीत होते कीं काय, बागेंतल्या वीथिकेमधून हिंडतांना वाळूचे जाड कण पादत्राणांत शिरून, पायाला बोंचून, त्याची कळ मस्तकापर्यंत पोंचवीत होते कीं काय, हें मला सांगतां येणार नाहीं. पण माझी मात्र अक्षरशः तशी परिस्थिति झाली होती. मी तरी माझ्या आईसारख्या देवतेच्या छत्राखालीं, मधुकर-विमलसारख्या स्वर्गीय आनंद देणाऱ्या भावंडांच्या गोड कुजबुजण्यांत, आणि शांतेसारख्या शांत व धीरगंभीरपणानें मार्गदर्शक होणाऱ्या, अलोट स्वार्थत्यागी जन्माच्या श्रेष्ठ सोबतिणीच्या सांगाती असतांना, कांट्यांना, किंवा खड्यांना, मुळींच जुमानीत नव्हतों. एवढें खरें.

शांतेची मानसिक तयारी माझ्याहूनही ध्यानांत घेण्यासारखी असे. एखाद्या रविवारी दुपारच्या वेळीं, आई माजघरांत चौघडी टाकून कलंडली आहे; मधुकर व विमल, आमचा डोळा चुकवून, अभ्यासाचा वगैरे आव आणून बाहेर जवळपासच कुठें तरी स्वच्छंद, आणि बेगुमान खेळत आहेत, शांता कामेंधामें आटपून, मुलांचे, किंवा माझे कपडे शिवायाला घेऊन बसली आहे; मीही जवळच्या एझिचेअरवर पडलों असून, आह्मीं स्वैरसंवाद चालविला आहे. अशा वेळीं बोलण्याच्या ओघांत मी जर शांतेला विचारलें, कीं,—

“ तुझ्या इंदूच्या संसाराबद्दल तुला काय वाटतें ? ”

“ तिच्या मनाची चलबिचल जर झाली नाहीं, तर तिचा संसार सोन्याचा होईल असें मला वाटतें ! ”

“ अन् तुझ्या अनूच्या संसाराबद्दल ? ”

“ वेडी आहे ती ! अवेळीं, अजाणपणीं भकलेली पोर आहे ती !—देवदयेनं तिचे डोळे जर लवकर उघडले नाहींत,—तिची आज कल्पना, पैशांच्या जोरावर जगांतलीं सारीं सुखं आपल्या पायांवर लोळवीन अशी आहे—तर तिचें भवितव्य एक परमेश्वरच जाणील ! ”

“ आणि आपल्या ? ” मी अगदीं, चाचरत, अगदीं थोड्या शब्दांत विचारण्याचें धाडस करी, त्यावर ती किंचित् काळ थांबे. तिचें मुख गंभीर होई. पण त्यावर उदासीनता, किंवा खिन्नता याचें नांवही नसे. ती उत्तेजीत शब्दानें ह्मणे—

" आपल्याला सहनशीलता, उद्योगाची चिकाटी, निंदा सहन करण्याची शक्ति, मनाचे समाधान, हीं सर्व सतत टिकवितां आली,—"

" तर खात्रीनें आपण सुंदर संसार करूं ! " मी मोठ्या उत्साहानें तिचें वाक्य पुरें करी ! आणि पुढें किंचित् हंसत म्हणे, " माझ्या हातून अजून फार चुका होतात नाहीं ? "

" कोण जाणें ! " शांताही हंसून म्हणे !

" वा: ! म्हणजे मी कधींच चुकत नाहींच वाटतें ? "

" असं कुठं म्हटलं आहे मी ! माणूस म्हटलें कीं त्याच्या हातून चूक व्हायचीच ! "

" पण थोडीशी चूक झाली, तरी ती सुखाच्या संसाराचा सत्यनाश नाहीं का करीत ? "

" होय ! "

" मग मीच चुकलों तर ? "

" अन् मीच चुकलें तर ? "

" मी सांवरून धरणं माझं कर्तव्य आहे ! पण मी चुकलों तर तूं सांवरून धरशील ? " मी कांहीं विलक्षण आवाजांत विचारलें.

शांतेनें या वेळीं एकदांच निमिषमात्र मजकडे टक लावली, आणि कांहीं न बोलतां तिनें आपले डोळे हातांतील कामाकडे वळविले. त्या न बोलण्यानेंच तिनें माझ्या प्रश्नाचें उत्तर दिलें. असें चालतांना आह्माला कोण आनंद होई. आणि खरोखरच आह्मीं सुखाचा संसार करूंच करूं असा आह्मांला भरंवसा वाटूं लागे. थोडा वेळ तसा जाऊं दिल्यावर आम्हीं त्यावेळीं एकमेकांकडे पहात असूं. त्या पहाण्यांत किती तरी अर्थ भरलेला असे ! आमचें संसाराच्या सुरुवातीला हें असें होतें–पण पुढें ?

---

## —प्रकरण ७ वें—

# व्यवहारीं

**सर्वेगुणाःकाञ्चनमाश्रयन्ते ।**

व्यवहार म्हणून म्हणतात तो कांहीं न्यारा आहे. त्या व्यवहाराची आणि माझी अजून जानपछानही झाली नव्हती. लहानपणाच्या दृष्टीनेंच मी अजून जगाकडे पहात होतों. जग मला अतिशय सुंदर दिसत असे. मध्यंतरीं एकाएकी संसाराची जबाबदारी डोक्यावर आली, आणि त्यावेळीं जगाशीं अपरिचित असलेलें माझें मन गांगरलें! व जगाविषयीं मला रागही आला. ज्यावेळी मला भिक्षा मागावी लागणार काय ? मला हमाली करावी लागणार काय ? हे प्रश्न जळजळांत डोळ्यापुढें उभे राहिले होते, नोकरीसाठीं दररोज ऑफिसेसच्या पायऱ्यांची चढउतार करी, पण नन्नाचाच पाढा पाठ करीत घरीं परतत होतों, त्यावेळीं जगाला मी माझ्या गुणाची, माझ्या शिक्षणाची, माझ्या माणुसकीचीहि परवा नाहीं, म्हणून मनांतल्यामनांत शिव्याही दिल्या. पण मला नोकरी लागली, माझ्या संसाराचें बस्तान बसूं लागलें. महिन्याच्या महिन्याला माझ्या श्रमाचा ' पैसा ' घरीं येऊं लागला, त्यावेळीं तो मनु पालटला. आणि जगाविषयींचें माझें मत पुन्हां पूर्वस्थलीं आलें. कॉलेजांतल्या स्वतंत्र वातावरणाची च्छटा पूर्णांशानें नाहीं, तरी बरीच माझ्यामध्यें उद्‌भूत झाली. माझ्या ' उच्चशिक्षणा ' चा उपयोग करून घेण्याची जगाला जरी अक्कल नसली, तरी त्या मानानें मी कांहींच विशेष न करितां ' पैसा ' ओढूं लागलों, याचाच अभिमान मला वाटूं लागला. ऑफिसांतल्या जुन्या खोडाशीं वितंडवाद घालतांना मी अगदीं पूर्ण आवेशानें त्यांना निरुत्तर करूं लागलों.

" पैसा मिळविणं फार कठीण आहे ! "

" तें तुमच्यासारख्याला. माझ्यासारख्याला मुळींच नाहीं. "

" भ्रम आहे हा ! पैशांचा गुलाम व्हावं लागतं, त्याच्याकरितां ' अपमान, उपहास ' ही पदोपदीं मुकाट्यानें सहन करावें लागतात ! "

" तें काय म्हणून ? "

" व्यवहारच असा आहे ! "

" मुळींच नाहीं. पैसा आमचा गुलाम असून त्याला आह्मीं फटके मारूं तसें त्यानें आह्मांला काम दिलें पाहिजे. "

" हें वाक्य कादंबरींत किंवा नाटकांत चांगलें शोभेल ! "

" तें कां ? त्याचा प्रत्यक्ष पुरावा म्हणजे मीच नाहीं काय? काम करायचें, दाम घ्यायचे. कामांत कसुर झाली नाहीं, वागण्यांत चूक घडली नाहीं, आह्मीं जगांत सर्वांशीं खुल्या दिलानें, उमदेपणानें वागलों, म्हणजे आमचा 'अपमान उपहास' करण्याची कोणाची छाती आहे ? त्यांतून कोणी तसा प्रयत्न केला, तर त्याचा तिथलें तेथें प्रतिकार केला जाणार नाहीं काय ! ज्याचें रक्त उसळतें, त्याला निष्कारण मान हानी काय म्हणून सहन होईल ? "

" म्हणूनच तुह्मांला आह्मीं अव्यवहारी म्हणतों. म्हणून तुह्मांला अजून बच्चे आहांत, असें मोठ्या दिलगिरीनें म्हणावें लागते. "

ऑफिसला जातांना किंवा येतांना, ऑफिसमध्यें पहिल्या दिवशीं ज्या उतारवयाच्या गृहस्थांनीं कामाची माहिती दिली होती; त्यांची माझी वाटेंत गांठ पडली, ह्मणजे बोलण्यावरून बोलणें निघून वरीलप्रमाणें शेवटीं आमचा सलोख्याचा, पण कडाक्याचा वाद होई. मी ऑफिसांतल्या त्याच गृहस्थाशीं सन्मानपूर्वक, कां कोण जाणें, वागत होतों. इतर सगळ्याशीं बहुतेक तुसडेपणाचीच वर्तणूक असे. कॉलेजचें पाणी अंगांत खेळूं लागलें, ह्मणजे याची टवाळी कर, त्याची फजीती उडव, एकाद्याला तुच्छ लेख, असें करण्याची स्फूर्ति स्फुरे. सारांश, माझें मन अजून खरोखरच व्यवहारी जगाला ओळखीत नव्हतें. आणि मुरदाडही बनलें नव्हतें. तसेंच आजच्यापेक्षां उद्यांच्या विचारांची खरोखरीची माझी दृष्टि उघडली नव्हती. त्यामुळें घराचा गाडा जरासा सुरळीत चालूं झाला, चार लोक घरीं येऊं जाऊं लागले, विचारपूस करूं लागले, बाहेर कोठें गेलें तर मानसन्मान मिळूं लागला. ( मात्र हा मान वरपांगी 'हस्तीदंतीं' पुरताच असतो हें मला कळत नव्हतें. )—आणि मला वाटलें माझी आतां जगांत चहा होऊं लागली. जग मला चांगलें ह्मणूं लागलें, मी जगाला चांगलें लेखूं लागलों. मला वाटायला लागलें, मी आतां झालों. 'पैशा'च्या दृष्टीनें नसलें, तरी गुणाच्या दृष्टीनें जग मला ओळखूं लागलें.

आणि मी आतां लंब्या लंब्या गोष्टी बोलायला सुरुवातही केली. जगन्नाथाची आणि त्याच्या फॅशन्सची उठल्यासुटल्या कुचेष्टा करणें, विश्वनाथाच्या बाह्यतः दिसणाऱ्या मंदपणाविषयीं बैठकींत डोळे मिचकावणें, हें माझें कर्तव्य वाटूं लागलें. घरीं यायचें, थोडा वेळ थांबायचें घरांतल्या कोणत्याही गोष्टीकडे पहावयाचें नाहीं, आई एकादी गोष्ट सांगत असली तर तिच्या सांगण्याकडे पुरतें लक्ष पुरवायचेंही नाहीं, लहान भावंडांच्या दिवसाच्या कार्यक्रमाकडे पहावयाचें नाहीं, वेळच्यावेळीं शाळेंत जातात कीं नाहीं, त्यांचे अभ्यास कसे असतात, आपल्याला शिकवणी ठेवण्यास शक्ति नाहीं, तर सकाळीं घटकाभर आपणच त्यांना जवळ घेऊन सांगावें, ही बुद्धि सुचेना. ऊठ पळ कुणा तरी स्नेही ह्मणविणारांकडे जा. चार चकाट्या पीट. प्रतिष्ठितपणानें त्याच्याकडून त्याच्या घरची मंडळी जळफळत असतांही ‘ चहा ’ उकळ, आणि त्यांतच प्रौढी मान, याकडे माझा कल वाढूं लागला. आज विश्वनाथाकडे नेहमीं सारखा अगोदर गेलों, तेथें त्याच्याकडे बरींच त्याचीं कुळें आलेलीं दिसलीं. आणि बरेंच देवघेवीच्या जिखीरीचें काम चालल्याचें मीं पाहिलें. मी किती तरी वेळ तेथें उगाच उभा राहिलों. मला वाटलें, आपलें महत्वाचें काम सोडून विश्वनाथ मजकडे लक्ष देईल, पण अगोदर बराच वेळ त्याचें लक्षच माझ्याकडे गेले नाहीं. मध्येंच एकदां त्यानें पाहिलें, पण माझ्या आगमनाची जाणीव त्याच्या चेहऱ्यावर उमटलेली दिसली नाहीं. त्यामुळें मी जरा खर्जील झाल्यासारखा झालों. पण चिकाटी धरून तसाच उभा राहिलों. अखेर कंटाळून कंटाळून जसा परवानगीशिवाय आलों होतों, तसाच परवानगीशिवाय मी तेथून बाहेर पडलों. मुकाट्यानें बाहेर पडावें लागलें. बाहेर पडतांना मन जरा खट्टू आणि विषण्ण झालें. विश्वनाथाचा किंचित् रागसुद्धां आला. पण त्याच्या अनेक अडाणी व भानगडींच्या कुळांच्या समजुती घालण्याच्या महत्वाच्या कामापुढें माझें उगीच स्वागत त्यानें केलें नाहीं, यांत त्याचें तरी काय बिघडलें, किंवा मीं तरी मनाला काय लावून घ्यावयाचें ? अशी कशीबशी स्वतःची स्वतःच समजूत करून घेत घेत विश्वनाथाच्या घरांतून पसार झालों. आतां जावयाचें कोठें ? ऑफिसला जायच्या वेळेपर्यंत, निदान स्नानाची वगैरे वेळ होईपर्यंत वेळ काढावयाचा कोठें ? चला ह्मटलें, विश्वनाथाच्या घरचा

देखावा पाहिला, आतां एकदां जगन्नाथाच्या घरांतला रागरंग अजमावूं. आणि लगेच जगन्नाथाच्या घराकडे पाय वळलेच.

" वाः ! वाः ! वाः ! वामन ! विश्वनाथाकडे जायचें मोडून इकडे कुणी-कडे स्वारी चुकली ! "

" चुकली झालें ! "

" शांतानं दिली का परवानगी इकडे यायला ? " जवळच कायससं करीत असलेल्या आनंदीनें मला उद्देशून म्हटलें.

" म्हणजे ? जगन्नाथ बाहेर जायचा किंवा घरीं राह्यचा, याची सगळी मदार आनंदीवहिनींच्या परवानगीवर असतें वाटतें ? होय जगन्नाथ ? मला नव्हतें हें माहित ! " मी आनंदीची थट्टा थोडी प्रश्नार्थक वाक्यानेंच केली. त्यांनी पण ती हंसण्यावारीच नेली. मी जाण्यापूर्वी नवराबायकोचा कायसा कडाक्याचा वाद चालला होता कीं, काय कोण जाणें ! जगन्नाथाच्या कपाळा-वरच्या अढीच आठ्या कपाळावर स्पष्ट दिसत होत्या. आणि आनंदीचे नाकाचा शेंडा, गाल, ओठ, हनुवटी, रागानें लाल झालेली दिसत होती. एकादी नागीण खवळावी त्याप्रमाणें ती स्त्रीनें जगन्नाथावर खवळली असावी, असा कयास करण्यास कोणतीच हरकत नव्हती. काय असेल तें असो, जग-न्नाथ, जगांत वाटेल त्याला, " वाः ! 'हो,' 'उद्यां'" अशा दोन शब्दांनींच अर्धमेला करण्यांत तरबेज झाला होता, पण त्याचें त्याच्या बायकोपुढें मात्र कांहीं चालेनासें झालें होतें, असे हळूं हळूं सगळ्यांच्या लक्षांत यावयाला लागलें होतें. आनंदीच्या भडक स्वरूपांत जगन्नाथाची बुद्धि आणि स्वतंत्रता अजीबात विरून गेली होती, असें कोणीं म्हटलें असतें तरी त्यांत कांहीं वावगें झालें नसतें. जगन्नाथाच्या दिवसाच्या चैनीचा एकादा पदार्थ घरीं नाहीं आला तरी चालेल, पण आनंदीनें आपल्याकरितां बुचड्यावर घालायचा ' गजरा ' जगन्नाथानें कोणत्याही सबबीवर आणला नाहीं, तर त्याची मात्र क्षमा नाहीं हं ! तो आलाच पाहिजे ! आणि आनंदीच्या सौंदर्याच्या आहारी पडलेला जगन्नाथ काय करणार बिचारा !–आनंदीची लहानमोठी मागणी त्याला निमूट पुरवावीच लागे. जगन्नाथआनंदीचा चालू संसार म्हणजे असा होता;—

" आतां अमूक पाहिजे वाटलं, जा मार्केटांत, आण, कर त्याचा उपयोग. आतां अमूक ठिकाणीं प्लेझरट्रिप काढावयाची म्हटलं, कीं तयारी झाली पाहिजेच. आज कोण अमूक मैत्रिणी घरीं यायच्या, त्यांच्याकरितां हें करायचं कीं लगेच त्याची तयारी. जिथें तिथें आनंदीचा मोठेपणा दिसला पाहिजे ना ? तें सारें जगन्नाथाकडून कसें करून घ्यायचें हें तिच्या आतां चांगलें लक्षांत येऊन चुकलें होतें. जरा जगन्नाथाचा कुठें नकार दिसला न दिसला, कीं आनंदीनें घातलाच थैमान ! नुसत्या नाकमुरडण्यानें, केव्हां अबोला धरून, केव्हां डोळयांत घळघळ पाणी वहावयाला लावून, तर केव्हां मायावीपणानें चटकन् लाडीगोडींत आणून पुरुषाला आपला गुलाम बनवावयाचें, व आपण, आणि आपल्या तैनाति या शिवाय त्याला जगांत दुसरीं महत्त्वाचीं कामें सुचूं नयेत, किंवा नसतातच, अशी त्याची दृढ भावना कशी करावी, हें आनंदी-सारख्या स्त्रीला उत्तम कळते, ती तशी वागते; व जगन्नाथासारखे जगांत शहाणपणाचा दिमाख दाखविणारे आपल्या आनंदीसारख्या बायकोच्या पुढें केवळ बाह्यसौंदर्यलोलुपतेमुळें लाचार झालेले आढळून येतात, आणि मग मनाला जें कांहीं वाटतें तें वाटतें.

माझ्या आगमनानें जगन्नाथ व आनंदी यांच्या बोलण्याचा पूर्वरंग पालटला एवढें खरें. जगन्नाथाच्या चेहेऱ्यावर व्यवहारी हास्य चमकूं लागलें. आनंदीची श्रीमंती मिजास तिच्या चेहऱ्यावर वावरूं लागली, आणि नवराबायकोंनीं एक दिलानें मला ' चहा फराळा ' चा आग्रह चालविला. जगन्नाथानें नुसता ' चहा ' सांगितला. तर आनंदीनें नोकराला ताबडतोब मंडईंत जाऊन ताजीं फळफळावळें आणायला आज्ञा फर्माविली. मी, सारखा ' नको नको, ही का चहाफराळाची वेळ का आहे ? मी आतां घरीं जाणार, दोन तांबे अंगावर घेणार, जेवणार कीं ऑफिसचा रस्ता धरणार, " असें एकसारखें सांगत सुटलों. अखेर उठून निघालों दखील. त्यावेळीं नवराबायकोचा 'चहा फराळा'चा आग्रह जरासा थंडावला. बोलतां बोलतां, " शांता आमच्याकडे येत नाहीं कधीं, पण परवा आह्मीं तिच्याकडे ' चहा ' ला आलों होतों, मी पण तिला माझ्याकडे बोलावलय. येतें म्हणाली आहे, पण तिचा कांहीं नेम सांगवत नाहीं. का तुमच्या च तिला इकडे येण्याची परवानगी नाहीं, कोण जाणें " आनंदीनें मला हे

सुनावलें. मला तें बोलणें तितकेसें रुचलें नाहीं. पण मी तें तसेंच हंसण्यावर घालविलें.

विश्वनाथाच्या घरी विश्वनाथ कामांत असल्यामुळें माझ्याशीं बोलला नाहीं, म्हणून मन खट्टु झालें होतें. आतां आनंदीच्या बोलण्यांत शांतेला व मला उगीचच टोला मिळाला, म्हणून मनाला चमत्कारिक झालें. " कसलें हें चमत्कारिक व्यवहारी जग ! " असें कायसेसें भरदिशीं मनांत येऊन गेलें. मी व्यवहारी होत चाललों आहें, अशी समज होत चालली होती, ती अशा वेळच्या मनाच्या खट्टुपणानें व चमत्कारिक वाटण्यानें डळमळूं लागली. मी त्याच स्थितींत जगन्नाथाचा उशीर झाला या सबबीवर निरोप घेतला आणि निघालों.

आजचा दिवसच मोठा चमत्कारिक होता कीं काय कोण जाणें ! आग्रह केला असतांही मी जगन्नाथाच्या घरीं चहाफराळाचें घेतलें नाहीं, म्हणून मी निघतांना उभयतांनीही भारीं दिलगिरी प्रदर्शित केली. आनंदीनें तर चांगलाच आव आणला. मला वाटलें, तिला माणूसपणाची जाणीव झाली वाटतें. मी किंचित् हास्य केलें. पुढें तेथून घरीं परतत असतांना कुठेंसा निघालेला विश्वनाथ पुन्हां वाटेंत भेटला. मी जवळ येतांच माझा हात त्यानें आपल्या हातांत घट्ट धरला. आणि मला म्हटलें, " वामन, माफ कर हं. मघाशीं तूं आलास त्यावेळीं मी बऱ्याच महत्त्वाच्या कामांत होतों, म्हणून मला तुझ्याशीं मुळींच बोलतां आलें नाहीं. गैरसमज करून घेऊं नकोस. माफ कर, हं. माझीं कुळें भारी अडाणी, आणि हेकेखोर आहेत. त्यांची समजूत त्यांच्या कलानें, त्यांना समजेल अशा रीतीनें घालावयाची असते. त्याकरितां अतिशय डोकें फोड करावीं लागते. तशीच स्थिति मघाची होती. म्हणून मला बोलतां आलें नाहीं. मग काय रागावणार नाहींस ना ?"

" अरे वाः विश्वनाथ ! माझ्या रागाची पर्वा तुला बरीच वाटायला लागली आहे कीं !" मी जरी खराच रागावलों होतों, तरी तो लपविण्याचा प्रयत्न करीत मी म्हटलें, " आणि तुला कोणीं सांगितलें कीं मी रागावेन म्हणून ?"

पुढें तो हंसून चालता झाला. मीही मार्ग काटूं लागलों. मला आश्चर्य वाटूं लागलें. माझा प्रथम अपमान हे लोक करतात काय, आणि मागाहून त्यांच्या-

बद्दल दिलगिरीचें प्रदर्शन ते का करतात ? यांच्या वर्तनांतलें कोणतें खरें ? अपमान करण्याची बुद्धि खरी की, त्यानंतर दिलगिरी दाखवितात ती खरी ? माझ्या गरिबीचा अपमान करीत असतील, तर दिलगिरी कशाकरितां दाखवितात ? माणूसकी ओळखून ? की मी आतां स्वावलंबी झालों आहें, मिळविता झालों आहें, मला पैसा मिळवितां येऊं लागला आहे, त्यासाठीं ? याचा नक्की निकाल माझ्या मनाला करतां येत नव्हता.

माझ्या मित्रांकडून निष्कारण झालेल्या अपमानांची भरपाई ताबडतोब झाली. त्यानंतर ऑफिसांत गेल्यावरही ऑफिसचा माझ्या बाबतींत नूर पालटलेला मला आढळून आला. आज आमच्या ऑफिसरची मर्जी आमच्यावर सुप्रसन्न होती. मी ऑफिसमध्यें जातांच ऑफिसरनें मुद्दाम मला थांबवून घेऊन माझ्या आजवरच्या झालेल्या कामाची भरपूर स्तुति केली. "तुमच्या कामाच्या चोखपणाबद्दल, व वक्तशीरपणाबद्दल वरच्या ऑफिसकडून उत्तम लिहून आलें आहे, त्यामुळें पुढेंमागें तुह्मांला ऑफिसकडून चांगल्याच सवलती, आणि संधि मिळतील. कदाचित् ऑफिस तुह्मांला आपल्या खर्चानें विलायतेलाही पाठवील." वगैरे वगैरे ऑफिसरनें माझ्यावर स्तुतिचा भडिमार चालविला. ऑफिसांतल्या जुन्या पण अर्धवट लोकांची चांगलीच नालस्ती बोलण्याच्या ओघांत केली. ऑफिसर आपली विद्वत्ता, आपलें नोकरींतील आयुष्य, व अनुभव, शिकलेल्या लोकांविषयींच्या आपल्या समजुती, 'स्लेव्ह मँट्यालिटी'च्या लोकांविषयींचा आपला समज, इत्यादिविषयीं कितीतरी बोलला. माझ्या अंगावर मूठभर मांस आल्यासारखें मला झालें. माझें मन अकुंचित झालें. जगांत यापेक्षां आणखी तें काय मिळवावयाचें राहिलें ? जगांत मानमान्यता, ऑफिसरची आपल्यावर सुप्रसन्न मर्जी, यापेक्षां व्यवहारी जगांत आणखी तें काय मिळवावयाचें ? माझें समाधान झालें. मला आनंद वाटला, मी विजयी मुद्रेनें चोहोंकडे पाहूं लागलों.

आजचें ऑफिसचें कामसुद्धां किती सफाईनें, आणि चपळाईनें करून टाकलें. ऑफिसांतली इतर मंडळी माझ्या मानानें किती तरी दुर्दैवी वाटूं लागली. आणि त्यांच्या दुर्दैवाचें खापर मी त्यांच्या अडाणीपणावर, मूर्खपणा-

वर, अजागळपणावर, आणि इतकें असून त्यांना त्यांतच घमेंड, अभिमान, व मोठेपणा वाटतो, त्याच्यावर फोडूं लागलों.

ऑफिसांतून सुटतांच कोणी ओळखीचा, स्नेह्यांतला, सलगींतला, भेटला, कीं त्याच्यापुढें आमच्या ऑफिसरचीं वर्णनें, लांबलचक त्याचे गुणानुवाद, त्यानें माझ्याविषयीं, आणि माझ्या कामाविषयीं काढलेले प्रशंसोद्गार, अगदीं ऐसपैसपणानें सांगण्याचा सपाटा चालविला. आमचा 'साहेब' असा आहे, ऑफिसांत असा वागतो, अमक्या वेळेला येतो, अमक्या वेळेला जातो. माझ्याबद्दल त्याचें मत असें–असें आहे. तो माझ्याकरितां अमुक अमुक करण्याच्या विचारांत आहे, त्याचें माझें बोलणें झालें. त्यानें असें विचारलें. मी त्याला असें खाड्कन् उत्तर दिलें. तो माझ्या विद्वत्तेला मानतो. एक ना दोन, हजारो साहेबाविषयींच्या गोष्टी त्या.

मी आनंदाच्या भरांत विश्वनाथ आणि जगन्नाथ यांच्या जवळही आमच्या ऑफिसमधल्या 'साहेबा'पासून मिळविलेल्या विमल कीर्तिध्वजाची हकीकत सांगण्यास कमी केलें नाहीं. दोघांनाही या मीं मिळविलेल्या यशाविषयीं साभिमान आनंद वाटला. त्यांनी माझी कौतुकानें पाठ थोपटली. अशीच उत्तरोत्तर तुझी कीर्ति वाढत जावो, असे त्यांनीं उद्गार काढले.

माझ्या गुणांचा, कामाचा, वागणुकीचा गौरवच जिकडून तिकडून माझ्या कानीं येऊं लागला. व्यवहारी जग मला उत्तम प्रकारानें मानूं लागलें. तें व्यवहारी या नात्यानें मानूं लागलें आहे, कीं खरोखरीच्या माझ्या गुणाविषयीं कळकळीनें जिव्हाळ्याच्या तळमळीनें डोलूं लागलें, यांतला तारतम्याचा फरक मात्र माझ्या मनानें जाणला नव्हता, किंवा जाणण्याचें मनांतही आलें नव्हतें. व्यवहारीं मी व्यवहारी झालों आहें, असें मला कोणीतरी सांगत असल्याचा मधून मधून भास होत होता. 'सर्वेगुणाः कान्चनमाश्रयन्ते !' असा कांहीं प्रकार जगानें मला चांगूलपणा देण्यांत असावा, याची हलके हलके माझ्या मनाला विस्मृतीच पडत चालली होती. मन समतोलपणा सोडून हातालगतचीं हलकीं हलकीं सुखें सामान्य व्यवहारी लोकांच्या मनाप्रमाणें आनंद मानण्यासाठीं स्वीकारलीं पाहिजेत, याकडे नकळत झुकूं लागलें होतें.

यांतच आमचा जवळ जवळ तिरस्कार करणारे, शंकर आणि दक्षप्रजापति

यांच्याप्रमाणें मला व स्वतःला लेखणारे माझे श्वशूर, काय वाटून कोणजाणें, एक दिवस आमच्या घरीं कधीं न येणारे, पण मुद्दाम घरीं आले. मी घरीं नव्हतों. संध्याकाळीं परत आल्यावर मला कळले. शांतेशीं नीट मायेच्या शब्दांनीं बोलले. मजविषयीं आस्थेच्या शब्दांनीं पूसतपास केली, शांतेनें केलेल्या आदरसत्काराचा कोणतेही आढेवेढे न घेतां स्वीकार केला. आईशींही औपचारीक व्यवस्थितपणानें बोलून थोडा वेळ बसून मग परत गेले.

रागावलेले वडिल शांत होऊन आपल्या मुलीला अपत्यवात्सल्यानें भेटावयाला आले, याचा आनंद कोणत्या सद्‌गुणी मुलीला होणार नाहीं ? शांता त्या दिवशीं किती तरी आनंदांत होती. तिला आश्चर्ययुक्त आनंदानें बेभान केलें होतें. मी आल्यावर शांतेनें ही हकीकत माझी एकांती गांठ पडतांच, अगदीं हंसत हंसत सांगितली.

" आज एक मोठी आश्चर्याची गोष्ट घडली आहे ! "

" आश्चर्याची ? आणि ती कोणती ? "

" अगदीं पश्चिमेकडे सूर्योदय होण्याइतक्या आश्चर्याची ! आज बाबा आपल्या समाचारासाठीं मुद्दाम भेटायला आले होते ! "

" खरेंच ?! " मलाही अत्यंत आश्चर्य वाटलें. ही गोष्ट घडली कशी ? मीही विचारच करूं लागलों.

मधुकरानें आणि विमलनेंही " भाऊ, तुझा सासरा आला होता. त्यानं आह्मांला खायला दिलं. चित्रं पण कशीं छान छान दिलीं. " ह्मणून सांगितलें.

आमच्यावरचा राग टाकून श्वशूर आले, बसले बोलले, आईलाही त्याबद्दल संतोष झाला. तिनें पण मी जेवायला बसलों असतां बोलून दाखविलें.

मी जरा औत्सुक्यानेंच आईला विचारलें, " आई, हें ग कसं झालं ? त्यांच्या बुद्धीचा असा पालट कसा झाला ? "

आई किंचित् गंभीरपणानेंच त्यावर ह्मणाली, " अरे, व्यवहारी जग हें असंच आहे. तूं आतां मिळविता झालास. चार लोकांत 'तूं बरा निघालास' असं वरचेवर नांव निघायला लागलं तुझं. गेलं असेल कानावर. वाटलं असेल बरं. खरी स्थिति काय आहे, हें एकदां पाहून यावं, असं वाटलं असेल, आले.

अरे, कुणालाही झालं तरी काय, माणूस 'पैसा' मिळवायला लागलं, म्हणजे, त्याच्याबद्दल बरं वाटायला लागतंच ! त्यांत काय आहे ? "

खरेंच. आईच्या एवढ्या सांगण्यांत व्यवहाराचा केवढा अर्थ भरला होता ? मी पैसामिळवावयाला लागलों म्हणून जग मला बरें म्हणावयाला लागलें, हें आईचें विधान मला पटलें. पण तें कां ? याचा विचार करण्याकडे मनाची प्रवृत्ति होईना. 'पैसा' मिळविणें, आणि त्याकरितां जगानें मला मान देणें, याचा अर्थाअर्थी संबंध काय ? हेंच मला कळेना ! लोक पैशाला ओळखतात का माणसाला ? पैशा शिवाय असणारा, तो माणूस म्हणावयाला सुद्धां जग तयार नसतें काय ? अशा तऱ्हेचे विचार मनांत वास्तविक यावयाचे, व्यवहारीं ते यावयालाच पाहिजेत. पण अजूनही व्यवहाराची दुसरी बाजू मला न दिसल्यामुळें मला त्याची पूर्ण कल्पना येणें शक्य नव्हतें !—मी माझ्या मनाशीं अजून घुटमळतच होतों कीं हें व्यवहारीं खटलें आहे तरी काय ? व्यवहारीं कोणाला मानतात ? "

## —प्रकरण ८ वें—

# शांतेनें लिहिलेली 'कले'ची गोष्ट!

बुभुक्षितैर्व्याकरणं न भुज्यते ।
पिपासितैः काव्यरसो न पीयते ॥—सुभाषित

आणखी दोन तीन महिने गेले. माझ्या परिस्थितींत त्या अवधींत सांगण्यासारखा फरक झाला नाहीं. मनाची ओढ व्यवहारीजगांतली सुखें मिळविण्याकरितां अधिक अधिक उत्सुक होऊन ओढूं लागली होती. व्यवहार माझ्या पकडींतून सुटावयाला लागला असून मी व्यवहाराच्या पकडींत हलकें हलकें अडकावयाला लागलों होतों; परंतु हें माझ्या अजून लक्षांत आलें नव्हतें. एकाद वेळीं मनाच्या सुप्रसन्न स्थितींतही मनाला कशामुळें तरी उगाचच हुरहूर लागून राही. असें कां होतें, याची चौकशी करावयाला मन लागलें, तर त्याचा उलगडा होत नसे. आणि मन अधिकच खिन्न होत असे.

मन विसावल्या वेळीं किंचित् ढिलेपणा स्वीकारतें. तशीच माझ्या मनाची परिस्थिति झाली होती. माझ्या संसाराचें बस्तान नोकरीच्या नियमित वेतनामुळें बसत चाललें होतें, हेंच त्याचें मुख्यतः कारण होतें. ही गोष्ट इतर कोणाच्याही लक्षांत आली होती कीं नाहीं, हें जरी सांगतां आलें नाहीं, तरी त्याची जाणीव शांतेच्या चित्तांत निःसंशय होती. ती स्पष्ट असें कधीं त्याबद्दल मला बोलली नाहीं, तरी पर्यायानें सुचविण्याचा प्रयत्न तिचा चाललेलाच असे. मी संध्याकाळीं घरीं आल्यावर, योग्य वेळीं जेवणखाण होऊन आम्ही निद्रादेवीची आराधना करावयाला लागत असूं, त्याच्यापूर्वीं शांतेनें एक नियम ठेवला होता. मला झोंप येईपर्यंत कसल्या तरी चांगल्या मासिकांतील, नियतकालिकांतील, किंवा एकाधा नवीन प्रसिद्ध झालेल्या पुस्तकांतील उद्बोधक मजकूर मुद्दाम खुणा करून ठेवावयाचा तो मला वाचून दाखवावयाचा व त्याविषयीं समतोल अशी चर्चा सुरू करावयाची. त्यामुळें तिची घरचीं कामेंधामें संभाळून तिचें नित्य नियमित किती तरी वाचन होत असे. आणि त्यांतून आणखी एकदां महत्त्वाचा मजकूर मला वाचून दाखवी, व त्यावर उलटसुलट चर्चा करी, व करवी, त्यामुळें वेळ

गमतींत, सुखासमाधानांत जाई, व बहुश्रुतपणांत, व व्यवहारी ज्ञानांत भर पडे ती निराळीच. शांता चर्चेच्या वेळीं कधी चिडत नसे, किंवा मलाही चिडूं देत नसे.

या काळांत आम्हां दोघांचे दिवसभरांत झालेले श्रम विसरल्यासारखे होत. मनें सात्त्विक वातावरणांत वावरून प्रसन्न होत. आनंदानें झोंप येई; आणि ती झोंप दुसऱ्या दिवशींच्या उद्योगाला योग्य तो उत्साह देई. अशामुळें स्वाभाविकच शेजाऱ्यांच्या, आपल्या विषयीं दुष्टपणानें, अरेरावीनें वागणाऱ्यांच्या, किंवा स्वतःला न आवडणारें, न पटणारें वर्तन करणारांच्या विषयीं नसत्या कुचकट गप्पा गोष्टी आमच्यांत कधीं निघावयाच्या नाहींत, आणि त्याच्या योगानें मनाचें वातावरण दूषीत होण्यास संधिही राहात नसे.

शांता घरांतलीं कामेंधामें संभाळून सपाटून वाची, आणि मनाच्या करमणुकीकरितां कधीं कधीं कांहीं लिहीतही असे. तिच्या मैत्रीणींना त्या तिच्या वर्तनाचें कौतुक तर वाटेच, पण गूढही पडे. इंदू बोलण्याच्या ओघांत म्हणे, " शांते, इतकें तूं करतेस तरी केव्हां ? आणि तुला साधतें तरी कसें ? आम्ही बाई, घरकामाखालीं दमून जातों. मग आमच्या हातून कांही सुद्धां होत नाहीं ! मी आतां शाळेंत घेतलेलं शिक्षणसुद्धां विसरत आलें आहें, म्हटलें तरी चालेल ! आणखी तूंच हें कसं करतेस ? "

" मनांत असलं, म्हणजे सारं कांहीं होतं. अगोदर मनांत पाहिजे, मग आळसाला शत्रु करावयाला हवा; म्हणजे बघ, मग कसा चमत्कार होतो तें!" शांता इंदूला अशा तऱ्हेचें, सरळ पण कळकळीचें, आणि खरेंखुरें उत्तर देई.

आनंदी शांतेच्या या उद्योगाबद्दल बोले; पण केवळ हेटाळणीच्या, आणि उपरोधिक अशा स्वरांत. " शांते, या तुझ्या उद्योगाला म्हणावं तरी काय ? करायला लागलीस म्हणजे भारीच बाई करतेस. रात्रंदिवस इतकं कर कर करून मरायचं का आहे तुला ? मला नाहीं बाई हें तुझं करणं मुळींच पसंत ! अग जिवाला जरा तरी विश्रांतीचा विरंगुळा घेत जा ! "

" स्वस्थ बसून राहिलं म्हणजेच विश्रांति होते, हें कुणीं तुला सांगितलं पण अनू ? " शांता हंसतच पण शांतपणानें प्रश्नार्थक उत्तर देई.

अशा तऱ्हेच्या मैत्रिणी--मैत्रिणीमध्यें नेहमीं मजेदार झटापटी चालत. एकदां अशाच मैत्रिणी मैत्रिणी एके ठिकाणीं जमल्या असतां बोलण्यावरून

बोलणें निघून आनंदीनें प्रश्न काढला, " शांते, तूं कितीही संसारांत दक्ष असलीस, आणखी वामनराव नौकरी करून नियमित ' पैसा ' घरीं आणीत असले, तरी तेवढ्यानें काय होणार ? कशीबशीं चार पोटं भरलीं, जाडंभरडं, आणि तेंही अर्धवट वस्त्र मिळविलं, म्हणजे झालं का ? एवढ्यानेंच सारा संसार होतो का ? संसारांत, आगंतुक, आणि ठरावीक मुदतीनें आवश्यक जे मोठमोठे खर्च करावे लागतात, त्याची तरतूद या ठराविक मिळकतीनें ऐन वेळीं तुम्हीं कशी करणार ? "

आनंदीचा हा प्रश्न शांतेला, व त्याबरोबरच इंदूलाही खराच अतीशय महत्त्वाचा वाटला. इंदू तर त्या बिकट प्रश्नानें हतबुद्धच झाली. क्षणकाल शांता विशेष गंभीर दिसली. नंतर तिनेंच उलट आनंदीला विचारलें—

" अनू, जो विचार आतां तूं काढलास, तो खरोखरच चिंतनीय आहे. मीच काय, आपल्याकडे, माझ्याप्रमाणें, किंवा माझ्याहूनही बिकट परिस्थितींत किती तरी कुटुंबांना नांदावें लागत आहे. त्यांच्याकरितां तूं तरी समर्पक उत्तर शोधून काढलें आहेस का ? "

" हो ! " आनंदीनें बिनधोक उत्तर दिलें.

" काय ? "

" अशा कुटुंबांनीं कोणातरी श्रीमंतांच्या सांवलीचा काय वाटेल तें करून आश्रय पत्करावा ! "

" कादंबरी–नाटकांतले परिणामकारक प्रसंग असतात तसले ! एरव्ही जगांत तसें क्वचित्च कोणाच्या नशीबीं असतें. तेव्हां सोडूनच दिलें पाहिजे तें. याशिवाय दुसरी एकादी जडीबुट्टी तुझ्याजवळ असली तर सांगशील का?" शांतेनें पुढें म्हटलें.

इंदूला वाटलें, शांतेनें आनंदीला निरुत्तर केलें. तिला स्वतःला जरी सुचलें नाहीं, तरी शांतेचा विजय झालासें वाटून तिलाच आनंद झाला. शांतेच्या उलट विचारण्यानें आनंदी कांहीं वेळ गोंधळली खरी, पण त्यांतून तिनें जरा वेळानें उत्तर शोधून काढलेंच. हें उत्तर तिच्या खास कांहीं पदरचें नव्हतें. त्यांच्या घरीं ज्या वेळीं माझा विषय सहज केव्हां तरी निघे त्यावेळीं जगन्नाथ वगैरे " वामनानें असें करावयाला पाहिजे होतें, तसें त्यानें केलें असतें, तर

त्याला आजच्याहूनही जगांत जास्त चांगल्या रीतीनें वागतां आलें असतें" वगैरे वगैरे म्हणून. आणि तेंच ऐन वेळीं आनंदीच्या उपयोगी पडलें. ती तेवढी चाणाक्ष होती. स्वतःच्या उधळेपणानें ती व तिचा नवरा जरी आस्ते कदम दारिद्र्याचा खड्डा गांठण्याच्या पंथाला न कळत लागले होते, तरी दुसऱ्यांनीं काय काय करावें, कोणत्या स्थितींतल्या माणसांनीं कसें वागावें, या विषयींचीं व्याख्यानबाजी जगन्नाथआनंदीसारख्या गर्भश्रीमंतीवर पोसल्या जाणाऱ्या व्यक्तींना उत्तम प्रकारानें करतां येते. एवढें मात्र खरें.

"शांते, मला असें वाटतं, वामनरावांनीं ऑफिसांतच अष्टौप्रहर रखडून मोजक्या टिकल्या आणून काय होणार आहे ? घरचें मूळचं तुमचं कांहीं असतं, तर एक गोष्ट वेगळी होती, पण तसंही कांहीं नाहीं तेव्हां वामनरावांनां एकादी '**कला**' हस्तगत करावयाला नको होती का ? निदान तूं एवढी स्वतःला शाहणी म्हणवितेस, तर तुला नाहीं एवढं सांगायचं सुचलं ? आजकाल बाहेरच्या जगांत जरा डोळे उघडून पहा म्हणाव, गायनकला, चित्रकला, लेखनकला, आणि तशीच आजकाल वैभवाला चढलेली नाट्यकला, यांपैकीं प्रत्येक कलेत, परदेशांत काय, किंवा आपल्याकडे काय, किती तरी लोकांनीं पडून कीर्ति, आणि संपत्ति यांचा लाभ करून घेतला आहे. त्यांपैकीं वामनरावांनीं कुठलीही एकादी '**कला**' हाता धरली असती, किंवा धरतील, तर तुमची सदोदितची ही हलाखीची स्थिति खालीनें राहिली नसती—राहणार नाहीं. नाहीं का ?"

आनंदीनें यावेळीं शांतेवर अगदीं मात केल्यासारखें झालें. तिची मुद्रा विजयी दिसूं लागली. संपत्तीवानाजवळ प्रत्येक प्रकारचें शहाणपण असतेंच, हें तत्व आनंदीच्या चेहऱ्यावर पौर्णिमेच्या चंद्राइतकें ठळक दिसूं लागलें होतें. शांतेनें तिचें सर्व बोलणें शांतपणें ऐकून घेतलें. तिनें अशा दृष्टीनें त्या विषयावर कधीं फारसा विचारच केला नव्हता; म्हणून ती तत्काळ त्यावर कांहीं बोलली नाहीं. तरीपण आनंदीच्या बोलण्याचा सर्वस्वी परिणाम तिच्या म्हणण्याप्रमाणेंच केवळ एकदम मन बदलण्याकडे तिनें होऊं दिला नाहीं.

"अनू, तूं सांगितल्या गोष्टीचा मला अजून विचार करावयाचा आहे.

करीन, आणि पुन्हां आपण या विषयावर अधिक बोलूं." एवढेंच शांता म्हणाली. नंतर जरा वेळानें मैत्रिणी आपापल्या घरीं निघून गेल्या. या नव्या विषयाकडे शांतेचें मन चांगलेंच वेधलें. तिनें निरनिराळीं पुस्तकें चाळण्यास जारीनें सुरुवात केली. मूळ कल्पनेचा मुळींच सुगावा न लागूं देतां, तिनें नेहमींच्या चर्चेच्यावेळीं त्या तऱ्हेचे विषय काढून, आपण मुद्दाम आनंदच्या कल्पनेची बाजू घेऊन कित्येक दिवसपर्यंत खल करायला सुरुवात केली. तिनें एकदां सहज बोलतां बोलतां—

"खरेंच, एकदोन वर्षांत मधुकराची मुंज व्हायची. चारदोन वर्षांनीं विमल लग्नाला येणार, त्यावेळीं त्या कार्यांना लागणारी एवढी मोठी रक्कम आपण आणायची कुठून ? आपल्याला देणार तरी कोण ? आणि त्यांतून कोणाला तरी गळ घालून कांहींतरी करून रक्कम काढली, तर ती परत कशी, कोठून, करायची ?" असें विचारलें.

मलाही खरोखर या प्रश्नाचें गूढ पडलें. असा प्रश्न आजवर मी मनापुढें आणला होता कशाला ? प्रश्नाचा गंभीरपणा थोडा बाजूला ठेऊन थट्टेच्या आवाजांत मी उत्तरलों, "नरसोबाच्यावाडीला मुंज फार थोड्या खर्चांत होते म्हणें ! तिथें जाऊन मधुकराला आपण ब्राह्मण बनवूं ! आणखी विमलच्या लग्नाची बाब-अशींच मिटवूं. मुलगी-नारळ घेऊन जो लग्नाला तयार होईल, त्यालाच आपण देऊन टाकूं !"

शांतेला माझी ही खोटी थट्टासुद्धां रुचली नाहीं. ती जास्तच गंभीर झाली. आणि म्हणाली, "इश्श ! हें काय हें बोलायचें ! आपद्धर्म म्हणून वेळेला कांहीं केलं तरी चालेल. पण खरें का तें ? जनरीती इतकाही जर आपल्याला संसार चालवितां आला नाहीं, तर तो तसला संसार करायचा तरी कशाला मग ?"

"मग आतां करायचं कसे म्हणतेस ? सध्यां मी माझ्या शरीर आणि मानसिक कष्टांत तर कसली कुचराई करीत नाहीं ना ? मनुष्य दिवसाच्या पोटीं काम तरी किती करील ?"

"अमेरीकेंतले लोक म्हणें चोवीस तासापैकीं तेवीस तास उद्योग निरलसपणानें करतात ! आणि म्हणूनच अमेरिकेची संपत्ति सध्यां उताला चाललेली आहे. अमेरिकन उद्योग्यांच्या पुढें संपत्ति दासीसारखी अष्टौप्रहर हात जोडून

उभी असते, असेंच परवा कुठं तरी वाचल्याचें आठवतंय नाहीं ? " शांतेनें खोंचक प्रश्नार्थी उत्तर दिलें.

" म्हणजे ? " तरी मी न कळल्याचें सोंग घेऊन विचारलेंच.

" सतत उद्योगाची कांस धरणाराला 'पैसा' कधीं कमी पडत नाहीं म्हणतात!"

" म्हणजे मी उद्योग करीत नाहीं, असें तुझें म्हणणें ? "

" मी कुठं तसं म्हटलं ? "

" मग ? "

" चालू उद्योगाला–तो उद्योग संभाळूनच एकाद्या कलेची जोड मिळवून घेतली असती, तर—"

" मी नाहीं समजलों तुझें म्हणणें ? "

" गायनकला, चित्रकला, लेखनकला, नाट्यकला—किती तरी मनुष्याला ऊर्जीतावस्थेला नेणाऱ्या कला आहेत, त्यांपैकीं एकादी जर हस्तगत झाली असती–"

" तर मधुकराच्या मुंजीचो, किंवा विमलच्या विवाहाची धास्ती उरली नसती. त्या ' कले 'वर भरमसाट ' पैसा ' मारला असतां, आणि त्यावर टोलेजंग कार्यें उठवून दिलीं असतीं, असेंच तुझें म्हणणें ? "

" हो ! "

" मग काय उद्यांपासून एकाद्या गायनशाळेंत नांव घालूं ? आर्टस्कूलमध्यें प्रवेश करून घेऊं ? एकाद्या मासिकाच्या, नाहीं तर वर्तमानपत्राच्या संपादकाची खुर्ची सुशोभित करण्याकरितां धडपड करूं ? कां नाट्यकलेची सेवा करण्याच्या निमित्तानें एकाद्या नाटक कंपनींत शिरूं ?—काय करूं ? नाहीतर एकाद्या हार्मोनियमक्लासमध्यें उद्यांपासून जातों. एकाद्या कथेकऱ्याच्या पाठीमागें उभे तरी राहातां येईल !–नाहीं काय ? " माझ्या या विचारसरणीनें आम्हां दोघांचीही गंभीरता मावळली, आणि दोघेही ' खोखो ' हंसूं लागलों. ' कला ' संपादन करावयाची, आणि त्याच्यावर लूटमाप पैसा मिळवून संसार साजिरा-गोजिरा करावयाचा, ही कल्पना मला, व माझ्या प्रमाणेंच शांतेलाही पुष्कळशी हास्यास्पदच वाटली. कोणतीही 'कला' अंगीं ईश्वरदत्त असावी लागते. तें स्वतःला, व आपल्यावर अधिकार असणाऱ्या कळकळीच्या जबाबदार व्यक्तींनाही समजावें लागतें. नंतर त्या 'कले'ची जोपासना, वाढ, व संगोपन

करण्याकरितां, आपल्या व आपल्या कुटुंबाच्या ठिकाणीं जरूर लागणाऱ्या स्वार्थत्यागाची, खर्चाचा, वगैरे कुवत आहे की नाहीं, हें पहावें लागतें. 'कले'ची जोपासना समर्थांनीं, राजेमहाराजानीं करावयाची असते, कलावंताचा योगक्षेम, व त्याच्या कुटुंबियांचा चरितार्थ, त्या राजराजेश्वरांकडून चालवावा लागतो; तरच 'कला' जगते, कलावंत कीर्तीला चढतात व चढवितात; त्यांना जगाची, संसाराची, आप्तेष्टाची, किंबहुना स्वतःचीही फिकीर नसते. असें एकेकाळीं आपल्याकडे असे. आतां परकीयांच्या सत्तेखालीं सर्व असतांना 'कलेकरितां कला' कशी कुणाला राखतां येणार? आतां 'कलेचा' नाद म्हणून करावयाला लागावयाचें, व तेंच 'पोटाचें' साधन होऊन बसावयाचें, असें झालें आहे. पोटाकरितां विकावयाला काढलेली 'कला' ती खरी कला कोठून असणार? व कलेचं माल झालं कीं तिची किंमत सपली! ती दिसणार तरी कशी? सारांश, सामान्य संसाऱ्याना संसाराच्या -नेटक्या संसाराच्या सोयीसाठीं तरी 'कलेच्या नादाचें वावडें' मानलेंच पाहिजे. 'कले'च्या जिवावर मी आपला सुन्दर संसार थाटीन,अशी उमेद बाळगण, ह्मणजे निव्वळ भूल आहे.'' अशा तऱ्हेची चर्चा कितीतरी वेळ शांता व मी करीत होतों. दोघाचींही मतें जुळतीच येत होतीं. शांता चर्चा करीत असतांना आणखी कसलातरी विचार करीत असावी, अशी मला मध्यंतरी उगाचच शंका आली. आणि मलाही त्या चर्चेच्या ओघांत शांतेनें ही चर्चा कां सुरु केली, ही आपल्याला कितपत लावून घ्यावयाची, याविषयीं कल्पना येऊं लागली. तें आमचें बोलणें केव्हां संपलें, विषय केव्हां बदलला, वगैरे, नंतर माझ्या ध्यानांत कांहींच राहिलें नाहीं.

ही चर्चा होऊन बरेच दिवस झाले होते. आमच्या आयुष्यक्रमांत सांगण्यासारखा फरक कोणताच झाला नव्हता. शांतेचे, मुलांचे नवे कपडे स्वतः शिवणं, काहीतरी वाचणे, काहींतरी लिहिणें, आईशीं तिच्या योग्य बोलणें, सांसारिक कार्यें यंत्रःप्रमाणें चालविण्यांत चूर असणें हें सर्व चाललें होतें. माझा कार्यक्रम यथाक्रम चाललाच होता. विश्वनाथाच्या व्यवहाराकडे कधीं कधीं गेलो असतां नुसतें बसून लक्ष पुरविण्यास, व त्यांतील खाच्याखुच्यांची पाहणी करण्यास मला मिळूं लागलें होतें, तर जगन्नाथआनंदीच्या 'खर्चामुळें' मजा लुटण्याच्या प्रवृत्तीला टंचाईमुळें घसरण लागली असावी, अशी त्यांच्या मधूनच

असंतोषाच्या बोलण्यानें शंका उत्पन्न होण्यासारखी परिस्थिति निर्माण होत होती.

जवळच कसला तरी सण आला होता. त्याकरितां शांतेनें मधुकराला सुरेखसा थोड्या खर्चातला, पण झोंकदार 'स्कॉऊट' ला शोभणारा पोषाख तयार केला, आणि विमललाही नव्या आभरणांनीं नटविली. तीं भावंडें 'वहिनी'नें आपल्याला नटविलें म्हणून नुसतीं आनंदून जाऊन घरभर बागडत होतीं. त्यांचा तो आनंद घरांत मावेना. त्यांनीं आईला दाखविलें, मला दाखविलें; तरी त्यांचें समाधान होईना. शेवटीं मधुकर म्हणाला, "वहिनी, तुमच्या अनूताईना मी बोलावून आणूं ?"

"आणखी मी पण इंदूताईना बोलावून घेऊन येतें." विमल उद्गारली.

शांतेनें दोघांच्या त्या उत्कंठेला आळा घातला नाहीं. तिनें त्यांना त्यांच्या घरीं जायला परवानगी दिली. चिमणा शिपाई मधुकर, आणि कुमारी श्रीमती विमल पडत्या फळाची आज्ञा मिळतांच वायुवेगानें शांतेच्या मैत्रिणींना आणायला पसार झालीं. त्या धावण्यांत केवळ मैत्रिणींना आणावयाचाच हेतु नसून आपण नटला आहोंत, हें दाखविण्याचा होता, हें सांगण्याची आवश्यकताही नाहीं. आज शांताही कसल्या तरी गूढ आनंदांत असावी. तिच्याकडे तिच्याच नांवावर सकाळच्या डाकेनें एक कसलेसें बुकपोस्ट आलें होतें. ती कामांत असतानांच तें बुकपोस्ट फोडून पाहण्याचें करीत होती. तिला तें बुकपोस्ट कोणाला तरी दाखवावयाचें होतें, असें वाटतें. तिच्या मैत्रिणींना दाखविण्यांत तिचा आनंद द्विगुणीत होणार होता.

मुलें इंदूला, व आनंदीला घेऊन आलीं. पुन्हां तिघी मैत्रीणी एके ठिकाणीं जमल्या. आई देवळांतल्या पुराणाला नियमित वेळीं निघून गेली. मीही कोठेंसा बाहेरच गेलों होतों. इकडच्यातिकडच्या गोष्टी झाल्यावर शांतेनें साहजीकसा ओघ वळवून आनंदीच्या हातीं सकाळचें बुकपोस्ट दिलें, आणि म्हटलें, "अनू, मागें एकदां तूं माझ्याशीं ज्या 'कले' विषयीं चर्चा केलीस, त्यावरच या मासिकांत एक छोटीशी कथा आली आहे. मला ती बरी वाटली. आणखी माझ्याप्रमाणें तुलाही ती आवडेल, निदान तुला तिच्यावर विचार तरी करावासा वाटेल, असें मला वाटतें."

"पाहूं, पाहूं," म्हणून इंदुनें तो मासिकाचा अंक मध्येंच आपल्या

हातीं घेतला, आणि "मीच वाचूं का मोठ्यानें ?" असें विचारलें. दोघींची पूर्ण संमतीही न घेतां तिनें एकदम वाचायाला सुरवात केली. गोष्ट अगदीं थोडक्यांत पुढीलप्रमाणें होती:—

## "कलेची कैफियत !"

### (१)

"आई, बाबा, मी आपल्या पोटीं जन्माला आलें. माझे गुण, माझें रूप पाहून त्याप्रमाणें माझें लाडकें नांव तुह्मीं 'कला' असें ठेवलेंत. माझ्या बालपणींच्या बाललीलांनीं, तुह्मीं नेहमीं आनंदसागरांत डुंबत असा. माझे बोबडे बोल, तुमच्या प्रेमळ अंतःकरणांत 'मधुर सारंगीचे गुंगविणारे पडसाद उठवीत. माझे स्वाभाविक खेळ पाहून यमुनासरस्तटाकींच्या बालमुकुंदाच्या गोपगोपींना वेड लावणाऱ्या लडिवाळ लीलांची तुह्मांला आठवण येई ! आणि उठल्याबसल्या माझें कोडकौतुक करीत असा. दिवसेंदिवस मी मोठी होत चाललें. माझे खेळ, माझी आवड, माझी बुद्धि, सगळेंच कांहीं वाढत चाललें. आपल्या प्रेमळ प्रोत्साहनानें आपली कला सृष्टींत जिथें जिथें 'कला' असेल, ज्याच्या ज्याच्या जवळ 'कला' आढळेल, ती शोधण्यांत तहानभूक विसरूनही काल कंठूं लागली. मला आवडणारी 'कला' मला आढळली, तर तिच्याशीं हंसण्याखिदळण्यांत तिच्या सहवासांत दंग होण्यांत, मी सुखसर्वस्व मानूं लागलें. आपण त्या वेळीं माझा धिःकार केला नाहीं. 'कले'चें हृद्गत मला जाणतां येऊं लागलें, कलेचं महत्व मला कळूं लागलं. कलेशीं मला तन्मय होण्याची, तिच्या पायीं देहभान विसरण्याची मला संवय लागली. मला कळायला लागलें कीं, 'कलें करितांच माझा जन्म आहे; मी मोठी झालें. आपल्या प्रेमळ सहवासांत माझें अंतरंग बदलत गेलें. त्याचा आपल्याला सुगावा लागला नाहीं. आपण माझ्या संसाराची, मला योग्य संवगडी शोधण्याची चिंता करूं लागला. आपलीं बोलणीं सुरूं झालीं ! इकडे माझें मन मला आवडणारा संवगडी शोधूं लागलें !

( २ )

"आई, बाबा, तुमच्या लाडक्या 'कले'चा सुखाचा संसार व्हावा, म्हणून तिच्या रूपगुणाला साजेसा, तिला सुखांत ठेवणारा, सत्तेचें, वैभवाचें, पांडित्याचें पाठबळ असणारा, तुमच्या 'कले'च्या पुढें दास-दासी सदासर्वकाळ हात जोडून उभ्या ठेवणारा, जन्माचा सोबती तुम्हीं शोधूं लागलांत. पण त्यामुळें माझ्या मस्तकाची शीर उठूं लागली. धनिक पण अरसिक, सत्ताधीश पण कलेविषयीं उदास, पंडीत पण कलेचा कट्टा-शत्रू, असा मला जन्माचा सांगाती कसा सुखाचा होणार? 'कले'चा अभिमानी 'कले'च्या पायीं आपलें जीवितसर्वस्व अर्पण करणारा, असाच सोबती मला हवा, असें मला वाटायला लागलें. आणि मी तसा 'कलावंत' शोधूं लागलें. माझे विचार आपल्या ध्यानांत आले. आपल्याला ते रुचले नाहींत. मलाही आपली योजना पसंत नाहीं, असें मी लाज भीड सोडून आपल्याजवळ बोलून टाकलें. आपण माझ्यावर रागावलांत, मला 'कळत' नाहीं म्हणालांत, माझें मन बदलण्याचा तुम्हीं प्रयत्न केलांत, पण माझें मन बदललें नाहीं. कसें बदलणार? गुणावर लुब्ध होणारें मन शुष्क नीरस वैभवाला कसें कवटाळायला जाणार?

( ३ )

शेवटीं मी माझ्या मनाप्रमाणेंच केलें. माझे 'कलावंत' मला मला मिळाले. मी त्यांच्या गळ्यांत विवाहमाला घातली. त्यांनीं माझा स्वीकार केला. ते 'कलावंत' आहेत. त्यांनीं संसारावर लाथ मारली आहे. मलाही संसाराचा उत्कट हव्यास नाहीं. माझे 'कलावंत' गायला लागले, म्हणजे विश्व डुलायला लागतें, 'कलावंतां'ना 'शाबासकी' देतें. हेंच माझें पारितोषिक. माझे कलावंत 'वक्तृत्व' दाखवूं लागले, म्हणजे श्रोत्यांना वाटतें त्यांच्या पुढें 'सरस्वति नृत्य' करीत आहे. श्रोते बेहोष होऊन आनंदानें टाळ्या पिटतात. मी त्या आनंदाच्या समाधींत तल्लीन होतें. हेंच माझें माझ्या संसारांतलें सुख.! 'कलम बहाद्दर' बनून जेव्हां माझे कलावंत वाङ्मयाच्या आखाड्यांत उतरतात, तेव्हां कलावंतांच्या लेखणींतून उतरलेल्या प्रत्येक अक्षराला निस्सीम वाङ्मय भक्त 'मोत्याचें मोल' देतो, आणि

त्यांचीं भूषणें शिरीस्कंधीं वागविण्यांत कृतार्थता मानतो त्यावेळीं तुमची ही कला त्रैलोक्यालाही तुच्छ मानते! माझ्या 'कलावंतां'ची अप्रतीम 'चित्रकला' विश्वाच्या प्रदर्शनांत पहिला नंबर पटकावते, विश्व एकमुखानें 'धन्य तो चित्रकार' असे धन्योद्गार काढतें. त्यावेळीं ज्या सुखाचा लाभ मी घेतें, त्याचें वर्णन मी कसें करणार? माझ्या 'कलावंतां'चें रंगभूमीवरील अभिजात अभिनयकौशल्य रसिकवृंद खुल्या दिलानें वाखाणतो, त्यावेळीं 'कलावंतां'च्या या अर्धांगीला स्वर्गदेखील खुजा वाटतो! आई, बाबा, तुमच्या आवडत्या मुलीनं आणखी तें जगांत काय सुख भोगायचें? आणखी सुखी तें कसें व्हायचें?

( ४ )

म्हणून ह्मणतें, आई; बाबा, आपल्या लाडक्या 'कले'बद्दल वाईट वाटून घेऊं नका! मला जसें जन्मांत सुख हवं होतें, तसें तें मला मिळालें, मी सुखी झालें; यांतच तुह्मांला खराखुरा आनंद नाहीं का? लोक म्हणतात, 'कलावंतांना' संसार माहीत नाहीं, पैशांचा किंमत नाहीं, दुनियेची परवा नाहीं, स्वतःच्या पोटाची काळजी नाहीं, मग दुसऱ्याची कोठून असणार? 'कलावंत' तिरसट आहेत, व्यसनाधीन आहेत; मी ह्मणतें हें सगळें खरें आहे. पण असे ते आहेत, म्हणूनच ते खरे 'कलावंत' आहेत. म्हणूनच त्यांच्या आश्रयाला 'कला' राहाते. कलेची त्यांच्या ठिकाणीं एकनिष्ठा कां? तर त्यांचीही तिच्या ठिकाणीं तशीच आहे म्हणून! ते कसेही असोत. ते भिक्षा मागत दुनियेंत भटकत असले, तर मी एक वस्त्रानिशीं त्यांच्या मागें त्यांची झोळी वागविण्यांतच भूषण मानीन. हेंच माझें खरें सुख!

( ५ )

पण आई, बाबा, असें जरी असलें, तरी माझ्या सामान्य संसारी भगिनींनीं माझ्या पावलांवर पाऊल टाकावें, असें मात्र मी कधींच म्हणणार नाहीं. घरोघरीं खरे 'कलावंत' सांपडणें दुर्मिळ, किंबहुना अशक्य! तसेंच सामान्य संसारी भगिनींना माझ्यासारखं संसाराचा त्याग एका गुणाकरितां करण्याचें 'सतीचें वाण' पत्करतां येणंही अशक्य आहे. संसारी

बंधुभगिनींना 'कले'चं अगदीं वावडं असतं; आणि तें त्यांनीं तसें पाळलेंच पाहिजे. शेजाऱ्याच्या गळ्यांत सरी पाहिली, म्हणजे आपण गळ्याला दोरीचा गळफास लावून घेणें जितकें वेडेपणाचें तितकेंच प्रत्येकानें, किंवा प्रत्येकीनें 'कले'करितां संसाराचा सत्यानाश करणें वेडेपणाचें आहे. माझ्या संसारी भगिनींना, 'कले'तली 'कला' ओळखण्याइतकं ज्ञान असलें, त्यांनीं त्या ज्ञानाच्या योगानें 'कले'चा मनःपूर्वक गौरव केला, आणि 'कले'मुळें संसारांत थकल्याभागल्या जिवाला उमेद प्राप्त करून घेतली, म्हणजे 'कले'विषयींचें त्यांचें कर्तव्य संपतें. कोणत्याही मुलीच्या आईबापांनीं, आपल्या मुलीला स्थळ शोधतांना, ती जर खरी सुखीसंसारी व्हावी अशी इच्छा असेल, तर, खऱ्या किंवा खोट्या 'कला' बाजाला आवर्जून वर्जिला पाहिजे. खऱ्या 'कलावंता'नेंही आपली सहधर्मचारिणी आपल्याबरोबर वाटेल त्या हालअपेष्टा सहन करण्याचं व्रत स्वीकारण्याइतक्या खंबीर मनाची तयारीची आहे असें दिसल्याखेरीज वरण्याचें टाळलेंच पाहिजे, कोणाही आईबापांना आपला मुलगा 'संसारी–कर्ता पुरुष' झाला पाहिजे असें वाटत असेल, तर मुलगा संसारावर पाणी पाडणाऱ्या खऱ्या किंवा खोट्या 'कले'च्या नादीं लागतो आहे कीं काय, यावर लक्ष ठेऊन, तसें होत असेल तर अट्टाहासानें त्या वेड्या नादापासून परावृत्त करण्याची सावधगिरी त्या आईबापानीं बाळगिली पाहिजे, असेंच मी म्हणेन. कला ही कलेकरितांच असते. ती संसारोपयोगी करूं पाहणें, किंवा करूं म्हणणें, अगदीं वेडेपणाचें आहे! यापेक्षां बाबा, आई, आपल्या लाडक्या कलेनें आपल्यापुढें आपल्या वर्तीनें, आपल्या समाधानाकरितां आणखी दुसरी कोणती कैफियत द्यावयाची? तेव्हां म्हणतें, माझ्याविषयीं वाईट वाटावयाचें सोडून द्या. प्रेमाचा आशिर्वाद सदैवच माझ्या मस्तकीं असूं द्या; म्हणजे मी सुखीच आहें. आणखी तें जास्त काय लिहूं?

आपली आवडती

"कला"

इंदूनें साग्र गोष्ट वाचली. आनंदी एकाग्र चित्तानें ऐकत होती. शांता इंदूच्या व आनंदीच्या चेहऱ्यावर काय कसे फरक होताहेत, हें सावधानतेनें

पाहात होती. एक प्रकारें, आनंदीच्या मागील एका वेळच्या शहाणपणाच्या सूचनेला तें उत्तरच होतें; व वाचीत असतांना आनंदीच्या तें ध्यानींही आलें होतें. शांतेला हवे होते, ते फरक त्यांना न कळत त्यांच्यावर झालेले पहावयाला मिळाले. आनंदीला बिनतोड उत्तर मिळालें आहे, हें ध्यानांत आल्यावर शांतेला काय वाटलें असेल कोण जाणें !

" कलेची कैफियत " वाचून झाल्यावर तिघींनीं तिघींकडे पाहिलें. जरा वेळ कुणीच बोलल्या नाहींत ! नंतर आनंदी हलकेंच म्हणते, " शांते, कुणी ग लिहिली आहे ही गोष्ट ? "

शांता नुसतीच हंसली.

" शांते, तूंच का लिहिली आहेस ? " इंदूनें जरा उत्सुकतेनेंच विचारलें.

" तिनेंच लिहिली आहे, इतकेंच नव्हे, तर इंदू, तिनें ती स्वतःवरूनच लिहिली आहे ! " आनंदी शांतेकडे पहात म्हणाली.

त्यावरही शांता हंसली !

' कलेच्या कैफियतीचा ' परिणाम त्या शांतेच्या मैत्रिणींवर काय झाला असेल ? त्यांच्यावर काय झाला असेल तो असो; पण मी ज्यावेळीं ती गोष्ट वाचली, ती शांतेनेंच लिहिली आहे, हें जेव्हां मला कळलें, तेव्हां मला मात्र पर्यायानें शांतेनें विलक्षण गूढ असा संदेशच सांगितला आहे, याबद्दल मला शंकाच उरली नाहीं !

त्यानंतर मधूनच कधीं तरी माझें मन मलाच विचारी, " वामन, 'पैसा' कमी पडूं लागला, तर संसार चालविण्या करितां संसारावरच पाणी पाडणाऱ्या एकाद्या ' कले'ची कांस धरण्याचा तुला मोह होणार काय ?–

---

## —प्रकरण ९ वें—

# अमृतपान

**न जाने संसारः किममृतमयाः किं विषमयः ।**

आजकाल शांतेच्या ‘ गोष्टी’चाच विषय जिकडे तिकडे होऊन राहिला होता. इंदूनें विश्वनाथाला ‘ गोष्टी’ची गोष्ट मोठ्या अभिमानानें, आणि प्रौढीनें सांगितली होती, तर आनंदीनेंही जगन्नाथाजवळ त्या गोष्टीचा तुच्छतापूर्वक उल्लेख केला होता. इंदूनें सांगितल्यावर विश्वनाथ हंसला होता. "मग त्या गोष्टीचा बोध तूं तुझ्याकडे काय लावून घेणार ?" म्हणूनही त्यानें तिला विचारलें. जगन्नाथही त्या गोष्टीचा उल्लेख ऐकून हंसला. त्याचें हास्य शांतेच्या हेटाळणीचें द्योतक नव्हतें; तरी ‘ गरीबांना ’ असल्याच गोष्टी सुचावयाच्या, या अर्थाची झांक त्या हास्यांत असावी, अशी शंका घेण्यास पुष्कळ जागा होती !

वास्तवीक आह्मां तिघां मित्रांत कोणत्या एकाद्या ‘ कले’चे हव्यासी, कलेच्या नादीं लागणारे, असे कोणीच नव्हते. विश्वनाथ आपल्या वडिलांच्या पावलावर पाऊल टाकून चालणारा निघाला असल्यामुळें व्यवहाराच्या कलेपेक्षां आणि संभाळून राहण्याच्या रीतीपेक्षां, जास्त कांहीं तो जाणत नव्हता. जगन्नाथाला कांहीं आपल्याकरितां, तर कांहीं बायकोच्या आग्रहाकरितां ‘ कले’ला आश्रय देण्याचा षोक करावा लागत असे. नाटकेंसिनेमाला वाटेल तितक्या वेळेला जाणें. नाटक, नाटकमंडळी, त्यांतील नट, यांची निष्कारण भरमसाट निंदा किंवा स्तुति करण्यांत दिवसांचे दिवस घालविणें, यांतच जगन्नाथ–आनंदीचा केवढा तरी कालापव्यय होई. हें सर्व होई तें कलेचा खरा अभिमानी, किंवा तज्ञ म्हणून, असें जर कोणी म्हणेल, तर तें केवळ चूक होईल. लोक करतात म्हणून, लोक जातात म्हणून, लोक तसें बोलतात म्हणून, आणि विशेषतः हे सर्व ढंग करायला जवळ ‘ पैसा ’ आहे म्हणूनच होत असे. अर्थात् शांतेनें ‘ कले’विषयींचा दिलेला दृष्टिकोण त्यांना कसा रुचावा ?

आनंदी निरुत्तर झाली होती खरी, पण त्यामुळेंच ती शांतेवर एक प्रकारानें चिडलीही होती. गोष्ट वाचल्या दिवसापासून तिचा नूरही बदललेला होता. अंतरंगीं मग खरें खोटें कांहीं असो. त्यानंतर मी नेहमींप्रमाणें विश्वनाथाकडे गेलों असतां कर्मधर्मसंयोगानें त्यावेळीं 'इंदू व विश्वनाथ' यांच्यामध्यें शांतेविषयीं, आमच्या संसाराविषयींच बोलणें चाललें होतें, तें मी ऐकलें. तसेंच एकदां जगन्नाथाकडेही झालें. दोन्हीं ठिकाणचीं तीं वर्णनें वर्णन करण्यासारखींच आहेत. तीं पुढें देतों.

"शांताची गोष्ट वाचायची का?"

"काय करायचं वाचून?"

"वाचीन म्हणून म्हणायचं झालं होतं, म्हणून विचारलं!"

"पण ती तूं जशीच्या तशीच मला सांगितलीस ना?"

"होय. पण—एकदां वाचायचीच होती!"

"म्हणजे, मी एकाद्या 'कले'चा नादीं होतों आहे, अशी तुला शंका आली आहे कीं काय?"

"म्हणजे काय?"

"तसें नव्हे, म्हणजे माझ्या त्या नादावर शांता वहिनीच्या गोष्टीचा उतारा म्हणून तूं देणार आहेस कीं काय असें वाटलें!"

"इश्श! तसं नाहीं कांहीं!"

"मग कसें?"

"शांतानं किती सुन्दर गोष्ट लिहिली आहे, म्हणून आपलं म्हटलें!"

"शांता वहिनी पहिल्यापासून तशी हुषार आहेच मुळीं! म्हणून तर तिनें वामनासारख्याचा संसार रंगारूपाला आणला आहे!"

"म्हणजे?"

"म्हणजे कांहीं तूं आपल्या संसाराची घडी बिघडवितेस, असें म्हणायचा माझा उद्देश नाहीं!"

"शांतासारखं मला वागतां येत नाहीं एवढं खरं!" रुष्ट आवाजांत इंदू पुटपुटली.

" मग आतां असं कर, " विश्वनाथानं मोजक्या शब्दांत सांगायला सुरुवात केली, " शांतावहिनींना म्हणावं—"

" काय म्हणावें ?—"

" कीं, मला तुझ्यासारखं कर ! "

" मी तिच्यासारखी नाहीं झालें तर-तिनें नाहीं केलं तर ?"

" तिला म्हणावं, मला त्रास होतो. घरांत रात्रंदिवस कष्ट पडतात. येणाराजाणाराचं यथासांग करावं लागतं. माझं घरांत कुणी ऐकत नाहीं. माझी घरांत कशावर सत्ता चालत नाहीं. कुणाला कांहीं देईन घेईन म्हटलें तर तें कांहीं होत नाहीं. तेव्हां-"

" पण मी असं केव्हां म्हटलं होतं का ?-"

" पण तूं तें केव्हांच न बोलतां मी नेमकं ओळखलं कीं नाहीं ?"

" मग मला त्यांत शांता काय सांगणार ?-" इंदू आतां जरा चिडली, " माझं नशीब माझ्याबरोबर ! मी शांतेला काय विचारणार, आणि शांता मला काय सांगणार ?-"

" हो, खरंच तें. मीच चुकलों. " विश्वनाथानें पहिल्याच गंभीरपणानें बोलणें चालू ठेवलें.—

" तें तसें शांतावहिनीला विचारून नाहीं भागायचें ! ती सांगायची, माझ्यासारखी आपलं त्यागांतच आनंद मानणारी हो ! यापेक्षां तिला काय सांगतां येणार ? त्यापेक्षां, तुझ्या दुसऱ्या मैत्रिणीला विचारलेंस-अनूवहिनीला विचार, ती सांगेल सगळं कांहीं तुला !"

"मी तिला कांहीं विचारणार नाहीं, आणखी मला तिचं कांहीं ऐकायचं पण नाहीं!"इंदू बोलली.तिच्या डोळ्यांत पाणी आलें.विश्वनाथाचें बोलणें तिला सहन झालें नाहीं. तिला विश्वनाथाच्या बोलण्यांतला गर्भ विनोद ध्यानांतच आला नाहीं. शांतेचें नुसतें गुणवर्णन करण्यांत काय गंमत ? ते गुण आंगीं बाणविण्याचा प्रयत्न करण्यांतच खरं रहस्य आहे. असें गंभीर विनोदाच्या आवरणाखालीं सांगण्याचा विश्वनाथाचा हेतु सपशेल फसला. कारण तिला तो विनोद आहे, हें कळलेंच नाहीं. त्याला तिनें तरी काय करावें ? तिच्या डोळ्यांत पाणी आलेलें पाहिल्यावर विश्वनाथानें तो विषय तितकाच सोडून दिला. शेव-

टचीं कांहीं वाक्यें ऐकावयाला मी हजर होतों. विनोदाविनोदांतच पण 'शांतेचें अनुकरण कर ' हा विश्वनाथाचा उद्देश माझ्या ध्यानांत आला होता. मला तें बरें वाटलें. शांतेची स्तुति मला कां सुखविणार नाहीं ?

जगन्नाथाच्या घरीं पुढीलप्रमाणें मौज चालली होती. आनंदी नटून थटून, जामानिमा करून ' स्त्रियांच्या कला कौशल्याचें प्रदर्शन ' पहायला जाण्याच्या तयारींत होती तिच्या बरोबरीच्या श्रीमंतांच्या ओळखीच्या बायका त्या दिवशीं किती तरी यायच्या होत्या. त्या कसकशा नटून सजून येतील, कोणता शालू नेसतील ? पोलकीं काय किंमतीचीं वापरतील ? निवडक दागिने कोणते घालून येतील, त्या सगळ्या जणींत आपला सवता सुभा आपल्याला कसा दाखवितां येईल, सगळ्याजणींचें आपल्याकडेच जास्त लक्ष कसें वेधवितां येईल, याचाच विचार आनंदी सकाळपासून करण्यांत चूर होती. हें नको, तें हवें, तें नव्हे, दुसरें पाहिजे, असें एकसारखें तिचें चाललें होतें. ती केवळ प्रदर्शन पाहाण्याकरितांच जात होती, असें नाहीं, तर आपल्या श्रीमंतीचें, आपल्या आवडीनावडीचें प्रदर्शन करावयाला जात होती, असें कुणा कुचाळानें म्हटलें असतें, तर तें अगदींच असत्य ठरलें नसतें.

ती आतां जरा वेळानें निघणार, तोंच कुठूनशीं तार आली. त्यांत जगन्नाथाचे कुणी प्रतिष्ठित चारपांच स्नेही आतांच्याच गाडीनें येताहेत, रात्रीं लगेच ते जाणार आहेत, असें होतें. जगन्नाथाला पंचाईत पडली. येणाऱ्या पाहुण्यांची योग्य ती व्यवस्था तर झाली पाहिजे. आणि इकडे आनंदी तर प्रदर्शन पाह्यला निघालेली. आतां काय करावयाचें ? तरी पण त्यानें आनंदीला बोलावून बोलण्याचें धाष्टर्य केलेच !—

" बाईसाहेब,—"

" काय आहे ? "

" आतां आपल्याकडे पांच सहा प्रतिष्ठित पाहुणे यायचे आहेत. आतांच तार आली आहे—"

" मग ? "

" त्यांच्या जेवणाखाण्याची तयारी नको का व्हायला ? ती मंडळी संध्याकाळीं परत जाणार आहेत !— "

" पण मी आतां ' कलाकौशल्या 'च्या प्रदर्शनाला निघालें आहें ! "

" वाः ! वा : ! हें काय ? –पाहुणे आल्यावर त्यांची व्यवस्था झाली नाहीं तर माझें स्वतःचेंच प्रदर्शन होईल ना ? "

" मग त्याला मी काय करूं ? "

" पाहुण्यांची व्यवस्था ! "

" मग त्यांत काय करायची ? स्वयंपाकीण आतांच गेली, तिला पाठूला पाठवून बोलावून आणावं म्हणजे होतंय सारं. त्याला मीच कशाला पाहिजे ! "

"वा: ! वा: ! " जगन्नाथ ठरावीक 'वा: वा: ' करीत म्हणाला, "म्हणजे ? आज आपली स्वयंपाकीण वांईला जाणार म्हणून सांगून नाहीं का गेली ? "

आनंदीला त्या परिस्थितीचा भारी राग आला. तिनें खालचा ओंठ वरच्या दातांनीं चावला आणि ती पुटपुटली, " शेजारच्या खाणावळींतून ताटं मागवावींत पाहुण्यांना ! –मी आतां कांहीं एक करणार नाहीं. ' कलाकौशल्या 'चें प्रदर्शन आहे, मला तिकडं गेलंच पाहिजे. "

" अहो, पण पाहुणे प्रतिष्ठित आहेत ! आपण त्यांच्याकडे चार आठ दिवस उतरलों होतों. त्यांनीं आपली बादशाही बडदास्त ठेविली होती, हें विसरून आपल्याला कसं बरं चालेल ? आपण गेल्या वेळीं त्यांनीं पण असंच कुठलं एकादं ' प्रदर्शन ' पाह्यला काढलं असतं तर ? त्यावेळीं आपल्याला कसं वाटलं असतं ? "

जगन्नाथ बायकोपुढें अगदीं गयावया करण्याच्या बेताला आला होता.

आनंदीला फारच राग आला. तिचें ' कलाकौशल्याचें ' प्रदर्शन पाह्यचं बुडत होतं ना ? रागानें तिच्या डोळ्यांतून आगीच्या ठिणग्या पडण्याच्या बेतांत आल्या होत्या. पण करणार काय? तिला थांबल्याशिवाय गत्यंतर नव्हतें. तिचें मन तितकें मुरदाड झालें नव्हतें. ती स्वस्थ उभी आहे, हें पाहून जगन्नाथ आणखी तिची समजूत घालूं लागला, " तुला ' कलाकौशल्या'चें प्रदर्शन पाह्यला जायचं आहे, हें मला माहित आहे. मला सुद्धां आज 'स्वातंत्र्यसंगीत मंडळी ' आणि ' सम्राट संगीत मंडळी'चा ' संयुक्त खेळ ' पाहायला जाण्याची फार उत्कंठा होती. तो ' खेळ ' म्हणजे कला कौशल्याच्या दृष्टीनें केवळ संस्मरणीय होणार यांत शंका नाहीं. पण करणार काय ? तुझ्याच मैत्रीणीनें–शांता वहिनीनं

' कलेच्या कैफीयतींत संसारी लोकांनीं संसारीं दृष्टीनें ' कलेच वावडं ' मानलं पाहिजे' असें लिहिलें आहे, म्हणून तूंच सांगितलंस ना ? मग आतां तूंच सांग— कला, कलेची आवड, त्याचा अभिमान, आपल्याला या वेळीं सारं कांहीं बाजूला ठेवायला नको का ? शांता वहिनीच्या सांगण्यांत पहा किती या दृष्टीनें अर्थ भरला आहे तो ! "

" याच वेळीं मी त्यांच्या घरांत पाय टाकला होता. शेवटचें शांतेसंबंधाचे सर्व शब्द मी स्पष्ट ऐकले होते. इतक्यांत त्यांच्याकडे येणाऱ्या पाहुण्यांचे टांगे खडखडत दारांत येऊन उभे राहिलेही. मग आनंदी कुठें जाणार ? तिचा जामानिमा, नट्टापट्टा, थाटमाट, सारं कांहीं व्यर्थ गेलं होतं. तिनं त्या दिवशीं स्वयंपाकघरांत किती आदळआपट केली असेल, किती नासधूस केली असेल, हें तिच्या शिवाय कोणालाही सांगतां येणें शक्य नाहीं.

त्या दिवशीं कसली तरी सुट्टी होती. सकाळप्रासूनच कोणत्या कारणानें कोण जाणें मन अतीशय आनंदांत होतें. त्या दिवशीं सकाळपासूनच शांता मला अतीशय सुन्दर दिसत होती ! तिचें स्वाभाविक हास्य आज मला विशेषच खुलून दिसत होतें. ' विराजे शिंदूरे धवलवसनें भूपवनिता !' अगदीं हुबेहुब शांता मला अशीच भासत होती. तिचें गांभीर्य किंचित् शिथिल झालें होतें. मी तिच्याकडे पाहिलें, तिनें मजकडे पाहिलें, दोघांची नजरानजर झाली, कीं दोघांनाही सानंद हंसू येत होतें. कोणत्या निरुपमेय सुखाची ती घडी होती कोण जाणें ! मनाच्या वृत्ति फुलल्या होत्या. गुलाबाचें फूल पूर्ण विकसित झालें म्हणजे त्याची जी सुगंधशोभा अनुभवायाला मिळते, तशीच शांतेची कांती रसरसत होती. ती स्वतःच्याच कसल्या तरी निरुपमेय आनंदांत दंग असल्या-मुळें मधुकराच्या किंवा विमलेच्याही हंसण्या बोलण्याकडे तिचें दुर्लक्ष झालेलें होतें. माझी वृत्तिही मला कांहीं निराळीच झाली आहे, असें वाटत होतें. शांता केव्हां तरी म्हणे, ' मला बटमोगरा, आणखी निशिगंध ' फार फार आवडतो! शरदृतूंतल्या पौर्णिमेच्या ' सुधांशु'पेक्षां दुसरें ठिकाणीं मला मन रमण्यासारखं कांहींच आढळत नाहीं ! " ती असें म्हणत असतां, मजकडे निमिषमात्र माझ्या नजरेला नजर न भिडवितां पाही, त्या वेळीं ती मलाच ' निशिगंध ' ' बटमोगरा ' ' सुधांशु ' वगैरे म्हणत आहे कीं काय, अशी गोड कल्पना येऊन जीव त्याच गोड गुंगीत देहभान विसरून जाई !

त्यांत वरीलप्रमाणें जेथें जावें तेथें शांतेच्या स्तुतीच्या अमृताचें आकंठपान करावयाला मिळालेलें. मग काय विचारतां ? जिवाला कशा अननुभूत सुख-संवेदना होत असतील, हें सांगतां तरी येणें शक्य आहे काय ?

आज अगदीं तसेंच झालें होतें. शांता आनंदांत, मी आनंदांत ! दोघां-नाही कारण कळत नव्हतें. सृष्टिसति हंसत होती, आनंदित झाली होती ! आमच्या आनंदाची भागीदार होत होती ! स्त्रीजातीच्या एका विशिष्ट शोभा-यमान ठिकाणीं शांता विराजमान झाली होती, तर तिनें माझ्याही ठिकाणीं नव जीवनाची प्रेरणा करून एक तऱ्हेचा आत्मविश्वास उत्पन्न करून दिला होता ! जो मी एका क्षणीं ' आह्मीं जगणार कसे ?' या दारुण विवंचनेंत होतों, तोच मी आलिकडे 'विलायतेला जाण्याविषयीं, ऑफिसनें आपल्या खर्चानें मला विलायतेला पाठविलाच पाहिजे, तितकी योग्यता माझी आहेच ' असें बोलूं लागलों होतों. विलायतेहून आल्यावर माझ्या मिळकतींत इतका-असा फरक पडेल, त्याचे परिणाम माझ्या संसारावर मला असे असे घडवितां येतील, याची चिंतना मी करूं लागलों होतों. त्या मला साध्या गोष्टींनेंही खूप आनंद होई, यांत काय नवल ?

कधीं नाहीं, ती शांता माझ्याशीं मोकळ्या मनानें हास्यविनोद करीत होती. मी कांहीं बोललों कीं, त्याच्यावर चमूकन् वीज चमकल्यासारखें कांहीं तरी नर्म विनोदी ती बोले.

मी शांतेच्या बोलण्यावर कोटी केली, तर ती चिडत नव्हती, गंभीर होत नव्हती, किंवा थिजूनही जात नव्हती; तर ती त्या कोटीचा स्वीकार हास्याच्या स्वागतानेंच करीत होती. इंदूच्या घरीं नवराबायकोमध्यें तिच्या ' कलेच्या कैफियतीवरून ' शांतेवर उधळलीं गेलेलीं स्तुति-सुमनें, जगन्नाथासारख्या जवळ जवळ अरसिक, व घमेंडखोर श्रीमंतानें आनंदीच्या देखत शांतेच्या त्याच तिच्या कामगिरीकरितां केलेला गुणगौरव, मी शांते-जवळ अगदीं जशाचा तसा सांगून टाकला ! एरव्हीं ती स्वतःच्या स्तुतीला कंटाळे, अनुत्सुकता दाखवी, पण आज तसें नव्हतें. ती सलक्ष्य ऐकत होती. ऐकून सुखाच्या सूक्ष्म लहरी तिच्या मुखमण्डलावर उठत होत्या.

त्या स्तुतीचा तिनें सादर स्वीकार केला ! तिच्या डोळ्यांत आनंदाश्रु

चमकले! घरांत आई काम करीत होती, भावंडें भांडत होतीं, कीं खेळत होतीं, याकडे आमचें पूर्ण दुर्लक्ष झालें होतें.

तो दिवस तसा गेला. रात्र आली. दिवसासारखी, किंबहुना दिवसाहूनही रात्रींच्या प्रशांत वेळची मौज आह्मांला निराळीच वाटूं लागली. कांहीं तरी कामाच्या निमित्तानें शांता मागल्या आंगणांत गेली, तर तिच्या मागोमाग मलाही जाण्याची बुद्धि होई! ती आकाशांतल्या अनंत तारकांकडे त्या तारकांसह प्रशांतपणें विलासविहार करणाऱ्या तारानाथाकडे उगीच किती वेळ तरी पाहात राही, माझें लक्ष साहजीकच तिकडे वेधे!

काय असेल तें असो. आज आह्मीं दोघेही बाह्यजग जवळ जवळ विसरलों होतों. शांता कांहीं बोलली तरी मला आनंदाच्या हास्याच्या लहरी येत. मी कांहीं कुजबुजलों तरी शांतेच्या आनंदाचा बगीच्या बहरून येई!

कदाचित् असेंही असेल कीं, आम्हीं दोघे आमच्या संसाराच्या रथाला जुंपले गेल्यानंतर आतांपर्यंत तो ज्या ठिकाणापर्यंत सर्व त्रास, सर्व क्लेश, सर्व दुःख, सहन करून, ओढून आणला होता, तें ठिकाण आयुष्यमार्गातल्या अल्प विश्रांतीचें असेल. देवालाच आम्हीं त्या ठिकाणीं विश्रांति घ्यावी, क्षणकाल संसारभार विसरून जावा, असें वाटलें असेल. आणि त्याच्याच इच्छेनें तो अननुभूत आनंद आह्मांला उपभोगावयाला मिळत असेल.

आजच्या आनंदांत बोलण्याच्या ओघांत, शांतेच्या तोंडीं तिच्या मैत्रिणीचें नांव येत नव्हतें; मलाही माझ्या मित्रांचीं नांवें आठवत नव्हतीं. मग कुठलें ऑफिस, कुठला 'पैसा' आणि कुठला व्यवहार? आम्हीं काय काय बोलत होतों, हें आमचें आम्हांलाही कळत नव्हतें. फुलें, मुलें, तारा, आकाश स्वर्ग, चंद्र, सूर्य, आनंद, आनंद, आणखी आनंद, याशिवाय कांहीं सुचत नव्हतें, भासत नव्हतें, आणि आठवतही नव्हतें!

मी शांतेचा पूर्ण गौरव करण्यासाठीं म्हटलें, "तूं देवी आहेस!"

पण तिनें मी तिचा 'देव' आहे, हें न बोलतांच चटकन् उठून माझ्या पायांवर मस्तक ठेऊन मला उत्तर दिलें.

त्या रात्रीं आह्मांला झोंप कशी ती आलीच नाहीं. शांतेनें किती काव्यें काढलीं. किती तरी काव्यें वाचून, गुणगुणून दाखविलीं. माझा आवाज नसतांनाही मी देहभान विसरून तिला गुणगुणण्याची सांथ करीत होतों. वाङ्-

मयोद्यानांत आम्हीं मनमुराद विहार केला. आणखी कांहीं कांहीं बोलत बसलों. बोलण्याचा विषय कशावरून निघे, कुठून सुरुवात होई, आणि कुठें, कसा आणि केव्हां संपे, याची तरी दाद कुणाला होती ! जसजशी बाहेर रात्र चढत चालली होती, तसतसा आमच्या बोलण्याला, मंदमंद हंसण्याला सारखा भर येत होता.

होतां होतां पंहाट झाली. गार वाऱ्याची झुळूक झरोक्यांतून येऊन अंगाला झोंबूं लागली. दिव्याचें तेज मंद होऊं लागलें, तशी इच्छा नसूनही आमचीं बोलणीं मंद मंद होऊं लागलीं.

बाह्यजगाला—संसारी जगाला अजीबात विसरून आमचा आतांपर्यंतचा कसा काळ गेला, याचेंही भान आम्हांला नव्हतें. तें भान पहाटेच्या गार झुळकेनें आणून दिलें. आणि आह्मांला जगाची जाणीव आली. उद्यांच्या कष्टाची आठवण झाली, आणि त्यांत हयगय होऊं नये म्हणून आवश्यक ती विश्रांति देहाला द्यावयाची म्हणून मी आडवा झालों.

व्यवहारी जगाची जाणीव येतांच, उद्यांच्या कष्टाच्या तयारीला मनाची व देहाची तयारी झाली पाहिजे, ठेविली पाहिजे, हें आठवतांच, कसेसेंच झालें ! काय आपला 'काळ' सुखांत, आनंदांत, गेला. आपण घालविला ! इतका आनंद, इतकें सुख, उपभोगण्याइतका आपला हक्क आहे का ? जितकें उपभोगलें, तें त्या मानानें जास्त झालें कीं कमी ? हा आनंदाचा सुखाचा घेतलेला उपभोग उद्यांची कठोर कर्तव्यें बजावायला, जगांतले धक्केचपेटे सहन करावयाला, धीर देईल, कीं धीर खचवील ?

अशी कांहीं तरी मनाला उगीचच रुखरुख लागून राहिली ! सुखाच्या अतिसेवनानें तर असें झालें नसेल ? सुखाच्या उपभोगांत अशी रुखरुख, असा कडवट उदासीनपणा, देव कां मिसळून देत असेल ? हें सुख उपभोगावयाला लावण्यांत पुढें कांहीं तरी आपत्ति सहन करावयाला लागावयाची आहे, असा कां त्या रुखरुखीचा अर्थ घ्यावयाचा असतो ?

अशा तऱ्हेचे विचार पहिल्या विचारांच्या पाठोपाठ आल्याखेरीज रहात नाहींत. इतरांचें मला सांगतां येणार नाहीं. माझ्या मात्र मनाचें चक्र असें चालतें खरें ! शांतेच्या मनांत तरी माझ्यासारखेंच विचारांचें आंदोलन चालतें कीं नाहीं, हें मला समजत नव्हतें; आणि माझें मन तें विचारण्यालाही प्रवृत्त

होत नसे. मला वाटे तिच्या आनंदमय स्थितींत आपण भलतेंच कांहीं तरी विचारून तिच्या मनः साम्राज्यांत कशाला आणखी आपण उदास विचारांची वावटळ उठवा ?—

आजचा उपभोग्लेला आनंद 'पैशा'च्या जोरावरचा नव्हता. किंवा कोण-त्याही ऐहिक सुखांच्या कारणामुळें मिळालेला नव्हता! हा आनंद देवानें दिला होता. मानवी मनाच्या अति उच्च कोटींत जाऊन, शुद्ध, सात्त्विक, व तेजोमय,सुगंधीवातावरणांत घुसून आह्मीं त्या आनंदाचा लाभ घेतलेला होता!

बाहेर पक्ष्यांची गोड किलबिल सुरू झाली. माझे डोळे पडल्या पडल्या मिटूं लागले. आईच्या कुशींत घुसून सुखनिद्रेची लयलूट करणारीं भावंडें जागीं होऊन त्यांची आईजवळ कसली तरी मधुर कुरबुर चालू झाली होती.

शांता मग जाग्यावर राहिली नाहीं. ती उठली व नित्याच्या घरकामाला जायला निघाली " चाऊं दे उजाडलं, कामाला लागलं पाहिजे" सासूबाई नाहीं तर काय म्हणतील ?" म्हणूत शांता उठण्याचा प्रयत्न करी; पण खरें म्हटलें तर सुखाचा कैफ तिला झडझडून उठूं देत नव्हता. मलाही तिनें तिथून हलूं नये असेंच वाटत होतें. ' आहेच दररोज सकाळचं काम, एक दिवस जरा उशीर झाला म्हणून काय झालें ? ' म्हणन मीच तिला बराच वेळ जाऊं दिलें नाहीं, पण जेव्हां आई जागी होऊन गोड गळयानें, कंपित स्वरानें, भक्तिभावाच्या तन्मयतेनें " घनश्याम सुन्दरा श्रीधरा अरुणोदय झाला। ऊंठ लवकरि उदयाचळीं मित्र आला " ही होनाजी बाळाची प्रसादपूर्ण भूपाळी म्हणूं लागली, तेव्हां शांतेनें माझा हात बळेंच पण कितीं तरी लाडि-कपणानें दूर करून कामासाठीं पोबारा केला,

त्या पवित्र वातावरणांत मी पहाटेची साखरझोंप घेऊं लागलों. त्या झोंपेंत मला कसलीं स्वप्नें पडलीं काय ? तीं काय पडलीं ? वगैरे कशाचेंही स्मरण मला राहिलें नाहीं.

उठलों, तेव्हां ' आनंद–विषाद ' दोन्हीं भावना मनाशीं बिलगून बसल्या असाव्यात, असेंच वाटत होतें. त्यामुळेंच संसार अमृतमय आहे कीं विषपूर्ण आहे हें कळत नाहीं, असें म्हणतात, त्याची आठवण झाली!

खरेंच–अमृतपानानंतरही दुःखें कोसळत असतात का ?

---

## —प्रकरण १० वें—

# नोकरीवर लाथ

**मनसा चिंतितमेकं दैवमन्यत्र चिन्तयेत ।**

जसजशी दुपार होत जाते, दिवस चढत जातो, तसतशी त्याची उन्हाची प्रखरता अधिकाधिक वाढूं लागते. तें ऊन्ह जिवाला हैराण करतें. ज्याला अशा वेळीं नित्रासपणें बसायला सांवली असेल, घर असेल, उन्हाच्या तापापासून रक्षण करण्याची सोय असेल, त्याची गोष्ट वेगळी. पण ज्याला तसें कांहीं साधन नसेल, अशा वेळीं ज्याला वर आकाश, आणि फिरायला तापलेले सार्वजनीक रस्ते, याशिवाय कशाचा आधार नाहीं, त्याची काय वाट ?

त्यांतच अशाला एकादी घटकाभर जीवाला विश्रांतिकरतां धर्मशाळा मिळाली, किंवा कोणी कोणाच्या कोणत्यातरी गरजेकरितां, आपल्या आश्रयाला, येण्याचें, त्याच्याकडून 'मरेपर्यंत' काम करायला लावून कां होईना. पण अमिष दाखविलें, आणि त्याचा त्याला आधार मिळतो आहे नाहीं, त्या आश्रयाचा आधार तो घेतो आहे नाहीं, इतक्यांत, त्या धर्मशाळेंतून त्याला काहींतरी कारणानें कोणीतरी अरेराव्यांनीं हाकून द्यावें, किंवा त्या आश्रय देणाऱ्यानें, केवळ लहरीखातर त्याचा आश्रय एका हातानें द्यावा व दुसऱ्या हातानें काढून घ्यावा, म्हणजे मग त्यानें काय करावें ? त्याची वाट काय ? पण त्याची जगाला पर्वा काय ? त्याच्या वाटेची चौकशी करण्याची कोणाला काय जरूरी ?

माझी स्थिति अशीच कांहींतरी होणार कीं काय, अशीच शंका अलीकडे कांहींतरी प्रसंगानें उद्भवूं लागली होती. वसंतऋतूच्या पाठोपाठ ग्रीष्मऋतु येतो. आणि वसंतऋतूंत घेतलेलें सुख लवकरच निस्तारलें पाहिजे, अशी दटावणी आपल्या कारकीर्दींत ग्रीष्मऋतू द्यावयाला कमी करींत नाहीं; इतकेंच नाहीं, तर आपलीं अधिकारसूत्रें आपल्यामागून येणाऱ्या वर्षऋतूच्या हातीं देतांना त्याला अमक्या अमक्याला अमूक शासन करा म्हणून बजावतो, तर कांहींना आपल्या अधिकारांतच शिक्षा ठोठावून मोकळा होतो.

तसाच अनुभव आयुष्यांतले ऋतू मला आणून देणार कीं काय, अशी

मनाला उगाचच मधून मधून हुरहुर लागे. वसंतऋतूंतल्या सौख्याची माधुरी मी चाखली होती, उन्हाच्या तापापासून, स्वतःचें आणि कुटुंबीयांचें संरक्षण करण्याकरितां मोलमजुरी करून त्याच्या मोबदल्यांत शांततेच्या सावलींत बसण्याचें करीत होतों; पण तें अर्धवट सौख्यसुद्धां चिरस्थाई नाहीं, असें अनुभवाला आणून देणारे वारे वाहूं लागणारसा रंग दिसूं लागला होता. जोराचा वळीव पाऊस येण्यापूर्वी आडवे तिडवे वारे वाहूं लागतात, वादळे उठतात, त्याप्रमाणें आयुष्यांतल्या वादळाला सुरुवात होणार असें दिसत होतें.

कांहीं थोडे दिवस आहे त्या स्थितींत सुखासमाधानाचे जाताहेत न जाताहेत, तोंच आमच्या ऑफिसमध्यें थोडा फेरफार झाला. आमच्यावर लोभ करूं लागणारा 'साहेब' बदलून एक 'बाडगा' त्याच्या जागीं आला. तो येण्याबरोबर त्याचें बस्तान बसण्यासाठीं त्याच्या कक्षेंतील पिलें तो हलकें हलकें आमच्या ऑफिसांत घुसवूं लागला. आणि जुन्या मंडळींची कांहींतरी निमित्तानें बदली कर, कोणाला काहींतरी अपराधावरून राजीनामा द्यावयाला लाव, कोणाच्या पगाराला कात्री लाव, तर कोणाला पशूलाही न शोभेशा रीतीनें वागवून त्याला 'नको हा जीव' असें वाटायला लाव, असे चाळे त्यानें सुरू केले. यथाक्रम त्यापैकीं कांहींतरी भोगण्याची पाळी अस्मादिकावर येऊन ठेपली. माझें अगोदरच तापट मन, त्यांत निष्कारण अपमानकारक उणे शब्द ऐकून घेण्याची मुळींच संवय नाहीं; त्याला भर म्हणूनच कीं काय पहिल्या 'साहेबा'नें माझ्या कामाची भरपूर स्तुति करून, मला ऑफिसतर्फे विलायतेला पाठविण्याचें आमिष दाखविलेलें. त्यामुळें नव्या 'साहेबा'चा जुलूम माझ्या मनाला मुळींच सहन होण्यासारखा नव्हता. 'साहेब' मला पेंचांत पकडावयाला पाहात होता, आणि मी सफाईनें दर वेळीं त्याला तोंडघशी पाडीत होतों. तें त्याला कसें सहन होणार? 'साहेब' व माझ्यामध्यें चालणाऱ्या चकमकीची हकीकत आमच्या मित्रमंडळांत मी रोजच्या रोज सांगत होतों. आणि पुढें कसें वागावयाचें याची सल्लामसलत विचारीत होतों. साहेबाशीं अखेरपर्यंत ताठरपणानें वागावयाचें, किंवा नमतें घेऊन सत्तेच्या लाथा निमूट सोसून 'नोकरी'चें जूं मानेवर तसेंच ठेऊन घ्यावयाचें, याची शहानिशा दररोज करीत असूं. आमच्या खाजगी बैठकींत 'साहेबा'ची रेवडी उडवीत

असतां, माझ्या सांगण्यानें हंसण्याच्या उकळ्यावर उकळ्या फुटत असतां 'साहेबा'च्या हातांतील अस्मानीसुलतानी सत्तेचा विचार कोण करणार? माझी मित्रमंडळी माझ्याच म्हणण्याला उचलून धरीत होती, 'तूं करतो आहेस तेंच बरोबर आहे,' असें सांगत होती, आणि त्याच धोरणानें मी ऑफिसांत 'साहेबा'शीं अगदीं सडेतोड वागण्याचा क्रम चालूं ठेवला होता. अशा वागण्यांत मी 'वरिष्ठाशीं' कदाचित् उर्मटपणानें वागत असेन; पण चुकीनें, किंवा घमेंडानें, आणि कामांत, किंवा ऑफिसच्या नियमानुसार वागण्यांत मात्र केव्हांही कुचराई करीत नव्हतों. आणि याच एका विश्वासावर माझें 'साहेबा'ला कांहींही वांकडे करतां येणार नाहीं, याच भ्रमांत मी शेवटपर्यंत होतों.

असें कांहीं दिवस चाललें. पण शेवटपर्यंत तसा निभाव कसा लागणार! दुष्ट–खुनशी, सूडी वृत्तीचा साहेब, अगदीं टपून बसलेला होता. माझ्यावर करडी नजर आणि कडवा दांत त्यानें ठेवला होता. हें कित्येक दिवस तरी माझ्या लक्षांत आलें नाहीं. 'साहेबा'शीं निष्कारण नमून वागावयाचें नाहीं, त्याच्यापुढें त्याची थुंकी झेलावयाला हात जोडून उभे राहावयाचें नाहीं, त्याच्यापुढें दीनवाणें तोंड करून दया याचना भाकावयाची नाहीं, असा अगदीं मी कृतसंकल्प अगदीं स्नेह्यांसोबत्यांच्या सल्लामसलतीनें करून सोडला होता. या माझ्या संकल्पाला भरभक्कम पाठिंबा देतांना आमच्या जगन्नाथाचा आवेश लक्षांत घेण्यासारखा असे.

याच स्थितींत असतांना दिवाळीचा मंगल सण जवळ आला होता. घरांतील मंडळी या वर्षाचा सण थोडा चांगल्यापैकीं करावयाचा, या विचारांत होती. शांतेनें एकदोन वेळां तसें बोलून दाखविलें होतें. आईनें तिच्या म्हणण्याला आपला दुजोरा दिला होता. मधुकर आणि विमला "दिवाळींत अशी गंमत करावयाची, तशी मजा उडवायची, भाऊला हें आणावयाला सांगायचें, तें आणायला लावायचें," असें म्हणत अगोदर पासूनच त्यांची नाचण्या बागडण्याची तयारी झाली होती. एक दिवस खुद्द शांतेनेंच दिवाळीच्या सामानाची यादी करून माझ्या हातीं दिली, आणि संध्याकाळीं ऑफिसांतून परत येतांना आपल्या खात्याच्या दुकानावरून सामान पाठवून द्यायचें, असेंही सुचविलें. मी 'होय' म्हटलें. यादी खिशांत घातली, आणि ऑफिसला गेलों

घराकडील वातावरण अशा तऱ्हेचें होतें. अलिकडे शांता आनंदांत असून तिला अधिक सुखांत ठेवण्याची, तिची हलकी सलकीइच्छा पूर्ण करण्याची आई जवळ जवळ माझ्यावर सक्तिच करीत असे. शांता अलिकडे घरकामांत मंदावलेली असे, तरी नेहमींपेक्षां अधिकच सुन्दर दिसूं लागली होती. आईनें ' सुनबाईची कूस उजवणारा हिरा, आमच्या घराण्याला सुखाचे दिवस दाखवील ' असे कोणाजवळ तरी म्हणतांना मी ओझरतां ऐकलें होतें. त्यावेळीं माझ्या डोक्यांत वस्तुस्थितीचा प्रकाश पडला होता. आईचा सात्त्विक आनंद गगनांत मावण्यासारखा नव्हता !

अशा रीतीचा प्रकार घरीं होता. घरचें सौख्य अशा तऱ्हेची शीग भरून आलें होतें. याच्या पुढें काय अनुभवावें लागणार आहे, याची माझी मलाच कल्पना नव्हती ! या वेळीं आई शांतेला अधिक सुखासमाधानांत ठेवावयाला झटत होती. माझेंही तेंच कर्तव्य होऊन बसलें होतें. व त्याच कर्तव्यांत मी सध्यां गर्क होतों. त्या कर्तव्याचा गर्कपणा मला अधिकच सुखी करीत चालला होता, अधिकच बेभान बनवीत चालला होता. हा आनंदाचा, सुखाचा बेभानपणा मला कुठें नेऊन टाकणार होता ?

ऑफिसला त्या दिवशीं मी रोजच्यासारखा वेळेला निघालों. शांतेनें दिलेल्या सामानाची यादी खिशांत घातली. तितक्यांत आईनेंही पण आठवणीनें तिच्याकरतां कायसेसें आणावयाला सांगितलें. आईनें आणावयास सांगितलेला जिन्नस अगदींच अल्प किंमतीचा, व अगदींच सामान्य प्रतीचा—व देवाधर्माच्या बाबतींतला होता. आईनें कधीं नव्हे, तो आजच आणि तोही आपण होऊन आणावयाला सांगितल्यामुळें माझ्या मनाला केवढी धन्यता वाटली ! मधुकरानें व विमलनेंही दिवाळीकरितां म्हणून, दारूसामान अमूक तमूक हट्टानें व हक्कानें आणावयास सांगितलें होतें. आणि ती वेळ पण अशीच होती, कीं माझ्या मनाच्या वाढत्या आनंदाच्या वेळीं मी त्या कोणालाही नकार देणें शक्य नव्हतें. मी मनाशीं म्हणत घराच्या बाहेर पडलों होतों कीं, येती दिवाळी माझी किती आनंदाची आणि सुखाची जाणार आहे !—पण—

काय झालें कुणाला माहीत; ऑफिसच्या अर्ध्या वाटेंत कोणसें भेटलें. त्याचें माझ्यामुळें कांहीं अत्यंत महत्त्वाचें काम होणार होतें. त्यानें माझा हात

धरला. आपलें काम सांगितलें. 'हें काम तूं स्वतः आणि आतांच्या आतां येऊन केलेंच पाहिजे, तरच माझा बचाव होतो आहे, नाहीं तर मी अब्रू, व प्राण यासहित नाश पावतों आहें, असें म्हटलें. मलाही भूल पडली, आणि ऑफिसकडे चालणारे पाय मागचापुढचा विचार न करतां निमूट त्या माणसाच्या मागोमाग त्याच्या कामासाठीं एकदम चालूं लागले.

त्या कामाच्या ठिकाणीं गेलों. तेथें दोन अडीच तास मोडले. त्या गृहस्थाचें काम झालें. त्यानें कृतज्ञभावानें आभार मानून मला जायला परवानगी दिली. मी तेथून ऑफिसमध्यें आलों. ऑफिसमध्यें येईपर्यंत ऑफिसच्या वस्तुस्थितीची कल्पनाच मी अजीबात विसरून गेलों होतों. मी माझ्या परोपकाराच्या कार्याच्या आनंदांतच अजूनपर्यंत तल्लीन झालों होतों. पण ऑफिसमध्यें पाय टाकला, ' बाटग्या ' नव्या साहेबाची आठवण झाली, त्याची मूर्ति समोर दिसली; माझ्यावरची निष्कारण त्याची करडी नजर आठवली, आणि एकदम मनाला कसेसेंच झालें. धीर करून त्याच्या ऑफिसांत ऑफिसच्या हजेरीबुकावर सही करण्यास गेलों. साहेबानें माझ्याकडे एक तीव्र दृष्टिक्षेप केला. एकदां घड्याळाकडे पाहिलें. क्षणमात्र त्याच्या चेहऱ्यावर सैतानीहास्याची लकेर विजेसारखी चमकून नाहीशी झाली! मी अगदीं थिजून गेलों. हा साहेब ' मी चुकतों कुठें आणि तो मला पकडतो कुठें, ' याची वाट पहातच बसलेला होता. त्यानें माझ्यावरही एक आपल्यासारखीच अर्धबाडगी व्यक्ति आणून ठेविलीच होती. ऑफिसमध्यें ओघानें मला मिळणाऱ्या संधि—त्या नव्या व्यक्तीच्या पदरीं पडणार, हा साहेब त्याच्या पदरीं टाकणार, अशी कुजबुज सुरू झालेलीच होती. त्याला अनुकूल अशी संधि आज मिळाली.

त्या साहेबाला माझ्याकडून जसा प्रसंग व्हावयाला पाहिजे होता, तसा मिळाला, आणि तात्काळ त्यानेंही तो घेतला! आगाऊ सूचनेशिवाय दोनअडीच तास ऑफिसला उशीरा येणं, एवढा माझा अपराध त्या ' साहेबाला ' राईचा पर्वत करावयाला पुरेसा होता. त्याप्रमाणें त्यानें तो ताबडतोब केला. आजवर मजविषयींचें सांचवत आणलेलें सर्व कल्मष साहेबानें विषारी वाणीनें ओकावयाला सुरुवात केली. नको तो प्रसंग माझ्यावर आला! साहेबानें हजेरी घेण्यास सुरुवात केली. मी जागच्या जागींच थंड होऊन गेलों. सत्ता ह्मणजे काय?

सत्ताधारी म्हणजे काय ? आम्ही सत्तेचे गुलाम ते कसे, याची जाणीव मला त्या थोड्या वेळांत पूर्णपणें आली. ऑफिसच्या त्या अनुभवी माणसाचे एकवेळचे उद्गार आठवले, व त्याची सत्यता कळून आली !

साहेबाचें बोलणें मला इतकें असह्य झालें, इतकें झोंबलें, इतकें जिव्हारीं लागलें, त्याच्या बोलण्यानें माझें रक्त इतकें सळसळलें, कीं, बाकी सर्व जग मी त्यावेळीं अजीबात विसरून गेलों, माझ्या मुळच्या स्वभावानें डोकें वर काढलें. माझी मान ताठ झाली. डोळे वटारले गेले. आणि सत्तेला प्रतिकार करणारी भाषा माझी जीभ बोलूं लागली. शब्दानें शब्द वाढत चालले. साहेब खवळला, त्याच्याहून मी खवळलों. आगींत तेल ओतत राहण्याचा परिणाम काय होणार?

मी ' साहेबा 'ला त्या संतापाच्या भरांत भर्रकन चार ओळींतच माझ्या ' नोकरी 'चा राजिनामा खरडून दिला. आणि त्याला मुजरा ठोकला. त्या तिरामिरींत बाहेर पडलों. माझ्या स्वतंत्र बाण्यानें मला सांगितलें, ' नोकरीवर लाथ मारणें'च तुझें कर्तव्य आहे. मी तसें करूनही गेलों. माझी व साहेबाची हमरीतुमरी चालूं असतां ऑफिसांतली इतर मंडळी जागच्याजागीं चूर होऊन गेली होती. आमच्यामध्यें येणार कोण आणि बोलणार कोण आणि काय ? हा कांहीं खाजगी मामला नव्हे. मी त्या रागाच्या झटक्यांत बाहेर पडलों, त्या वेळीं मजपाशीं कोणी बोलेना, कीं कोणी पाहिना ! मग, जो तो आपल्या 'नोकरी' ला चिकटून राहण्याच्या आशेनें, मला एकाद्या उर्मट अराजकासारखा समजून मजशीं तसें तुसडेपणानें वागत होता कीं काय नकळे !

' साहेब ' आपल्या पुढच्या कामांत गर्क झाला, मी विजयीमुद्रेनें बाहेर पडलों. माणुसकी राखण्याकरितां, स्वाभिमानाची ज्योत तेवती ठेवण्याकरितां, आपलें तेज जगाला दिसण्याकरितां मी आज केवढें मोठें शौर्य गाजविलें! केवढी दांडगी मर्दुमकी दाखाविली ही ! निघालों, तो नीट माझ्या मित्रांकडे चाललों. असली मर्दुमकी, असला विजय जिवलग मित्राला सांगावयाचा नाहीं, जिवलग मित्रांकडून त्याबद्दल शाबासकी मिळवावयाची नाहीं तर कोणाकडून ? विजयोत्साहानें डोकें चांगलेंच भणाणून गेलें होतें. या वेळीं ' साहेबा ' शीं झालेल्या सामन्याची आवृत्ति मनांतल्या मनांत पुनः पुन्हां एकसारखी होत होती. सुरुवातीपासून सुरुवात होऊन ' साहेबा 'च्या अरेरावी, उद्दाम वृत्तीचा

नक्षा उतरण्यासाठीं राजीनाम्याचें चिठोरें लिहून, त्याच्या अंगावर एकाद्या कस्पटाप्रमाणें फेंकून रामराम ठोकून आपण कसें वागलों, येथपर्यंतच्या हकीकतीचीं आवर्तनें माझा तापलेला मेंदू सारखा करीत सुटला होता.

आलों तों प्रथम जगन्नाथाकडे! तोही घरीं होता. मी येण्यापूर्वी त्यांचें काय बोलणें चालू होतें, त्यांची मनःस्थिति काय होती, हें माझ्या मुळींच लक्षांत आलें नाहीं. जगन्नाथ आपल्या आरामखुर्चीवर स्वस्थपणानें पडला होता. त्याचा दिवाणजी—म्हातारा—कानावर लेखणी खोंचून, बाराबंदीचे बंद व्यवस्थित बांधून, पिकलेल्या शेंडीच्या चार बटा—भुरभुर उडत आहेत, हातांत कसल्या तरी हिशेबाच्या वह्या आहेत, आणि कांहींतरी समजूत करून देतघेत आहे, अशा स्थितींत तो म्हातारा, जगन्नाथापुढें उभा आहे. आनंदी दारांतच उभी आहे. ती कांहीं बोलत नव्हती, पण काय बोलली होती, व तिचे मनोव्यापार आतां काय चालले आहेत, हें पाहण्याइतकें माझें मन ठिकाणीं नव्हतें. मी तेथें जातांच, माझा चेहेरा मी मिळविलेल्या ऑफिसांतल्या विजयानें, हंसरा केला, मी हंसलों, म्हणून जगन्नाथही हंसला. आमचें हस्तांदोलन झालें. मी त्याच्या जवळच्याच खुर्चीवर बसत म्हटलें,—

"भय्यासाहेब, माझी पाठ थोपट अगोदर!"

"कां? कुठें एकादी लढाई मारलीस कीं काय?"

"शंका आहे कीं काय?—अरे, त्या आमच्या उर्मट 'साहेबाच्या' नाकावर टिचलें. त्याच्या नोकरीवर लाथ मारून ऑफिसांतून 'माणुसकी' राखल्याचा रामराम त्या 'साहेबाला' ठोकून निघालों आहें! आहेस कुठें तूं?"

"ऑं? म्हणजे?—" जगन्नाथ नीट बसता होऊन मजकडे आश्चर्यानें पहातच राहिला!

"म्हणतोस काय वामन? नोकरी सोडलीस?"

"तुला अजून शंकाच वाटते?" मी म्हटलें, आणि आजच्या दिवसांतली, नोकरीवर जाण्यापासून ऑफिसांतून बाहेर पडेपर्यंतची एकूण एक हकीकत जगन्नाथाला सांगावयाला सुरुवात केली. 'आणि, व, पण, परंतु' देखील सांगतांना टाळीत नव्हतों. प्रत्येक अक्षर मुद्याचें म्हणून सांगत होतों. साहेब असें

म्हणाला, त्याला मी असें उत्तर ठणकावलें. साहेबानें तशी धमकावणी दिली, तर त्या धमकावणीला कःपदार्थाप्रमाणें मी फूःकरून उडवून दिलें; मी सांगत असतां जगन्नाथाचा चेहरा किती वेळां तरी आमच्या 'नाइक फोटोग्राफरांनीं' 'फोटो काढण्यासारखा झाला होता; पण त्या वेळीं मी त्याच्याकडे तसें लक्ष मुळींच दिलें नाहीं. मी आपली हकीकत सारखा सांगत सुटलों होतों. मी बोलत असतां जगन्नाथ कांहीं बोलण्याचा वगैरे प्रयत्न करीत होता. पण माझ्या बोलण्यामुळें त्याला तोंड उकलावयाला मुळींच अवधि मिळेना. मी बोलत असतां कांहीं वेळ आनंदी, व त्याचा म्हातारा दिवाणजी माझी नवी विजयाची हकीकत ऐकत उभे होते; पण मी नोकरी सोडली, हें ऐकल्यावर मग फार वेळ तेथें कोणी उभे राहिलें नाहीं. त्यावेळीं माझें मन नेहमींसारखें ठिकाणीं असतें, आणि त्या स्थितींत म्हाताऱ्या दिवाणजीकडे पाहिलें असतें, तर मी नोकरी सोडली आहे, हें कळल्यावर जो त्याच्या चेहऱ्यांत बदल झाला, त्या बदललेल्या चेहऱ्याचा अर्थ मला चटकन् कळला असता! त्याच्या मुलाची नोकरी सुटून, तो व त्याचें कुटुंब निराधार झाल आहे, असें त्याच्यापुढें कोणी जर चित्र उभें केलें असतें, तर त्याच्या मनाची जी अवस्था झाली असती, तीच अवस्था जवळ जवळ माझ्याविषयींही त्याची झाली होती. तो तेथून जातां जातां "मनुष्य चंचल, कीं लक्ष्मी चंचल? मी मनुष्यालाच चंचल म्हणून दोष देईन!" असें कांहीं तरी अस्पष्टसें पुटपुटला! पण त्या वेळीं त्याच्या चेहऱ्याकडे किंवा त्याच्या अस्पष्टशा पुटपुटण्याकडे कशाला माझें लक्ष जातें आहे?

माझी हकीकत जगन्नाथाजवळ सांगून झाली. आतां राहिला विश्वनाथ! त्याच्याकडे जगन्नाथाला घेऊन जावें, असा विचार आला. त्याप्रमाणें मी त्याला चल ह्मटलें. पण त्यानें सांगितलें, विश्वनाथ आपल्या कुळांकडील वसुलीच्या कामाकरितां कालच गांवीं गेला आहे, आणि तो आठपंधरा दिवस तिकडेच राहणार आहे. मला जरा हिरमुसल्यासारखें झालें. जगन्नाथापेक्षांही माझ्या माणुसकीचें, मी केलेल्या शौर्याचें कौतुक विश्वनाथच अधिक करणार ही माझी खात्री. त्यामुळें मला थोडेंसें वाईट वाटलें. आनंदांत तेवढेंच वैगुण्य आलें.

मी बोलत असतां जगन्नाथ बरें किंवा वाईट कांहींच म्हणाला नाहीं.

माझ्या आजच्या वागण्याला त्यानें धिःकारलेंही नाहीं, किंवा डोक्यावर घेऊन नाचण्याइतका आनंदही व्यक्त केला नाहीं. मी बोलतांना मधून मधून, "तुमच्या प्रोत्साहनानें मी हें करूं शकलों. तुमच्या स्वतंत्र बाण्याचा आदर्श माझ्यापुढें होता म्हणून मला हें करतां आलें," वगैरे म्हणत होतों; पण त्यावेळीं त्या माझ्या ह्मणण्याला त्याची पूर्वींची संमति आतां कितपत आहे, हें पाहण्याचें भान कुणाला होतें ?

कितीतरी वेळ मी आज जगन्नाथाच्या घरीं बोलत बसलों. मध्यंतरीं आनंदीनें संध्याकाळच्या 'चहाफराळा' ची तयारी केली. नाहीं होय म्हणत-म्हणतां जगन्नाथाच्या घरच्या 'चहाफराळा' ला आज मी आपण होऊन; आणि अचानक सांपडलों. आज मला 'नाहीं' म्हणतां येणें कोणत्याही प्रकारानें शक्य नव्हतें. चहाफराळाच्या वेळीं आनंदी मला विशेष खुशींत दिसली. एरव्हीं ती स्वयंपाकीणबाईकडून 'चहाफराळाचें' करावयाची, आणावयाची, पण आज तिनें स्वतःच चहाफराळाची तयारी केली होती. व स्वतःच तें सर्व तिनें आणिलें होतें. 'चहाफराळ' चालू असतां आह्मीं कांहीं तरी बोलत होतोंच. आनंदी मध्यंतरीं कांहींतरी बोलण्याची संधि पाहात होती. तिला कांहींतरी बोलावयाचें होतें, पण कसें बोलावयाचें तें नीटसें सुचत नव्हतें.

जरा वेळानें तिनें संधि साधली, तिनें एका विविक्षित आवाजांत विचारलें—

"आमच्या घरची 'चहाफराळा' ची व्यवस्था इंदूच्या घरच्या सारखी आहे का ?"

"वाः ! वाः ! ह्मणजे ? हें काय ?" जगन्नाथ उद्गारला, "विश्वनाथाची तऱ्हा निराळी, आपली निराळी !"

"आमच्या तिथली व्यवस्था तुमच्या इथल्यासारखी नसते, एवढें मी खास सांगूं शकेन !" आनंदीचा सूक्ष्म टोला ओळखून तिलाच तो परत मिळावा, म्हणून मी मुद्दाम ह्मटलें.

"तें कां ? आज शांतानं तर इतकं सुन्दर 'चहाफराळाचं' केलं होतं कीं, त्याच्यापुढं हें कांहींच नाहीं ! काय शांतेच्या हातांत मग अमृत सांठलंय काय जाणें !" आनंदी म्हणाली.

नंतर लगेच विषय बदलला. आणखी कांहीं इकडच्या तिकडच्या गोष्टी निघाल्या. जगन्नाथाचें चित्त आज स्थिर नसावें, असें दिसलें. मधून मधून तो आज सचिंत झाल्यासारखा दिसत होता.

माझ्या ऑफिसच्या गोष्टी मंदावल्या. नोकरीच्या राजीनाम्याची हकीकत पुन्हां पुन्हां सांगून झाली. चहाफराळ झाला. मी जरा वेळानें जायला लागण्याच्या तयारींत होतों. पुन्हां पुन्हां वाटत होतें कीं, आज विश्वनाथ असावयाला पाहिजे होता.

मी स्वस्थ बसल्यावर आनंदीनें मी जाण्यापूर्वी चाललेल्या विषयाला फिरून जरा वेळानें सुरुवात केली—

“ ऐकायचं का ? ”

“ काय ? ”

“ आणखी तेंच तेंच काय सांगायचं ? मी कांहीं दुसरं तिसरं ऐकायची नाहीं ! ते दिवाणजी नकोत, त्यांचे हिशेब मला नकोत. आणखी ती साक्षही पण मला ऐकायची नाहीं! मी सांगितलें आहे तशी यंदाची दिवाळी झाली पाहिजे एवढं मला माहित ! मग खर्चाचं आपण हवं तसं करावं !—मला कांहीं तें माहित नाहीं ! ”

जगन्नाथानें आनंदीच्या प्रश्नाला उत्तर दिलें नाहीं. सचिंतपणें त्यानें खिडकीच्या बाहेर पाहिलें. “ यंदाची दिवाळी मी म्हणतें तशीच झाली पाहिजे. खर्चाचं हवं तसं आपण पहावं. मला काहीं तें माहीत नाहीं ! ” या आनंदीच्या दोन तीन वाक्यांनीं माझ्या डोक्यांत मात्र एकदम कांहींच्या काहींच झालें ! डोळ्यापुढें अंधेरी आली ! ज्ञानमेंदू जागच्या जागीं निर्जीव झाल्यासारखा झाला ! त्याच अवस्थेंत आनंदीनें आणखी एक प्रहार केलाच!—

“ शांता सांगत होती, यंदाची दिवाळी तुमच्याकडे देखील थाटाची व्हायची आहे ! वर्षाचा सण मग नको का सारं यथास्थित व्हायला बरं ! ” आनंदीच्या या विचारण्यानें आणखी कांहींच्या कांहींच झालें !

यंदाची जवळ आलेली दिवाळी ! दुपारीं घरांतून निघतांना शांतेनें आपण होऊन हौसेनें दिलेली दिवाळीच्या सामानाची यादी, मधुकर आणि विमलेनें आपल्याकरतां आणावयाला सांगितलेल्या जिनसा, आईनें कधीं नव्हे तें कायसेसें

आजच आणावयास सांगितलेलें, एकदम सर्व डोळ्यापुढें आलें ! आणि आतां-पर्यंतचें गाजविलेलें शौर्य कोठच्याकोठें नामशेष झालें ! सर्वांगाला घाम सुटला! हृदयाक्रिया बंद पडावयाची वेळ आली ! माझे हातपाय मोडले. कंबर खचली !

मी जगन्नाथाच्या घरांतून कसाबसा उठलों. बाहेर पडलों. घराकडे जायचें. पण पायच उचलेना ! घरीं कसा जाऊं ? काय जाऊन करूं ? दिवाळी 'च्या सणाचा आनंद उपभोगावयाला तयार झालेल्या मनाचा हिरमोड करण्याचें पाप माथीं घेऊन हें तोंड दाखवावयाला कसा घरीं जाऊं ? पैशा'शिवाय दिवाळीचा सण साजरा काय कपाळाचा करणार ?

वाटेंत पुन्हां ऑफिसांतली मंडळी भेटली. त्यांना वाटेंतच वाचा फुटली ; त्यांच्याशींच बोलत उभा राहिलों. पण आतां मी काय बोलत होतों, हें माझें मलाच कळत नव्हतें. घर दृष्टीपुढे आलें–आज ऑफिसांत गाजविलेला पराक्रम नजरेपुढें आला. करावयाचें होतें काय, केलें काय ? जें केलें, जें माझ्या हातून झालें, तें कदाचित् तसें होणार आहे ह्मणून माझ्या वैऱ्यानेंही चिंतिलें नसेल !

घरीं यायला त्या दिवशीं किती तरी रात्र झाली ! भावंडें वाट पाहून कंटा-ळून झोपीं गेलीं होतीं. कधींच नाहीं, आणि वामनाला आज यायला इतकी रात्र कां झाली, ह्मणून आईही काळजींत पडली होती. शांतेलाही उदासवाणें वाटत होतें. माझ्या पायांतल्या वहाणा वाजल्या. आईनें दिवा वर करून पाहिलें. मला आलेला पाहून तिचा जीव खालीं पडला. शांता पाटपाणी करावयास आणि पाय धुवायला पाणी द्यावयाला पट्दिशीं उठली !

घरीं पाय ठेवला. सर्वत्र भेसूर शांतता पसरल्यासारखी वाटत होती. आईनें थोड्या वेळानें शांतपणानें विचारलें—

" उशीर झाला वामन !–उगीचच काळजी वाटायला लागली होती बघ. इतका कां उशीर झाला ? काय झालं ?—"

माझी इच्छा नसतांही, किंवा माझ्या सांगण्याचा परिणाम काय होईल याचा थोडासा अंदाज असतांही, मी सांगून गेलों—

" आई, मी आज 'नोकरी'वर लाथ मारली ! "

दिव्याच्या मंदमंद प्रकाशांत, आई व शांता दोघीही जागच्याजागीं स्वस्थ राहून, औदासिन्य मिश्रित आश्चर्यानें मजकडे पाहात राहिल्या !

माझा चेहरा त्यावेळीं त्यांना कसा दिसला कुणास ठाऊक!

## —प्रकरण ११ वें—

# विरोधी जग

-कोण जाणे खरें खोटें। जग चाले उफराटे॥

मी नोकरी सोडल्याची हकीकत एक दोन दिवसांतच चोंहीकडे पसरली, त्याबरोबर लोकांतून आपापल्या मतांपरी त्याविषयीं कुजबुजीला सुरुवातही झाली. पुष्कळ ओळखीचे, आप्तसंबंधी, ऑफिसांतले परिचित, स्नेही ह्मणविणारे वगैरे लोक घरीं येऊन पूसतपास करून, कोणी हळहळून, तर कोणी माझ्याच उतावळया उद्धटपणाला ठपका देऊन जाऊं लागले. व्यवहार ज्यांच्यांशीं चालत, ज्या ज्या दुकानीं वगैरे माझी नुकतीच पत पडत चालली होती, त्यांना त्यांना कळल्यावर सवडीप्रमाणें ते लोक आले, माझ्या नोकरी सुटण्याचा अहवाल ऐकला, कोणी आपल्याकडे बोलावून नेऊन मला विचारलें, आणि माझ्याशीं वागण्याविषयीं माझ्या सभोंवतालचा समाज सावध झाला.

माझी नोकरी सुटली, मी सोडली, कां सोडली, कशी सुटली, ऑफिसच्या साडेचार फूट रुंद साडे पांच फूट लांबीच्या त्या जागेंत माझ्यामध्यें व माझ्या साहेबामध्यें कोणते व कसे खटके उडाले, व काय झालें, हें बाहेर कसें पडणार? सगळ्यांना सारखेंच कसें कळणार? चुकी ऑफिसची, ऑफिसराची कीं माझी, याची शहानिशा करीत बसण्याचें जगाला कारण काय? वावटळीसारखी कांहींतरी बातमी कानावर आली, त्याचा मनाला आवडेल, व परिस्थितीला रुचेल असा अर्थ करून घेतला, कोणाला तरी बरोबर, कोणाला तरी मूर्ख ह्मटलें, संपला विषय! असेंच बहुतेक चोंहीकडे असतें.

माझ्या नोकरी सुटण्याची हकीकत अशीच होणार! ऑफिसला, ऑफिसराला कोण दोष देणार? दोष कोणत्याही मार्गानें माझ्याच पदरीं येऊं लागला. लोक घालूं लागले. एक ह्मणे, अलिकडच्या शिकलेल्या लोकांना नोकऱ्या मुळीं करायलाच नकोत. दुसरा म्हणे, "वामननें ऑफिसांत कांहीं तरी भानगड केली. त्यामुळें साहेबानें त्याला कामावरून काढून टाकला. तरी बरें, साहेब सज्जन म्हणून. नाहीं तर त्यानें वामनाला तुरुंगच दाखविला असता!"

एकादा मजकडे येई. सहानुभूतीचा आंव आणी, आणि शेवटीं बोलतां बोलतां हलकेंच विचारी, " कायरे वामन, खरेंच तूं कांहीं ऑफिसांत भानगड केलीस ? साहेबानें तुझ्यावर मेहेरबानी केली म्हणून अब्रू राखून बाहेर पडलास म्हणे ! छेः बोवा ! तुझी परिस्थिति तुला ओळखायला पाहिजे होती. नोकरी हातची गेली, आतां काय करणार सांग पाहूं ? "

आणखी कोणी माझ्या मनाचा कल पाहात पाहात, मी नोकरी सोडतांना जसा वागलों, तें सर्व ' होस हो, ' म्हणून जवळ जवळ सगळें कबूल करीत, पण शेवटीं आपला शेरा म्हणून मारतांना म्हणत " तरी पण काय वाटेल तें असलें, तरी तूं नोकरी सोडावयाला नको होतीस ! नोकरीवर लाथ मारणें, म्हणजे उघड उघड ' पैशा'वर लाथ मारण्यासारखेंच नाहीं काय ? आणि पैशावरची लाथ म्हणजे आपल्या कुटुंबियांना उपाशी तडफडावयाला लावणें नव्हे काय ? आणि हें इतकें उघडें सत्य असून तूं त्याला कसा बळी पडलास ? "

मी काय केलें ? हें आतां माझें मलाच कळेना ! नोकरी सोडली. नोकरीवर लाथ मारली. जी नोकरी महाप्रयासानें, अनंत हालअपेष्टा करून, कित्येक महिने जोडे फाडून मिळविली, ती मी होऊनच घालविली. मी ' पैशा'वर माझ्या मनाच्या मानाकरितां, माझ्या माणुसकीकरितां लाथ मारली. पण त्यामुळें झालें काय ? ' गुलामगिरी'चें वीष आंगीं भिनवून घेण्याचा प्रसंग मुरदाडपणानें सहन करून घेतला नाहीं, त्यामुळें प्रसंग ओढवला काय ? कदाचित् सत्ताधारी साहेबाचे, अरेरावी, मग्रूर, वाक्प्रहार मुकाट्यानें खालीं मान घालून ऐकले असते, माझी कांडीमात्र चुकी नसतांना ' मी चुकलों, पुन्हां चुकणार नाहीं, एक वेळ माफ करा, ' असें म्हणत साहेबाचे पाय चाटले असते, तर हातची नोकरी गेली नसती. आज माझ्या घरानें दुपारची वेळ कशी निभवावी, हा बिकट प्रश्न माझ्यापुढें येऊन उभा राहिला नसता. आणि अशा रीतीनें मी माझ्या माणुसकीला मारून टाकले असतें, तर आज माझ्यावर विरोधी जगाचें उठलेलें माझ्यावरचें काहूर उठतेंही ना !

पण असें झालें. असें मी केलें. नोकरी सोडतांच माझ्याकडे सर्व जग करड्या कठोर नजरेनें टवकारून पाहूं लागलें. मला माझ्या या व्यवहारांतल्या

पढत मूर्खपणाबद्दल केव्हां, कोण, कुठें, आणि काय बोलेल, याचा नेम मला लागेना !

जगन्नाथ इतका जिवाचा जिवलग ना ? तो त्या दिवशीं जरी कांहीं बोलला नाहीं, तरी पुन्हां घरीं घेऊन आई, व शांता देखत " वाः वामन ! काय हा खुळेपणा केलास ? नोकरी सोडून बसलास, काय म्हणावं तुला ? अरे बाबा ! बोलायच्या गोष्टी वेगळया असतात, प्रत्यक्ष आचरावयाच्या गोष्टी वेगळया असतात, एवढेंही तुला कळूं नये? संतापलास, रागावलास साहेबावर, चिडून राजिनामा देऊन घरीं आलास !-त्यामुळें त्या तुझ्या साहेबावर परिणाम काय झाला ? तुझ्या घरीं राहण्यानं तुझं ऑफिस अडलं ? कीं साहेबाचं कांहीं बिघडलं ? झालं नुकसान तुझंच ! आपल्या हातांनीं आपल्या पायावर धोंडा पाडून घेतलास तूं ! आतां सांग पुढें काय करणार ? आणि संसार कसा चालविणार ?-अरे, आह्मीं किती झालों तरी कडेचे पोहणारे ! आह्मीं तरी तुझ्या बाबतींत काय करणार ? " इत्यादि. हें व्याख्यान माझ्यापुढें त्यानें देण्यास कमी केलें नाहीं.

आतां राहिला विश्वनाथ ! तो अजून आला नव्हता. बाकी तो तरी काय बोलणार ? मला काय विचारील ? नोकरी लागली ती केवळ त्याच्या शब्दानें, आणि सोडली त्यावेळीं त्याच्या सल्ल्याशिवाय, तेव्हां त्याला त्या बाबतींत बोलण्याचा इतरापेक्षां जास्त अधिकार !

यावेळीं जगाची विरोधी दृष्टि, व साधल्याचें सोबतीपण, माझ्या चांगल्याच प्रत्ययाला आलें ! नोकरीमुळें माझें बस्तान बसत चाललें आहे, असें पाहून मला बरें ह्मणूं लागलेलें जग पुन्हां ऐन आणीबाणीच्या वेळीं जसेंच्या तसेंच कसें विरोधी आहे, हें समजलें.

पण हें सर्व समजून उपयोग काय होता ? मी नोकरीवर लाथ मारली नसून ' पैशा'वर लाथ मारली, आणि त्यामुळें संसारगाडा माझा मीच जागच्या जागी थांबविला, हें तर त्रिदार सत्य होतें ! मी माणूसपणा राखून केलें काय? जी माणूसकी म्हणून राखली, ती माणूसकी, माझ्या कुटुंबीयांना दुपारीं जेवायला घालीत नाहीं, जगाची साधी सहानुभूति सुद्धां ठेऊन देत नाहीं, ती माणूसकी ठेऊन करावयाचें तरी काय ? असाही एक कमकुवत व अनुदार विचार येऊन मनाला त्रास देऊन गेल्याशिवाय राहिला नाहीं.

या वेळीं कसली दिवाळी, आणि कसली मजा! आई बोलत नव्हती. शांता बोलत नव्हती! भावंडांनीं एकदोनदां, 'हें केव्हां आणायचें, तें केव्हां आणावयाचें, फटाक्या केव्हां आणणार?' म्हणून विचारलें. पण जसा घरांतला सगळाच रागरंग बदललेला त्यांना दिसला. मंडळींची ये-जा, आमचीं बोलणीं, आईची गंभीर स्तब्धता, आणि सारादिवस जेवणखाण सोडून देवापुढं बसणं, आणि शांतेची घरकामांतील एकसारखी मग्नता, त्या अजाणमुलांच्या लक्षांत आली, त्या वेळेपासून तीं मुलें स्तब्ध झालीं. आमच्या विचित्र परिस्थितीचा परिणाम त्या कोंवळ्या मनावर झाल्याशिवाय कसा राहणार?

दिवाळी चालू होती. शेजारपाजारचीं मुलें फटाके उडविण्यांत, नवेनवे कपडे करून नटण्याथटण्यांत, मौज उडविण्यांत अभ्यंगस्नानें करण्यांत, सुवासिक तेलें व उंची अत्तरें लावून घेण्यांत चूर होतीं. त्यांची ती मजा, त्यांचा आनंद, त्यांचा उत्साह माझीं भावंडें आपल्या दारांत बसून पहात होतीं. 'तसें आपल्याला नाहीं,' असें त्यांच्या मनांत येऊन त्यांना काय वाटत होतें, ती मुलांची स्तब्धता पाहून, आईच्या, शांतेच्या, आणि माझ्या लक्षांत येऊन, आमच्या अंतःकरणांत कोण कालवाकालव होत असेल, त्याचें वर्णन कसें करावयाचें? विरोधी जग तशी दिवाळी करीत होतें. आम्हीं आमची दिवाळी अशी पार पाडीत होतों. पण अशी दिवाळी पार पाडण्याचें कशामुळें नशीबीं आलें होतें! यांत आईचा कांहीं अपराध होता काय? शांतेची कसली चूक होती काय? अजाण भावंडांचें कांहीं पाप होतें काय? मीच अपराधी होतों. माझीच चूक होती. मी पैशावर लाथ मारली होती! आणि माझ्या माणूसकी राखण्याच्या चुकीचा परिणाम, माझ्या बरोबर, आईला, शांतेला, आणि अजाण भावंडांनाही कठोरपणानें भोगावयाला लावण्याचा अक्षम्य मूर्खपणा केला आहे, असा सर्व जगानें—माझ्या सभोंवारच्या परिचित् जगानें—माझ्या कपाळीं छाप मारला होता. तो छाप खरा, कीं, माझें वर्तन खरें, याचा निर्णय माझें गोंधळलेलें मन करूं शकत नव्हतें.

विरोधी जगाचा अनुभव आणखी तो कोणता घ्यावयाचा राहिला होता? व्यवहारीं वागण्यांतली अक्षम्य चूक सर्व समाजानें माझ्या माथीं बडविली होतीच. पण अजून माझ्या घरची सर्व मंडळी—आई, शांता, व भावंडें अजून

त्या बाबतींत मुग्ध होती. त्यांना विचारण्याचा धीर मला होत नव्हता. आणि त्यांनींही कोणी बोलण्याचें धाडस अजून केलें नव्हतें.

आमची दिवाळी आह्मी तशी करणार होतों, पण अशी घालवावी लागली. आई बोलत नव्हती, पण डोळ्यांतून पाणीही काढीत नव्हती, शांता बोलत नव्हती, पण रागावली नव्हती, किंवा उदासही नव्हती. या वेळीं तिच्या चेहऱ्यावर कुठून आणि कशी प्रसन्नता, आणि उत्साह, तेज, आलीं होतीं, कोण जाणें! भावंडें रडलीं नाहींत, एकसारखीं मागें लागून त्यांनीं भंडावून सोडून जीवनकोसा केला नाहीं. अगदीं म्हणतां अगदीं त्यांनीं दिवाळींत शांतपणाचा कार्यक्रम आंखला होता. आईनें कीं शांतानें, त्यांना 'आपण गरीब आहोंत, आणखी आपली मनाच्या सुखासमाधानाची हीच खरी दिवाळी——आणि तीच आपण करावयाची,—शेजारच्या श्रीमंतांची वैभवाची दिवाळी पहावयाची, आणि त्यांतच डोळयाचें सुख घ्यायचें" असें कांहीं सांगितलें होतें कीं काय, आणि तें त्या भावंडांनीं निमूटपणें, आज्ञाधारकतेनें अंमलांत आणलें होतें कीं काय नकळे!

माझ्या जिवाला मात्र बिकट परिस्थितीच्या वेदना असह्य होत होत्या. मला कांहीं सुचत नव्हतें. मी पुढें काय करावयाचें, याचा उलगडा होत नव्हता! मी अगदीं दिङ्मूढ झालो होतों. जो येई तो 'तूं चुकलास, गाढवपणा केलास, पैशाला-लक्ष्मीला लाथाडलेंस!' असें म्हणे, आणि चालता होई! पण अजून एकही मायेचा पूत असा आढळला नव्हता कीं, "चल, चुकलास तर चुकालास, माणूस चुकणारच. आतां अशा अशा मार्गाला लाग. मी तुला माझ्या ऐपतीप्रमाणें असें इतकें सहाय्य देतों, देववितों, माझे विचार व सहानुभूतीचें सहाय्य, माझ्या धनिक मित्राचें धनाचें सहाय्य, मी देतों, देववितों. तूं, तुझें शरीर—व मानसिक कष्ट कर, नेकीची, व इमानाची जोड दे, आणि चालावयाला लाग, घाबरूं नकोस, भिऊं नकोस, हातपाय गाळूं नकोस!"

पण असें कोण म्हणणार? कोणाला म्हणण्याची जरूरी काय? आणि मला तसें कोणीं म्हणावें, अशी अपेक्षा करण्याचा मला अधिकार तरी काय?

नाहीं म्हणावयाला विश्वनाथ—म्हणेल, तसें कांहीं करील, अशी अंधुक आशा, मनाला मधूनमधून धीर देत होती. पण तो यावेळीं माझ्या दुर्दैवानें

गांवीं नव्हताच ! तो आपल्या कामाला परगांवीं गेला होता. त्याला इकडील वर्तमान कळविणार कोण ? कळलें असलें, किंवा मी कळविलें, तरी तो आपलें स्वतःचें महत्त्वाचें काम हातांतलें टाकून कसा येणार ?

इंदू आली होती. दिवाळींत आली. तिच्या हातीं जेवढें होतें, तेवढें तिनें केलें. तिनें आपल्या मैत्रिणीच्या–शांतेच्या गळयांत गळा घातला. शांतेच्या प्राप्त बिकट परिस्थितीबद्दल तिच्या डोळयाला पाणी आलें. ती रड रड रडली. शांतेनेंच तिच्या डोळयाचें पाणी पुसलें. तीच उलट म्हणाली, "इंदूताई, रडून काय होणार ? धीर सोडून कसें भागणार ? संसारांत कधीं सांवली, कधीं उन्ह असें हें चालायचेंच !" शांतेच्या संकटकालीं शांतेचे अश्रु पुसायला, तिला समजुतीच्या गोष्टी सांगावयाला म्हणून इंदु आली, पण शांतेनेंच तिचे डोळे पुसले, शांतेनेंच तिला समजुतीचे चार शब्द सांगितलें.

"शांताताई, मी तुझ्याबाबतींत काय करूं ?"

"काय करणार तूं ? तुझ्या हातीं काय आहे ?"

"म्हणूनच मला वाईट वाटतं ! पण बाहेर गांवाहून यायचं झाल्यावर तुमच्या करितां कांहीं तरी करायचंच म्हणून मी हट्ट धरून बसेन !"

त्याही स्थितींत इंदुच्या या शब्दांनीं शांतेला समाधानांतलें हंसू आलें. शांता म्हणाली, "पण त्याचं आतां काय? विश्वनाथ आल्यावर ज्यावेळचे त्यावेळीं काय तें पहातां येईल !"

नंतर एक दिवस आनंदी पण सवड करून शांतेला धीर द्यावयाला आली होती. तिनें आल्याबरोबर बोलण्यांत जगन्नाथाच्यांच पावलावर पाऊल टाकण्यास सुरुवात केली. शांता 'हूं' म्हणून नुसतें ऐकत होती.

"शांते, तूं कांहीं म्हटलंस, तरी वामनरावांनीं जी गोष्ट करायला नको होती, ती केली. पैशाला लाथाडून गरीबांचं जगांत चालायचं कसं ? कुबेर असला तरी त्याला लक्ष्मीला लाथाडून भागत नाहीं. मग तुम्हींआम्हीं तर कोणत्या झाडाचा पाला !–नाहीं का ?"

"खरेंच तें !" 'हूं' पेक्षां एवढें जास्त शांता बाह्यतः बोलली. आनंदी जें बोलत होती, तें समजण्याइतकीही अक्कल शांतेला नव्हतीच का ?

"आणखी तूं कितीही जरी 'कले'ची गोष्ट लिहिलीस, तरी तूंच सांग,

वामनरावांच्या हस्तगत एकादी ‘ कला ’ असती, तर नसता का त्याचा उप-योग झाला अशा वेळीं ! ” यावर शांता काय बोलणार ?

“ बरं, ” आनंदी आणखी पुढें म्हणाली, “ आतां अशा वेळीं आह्मीं कांहीं तरी तुला हातभार लावायचा खरं ह्मटलं तर; पण कसं होतं पहा. सांगण्यासारखी गोष्ट नाहीं, पण तुला सांगतें, त्या दिवशींच मी ह्मटलें, आपल्या ह्मातार्‍याला घरीं बसायला सांगून—नाहीं तरी त्याच्या हातून काम नाहींच होत—त्या जागीं वामनरावांची योजना करायची. पण तें जमण्यासारखं नाहीं. एक तर ह्मातारपणीं त्याला काढून निराधार करणं गैर. त्याला ठेऊन वामनरावांना बोलावण्याइतकी सध्यां आमची स्थिति नाहीं. काय झालं आहे कोण जाणें, पण सध्यां आमच्या अंगशीं इतकं आलं आहे कीं सांगायची सोय नाहीं. दहा मोटारी घेतल्या, आणि तितक्याच विकल्या, पण, त्यांत आपला आमच्या पदरीं चार हजारांचा तोटा. अस्सं सध्यां ज्या त्या कामांत झालं आहे. एकंदर बघ गेल्या वर्षांत म्हणे, आमच्या घरची पंधरावीस हजारांची उधळपट्टी झाली. दिवाणजीच आमचे एक दिवस बोलतां बोलतां बोलले, म्हणून मला कळलं. माझ्या तर काळजाचं पाणीच झालं. कसे हे वीस हजार भरून काढायचे तूंच सांग बरं ! अन् पुष्कळ मनांत आलं कीं, तुह्मांला हातभार लावावा, तर कसं करायचं ? ”

ज्यांत आपला मोठेपणा, व सहाय करायची इच्छा आहे, पण स्थिति अशी आहे म्हणून कांहीं करतां येत नाहीं, असें हें गाणें आनंदीनें शांतेजवळ किती तरी वेळ चालविलें, आणि आली तशी निघून गेली.

ती झाली तरी विरोधी जगांतलीच. तिनें असें वर्तन केलें तर त्यांत आश्चर्य कसलें ? आतां ‘ मी पुढें काय करावें, ’ हा अष्टाक्षरी मंत्र माझ्या-मागें लागला. पुन्हां नोकरी धरायची काय ? पण कुठें आणि कसली ? नोकरीवर लाथ मारणार्‍यानें पुन्हां नोकरीचें नांव घ्यावयाचें म्हणजे काय ? नाहीं तर काय करावयाचें ? कांहीं सुचेना. स्वस्थ तरी हातपाय जोडून बसावयाचें कसें ? कुणाला विचारावयाचें ? कुणाचा सल्ला घ्यावयाचा ? कोण आपल्याला सहाय्य करणार ?

मी कांहीं करावयाचें नाहीं, नोकरी धरावयाची नाहीं, आणि आतां मिळा-

यचीही नाहीं, दुसरें कांहीं जमेपर्यंत—पण तें दुसरें कांहीं काय, याचा थांग ना पत्ता, अशी अवस्था तर आहेच. संसाराला लागणारें 'पैशा'चें ओंगण आणावयाचें कोठून ? काय ? म्हातारपणीं आईला दुसऱ्या कोणाकडे स्वयंपाक करायला पाठवूं ? 'शांतेला' दुसऱ्याचीं दळणाकांडणासारखीं काबाडकष्टाचीं कामें करायला सांगूं ? कीं आहे त्या शिक्षणाच्या भांडवलावर, कोणाच्या तरी वशिल्यानें कुठें तरी नोकरी करायला लावूं ? विमलला कुणाचीं तरी लहान-मुलें संभाळायला आणि मधुकराला एकाद्याच्या घरीं हरकाम्या 'बॉय' म्हणून ठेऊन देऊं ? म्हणजे सगळींच घरचीं माणसें मिळवतीं होतील ! आणि माझ्यावरचा प्रत्येकाचा भार कमी होईल !—अरेरे ! ! काय ही माझी स्थिति, आणि माझ्या मनाचें अधःपतन ! असें करावयाचें, म्हणजे कसलें मग माझें 'घर' तें ! कसला माझा, संसार तो, आणि कसलें तें माझें जिणें ! माझ्या संसाराची जबाबदारी मी पाळावयाची म्हणजे तरी काय मग ?

माझें मन आणि माझे विचार कुणीकडच्या कुणीकडे भडकत चालले होते. माझ्या मनाचा धर आतां चांगलाच सुटला होता. समाधानाची जागा—म्हणजे आई किंवा शांता अजून बोलली नव्हती, माझ्या 'मूर्खपणा' चा उल्लेख केला नव्हता, एवढीच काय ती होती. मन त्याचा एकदां सोक्षमोक्ष व्हावा, असें इच्छित होतें. मला राहवेना. मी त्या भरांत आईजवळ गेलों, तिच्यासमोर बसलों, तिचा हात माझ्या हातांत घेतला, क्षणभर खालीं पाहिलें. मनाच्या सर्व शक्ति एक वटल्या आणि विचारलें—

"आई !—"

"काय बाळ ?"

"मी फार मोठी चूक केली. मोठाच गाढवपणा माझ्या हातून झाला आहे."

"नाहीं बाळ ! चूक कशाची ? जसं जसं नशीबांत असतं तसं तसं व्हायचंच ! त्याला तुझा काय उपाय बरं ?"

"मग आतां करायचं काय ?—आई, मला तर कांहींच सुचत नाहीं !—मी काय करूं ?"—

"असा धीर खचवून कसं चालेल बाळ ! कांहीं घाबरूं नकोस ! नशीब

आपल्याला चांगले दिवस दाखविल्याशिवाय राहणार नाहीं! ढग यायचे, गडगडाट व्हायचा, गारांचा मारही घ्यावा लागायचा, पण तें नेहमींचेंच असतं का? तुझ्या वडिलांची पुण्याई एवढी मोठी आहे–" आईला बोलतां बोलतां वडिलांची आठवण झाली. गळा भरून आला, डोळे पाण्यानें भरले, तिचे पुढचे शब्द तसेच राहिले. माझ्या डोळ्यांत पाणी आलें.

वडिलांची पुण्याई, आईची सात्त्विक तपश्चर्या, आणि आईचे अश्रु, यांतच माझा व्यवहारी 'मूर्खपणा,' आईनें कुठच्या कुठें नाहींसा केला. आईचा सगळा भरंवसा 'नशिबा'वर! आमच्यापैकीं कोणाचें 'नशीब' पुन्हां सुखाचे दिवस आम्हांला दाखविणार होतें कोण जाणें! माऊली ती! माझ्या गाढवपणामुळें सगळ्या जगानें माझी छीः थू: केली, आईला, दुपारीं उपास घातले, तरी तिच्या तोंडून मी 'मूर्खपणा' केला आहे असें कांहीं आलें नाहीं! याचेंच नांव मातृप्रेम! त्या मातृप्रेमानेंच मी 'मनुष्य' आहें, मनुष्यपणाच्या खालच्या कोटीला गेलों नाहीं, असें मनाला वाटायला लागलें. तितकेंच बरें वाटलें.

आईच्या अंतःकरणाला मायेमुळें मुलाचा अपराध दिसतच नाहीं. म्हणून आईनें माझा अपराध माझ्या माथीं मारला नाहीं. म्हणून त्या परीक्षेंत यश सहज आलें. पण यापेक्षा अवघड परीक्षा 'शांते'पुढें होती. विषय निघून शांतेनें जर इतराप्रमाणें ठपका दिला, तर मग काय आयुष्यांत राम राहिला? सर्व संपलेंच म्हणावयाचें!–दोघांच्याही मनांत बोलावयाचें होतेंच पण अगोदर कुणी बोलावयाचें? हा प्रश्न होता. पण एक दिवस तो प्रसंग आला.

चालू प्रसंगांत शांता विशेष उत्साही आणि आनंदी दिसत होती. ती तशी मुद्दाम मनाची तयारी करून वागते कीं काय? कीं सहज वृत्तिच तिची ती, याबद्दल मला अलीकडे समजेनासें झालें होतें. सहज वृत्ति असेल तर गोष्ट निराळी. पण मुद्दाम धारण केला असेल, तर त्याला स्पर्श करावयाचा अवकाश! त्याचा एकदम सुरुंगासारखा धडाका उडावयाचा, अशी मनाला धाकधूक वाटत होती.

मनुष्यस्वभाव मोठा विलक्षण आहे. ज्याबद्दल भीति वाटत असते, ज्यामुळें आपल्याला जबरदस्त धक्का बसणार अशी कल्पना असते, त्याच्या सभों-

वतीच मनुष्य घोंटाळत असतो, त्याची परीक्षा घेण्याविषयीं उत्सुक असतो.

जीव मुठींत धरून मीच शांतेला विचारलें--

" मला जगानं तर मूर्खांत काढलच—"

" जगाला जसं वाटलं, तसं त्यानं केलं! "

" मग जिवाचे जिवलग काय करतील ? "

" कोण जाणें! " शांता एवढेंच उद्गारली. यावेळीं तिनें माझ्या डोळ्याला डोळा दिला नाहीं. माझ्या दोन्ही प्रश्नांचीं उत्तरें शांतेनें इतकीं चमत्कारिक दिलीं कीं, माझ्या जिवाचा त्यामुळें थरकांप झाला! माझ्या ' नोकरीवर लाथ मारण्याला ' शांतेनं मूर्खपणाचा छाप मारला, असेंच मला वाटलें. माझ्या जिभेला कोरड पडली. श्वासोच्छ्वास थोडा वेळ थांबला. शुष्क स्वरांत माझ्या झालेल्या समजुतीप्रमाणें मी मोठ्या कष्टानें पुढें म्हटलें—

" तुह्मां सर्वांना माझ्या मूर्खपणानें अर्धपोटी उपाशीं राहावयाला लावतों आहें, तेव्हां तुह्मी सर्वजण जितका दोष द्याल, जी कडक शिक्षा कराल, त्याला मी पात्रच आहें. कुटुंबपोषणाकरितां यमयातनांनाही जुमानणार नाहीं म्हणणारा मी-प्रत्यक्ष वेळ आल्यावेळीं त्या यातनावर लाथ मारून घर गांठलें-आणि तुह्मांला उपाशी ठेऊं लागलों. "

" पण माणुलकीला विकून, मुरदाडपणाचें अन्न मिळवून त्यावर जगण्या-पेक्षां किंवा जगविण्यापेक्षां, कांहीं दिवस तशी उपासमार पडली, तरी त्यांत सगळेच असंतुष्ट होतील, असें नाहीं. आज असहाय माणुसकी, उपाशी ठेवलि, पण तीच उद्यां पोटभर जेवायलाही घालील, तेंच खरं पोट भरणं, तेंच खरं जगणं! " शांता उद्गारली.

मी थक्क झालो! शांताच हें बोलली का ?

" जगानें मत सांगितलंस, कीं तुझें ? "

शांतेनें नुसतेंच माझ्याकडे पाहिलें. मग पहिल्यांदा ती तसें कसें बोलली ?

" नोकरी सोडली. पुन्हां करावयाची नाहीं, किंवा मिळणारही नाहीं! मग पुढें काय करावयाचें ? "

"उद्योग !— व्यापार ! नाहीं तरी नोकरी कनिष्ठच म्हणतात कीं नाहीं ? त्याचा अनुभवही प्रत्यक्ष आला ! मग पुन्हां नोकरीची आठवण तरी कशाला ? नाहीं तरी नोकरी जन्मभर करावयाची, म्हणून प्रतिज्ञा केली होती थोडीच ? नोकरीचं जग संपलं,तर व्यापाराच्या जगांत कोणी येऊं देत नाहीं, असं थोडंच आहे ?" शांतेनें सुचविलें.

व्यापाराची कल्पना डोक्यांत घुसली. शांतेनें घुसविली. त्या जगांतल्या अडचणी या वेळीं कशा समजणार होत्या ? मला वाटलें, उद्योग देवतेनें हा मार्ग मला दाखवून दिला.

विरोधी जगांत आई व शांता मला आढळल्या नाहींत. याचें केवढें मोठें समाधान मला वाटलें. त्या जोरावरच मी जीवंत झालों, आणि जगाकडे आशेची दृष्टि उघडून पाहूं लागलों. उद्यांपासून व्यापारी जगांत घुसावयाचा कृतसंकल्प केला. आईची 'नशिबा'ची वाणी, व शांतेची 'उद्योगा'ची सांगणी, या दोहोंचा मिलाफ विरोधी जगांत मला कांहींच मार्ग दाखविणार नाहीं का ?

---

## —प्रकरण १२ वें—

# प्रयत्न

**सुखा अंग देऊं नये, प्रयत्न पुरुषें सोडूं नये,**
**कष्ट करितां त्रासूं नये, निरंतर ॥**

—श्रीसमर्थ

आईनें ' नशीबा 'चा आधार दिला, आणि शांतेनें ' उद्योगा 'ची कांस धरून ' व्यापारी ' जगांत शिरण्याचा दिव्य संदेश सांगितला. माझ्या मनानें तें घेतलें. मी त्या मार्गाला लागलों, इच्छित स्थल गांठीपर्यंत होतील ते कष्ट सोसावयाचे ! पडेल तो त्रास भोगावयाचा, हें तर ठरलेंच. माझ्या बरोबर माझ्या कुटुंबियांचीही ती तयारी अर्थात् होती ! तें सर्व आतां आम्हां सर्वांच्या आंगवळणी पडलें होतें.

पण ' व्यापार ' करावयाचा म्हणजे काय ? एकादें ' विश्रांतिगृह ' स्थापून ' कप बशा ' मांडून बसवयाचें ? किंवा त्याचीच बहिण खाणावळ काढूं ? ' हिंगजिरेमिरे ' घेऊन आज हजारो दुकानदार बसले आहेत, त्यांच्या शेजारीं मी आणखी एक भरीला दुकान उघडावयाचें ? 'कापडा 'चें, 'घड्याळा 'चें, ' पानपट्टीचें, ' ' विड्याकाडयांचें ? ' कीं मंडईत ' भाजीच्या पाटीवाल्याशेजारीं' आपलीही एकादी भाजीची पाटी घेऊन बसण्याचें ? कसला व्यापार करावयाचा ? कां थेट विलायतेहून कोणत्याही तऱ्हेचा मोठ्या प्रमाणावर माल मागवून तो किरकोळीनें किंवा घाऊक विकावयाला लागवयाचें ? हिंगजिऱ्या 'च्या दुकानावर दिवसभर राबून रात्रीं कवडथारेवडथाचा हिशेब करीत बसून दररोजचे तगादे भागवयाचे, कीं विलायतेचा माल मागवून, त्याची व्ही. पी. आल्यावर ब्यांकेवर 'चेक' द्यावयाचे, ते वेळेवर देतां आले नाहींत तर, गोडाऊन चार्जेस, डिमरेज, वगैरे भरायला लावून त्या मालाच्या किंमती इतकाच भुर्दंड—तो माल आपल्या पदरांत पडेपर्यंत—भरावयाला लागून त्यावर मिळणारा नफा अगोदरच संपविण्याचा उद्योग करावयाचा ?

परंतु यापैकीं कांहींही करावयाचें झालें तरी ‘ सर्वारंभास्तंडुलाप्रस्थमूलाः ।’ तें त्याला लागणारें छोटें किंवा मोठें भांडवल कुठून उभारावयाचें ? भांडवल कोण देणार ? आह्मांला कां देणार ? भांडवल देणारानें आमच्याकडे पाहून द्यावयाचें, ते आह्मी कोण ? आमच्याजवळ काय आहे ? ईश्वरदत्त साडेतीन हात देह ! पण एवढ्या भांडवलावर व्यापाराला लागणारें तें भांडवल ‘उभारलें’ जाणें सर्वथा अशक्य !

हें जर अशक्य, तर मग करावयाचें कसें ? प्रयत्न तो कसा करावयाचा ? या दुर्लंध्य अडचणी अशा पुढें उभ्या राहिल्यावर सात आठ तास ऑफिसांत पाट्या टाकावयाच्या व मोजके दाम हातीं घ्यावयाचे हेंच जास्त चांगलें, असेंही क्षणभर मनांत येई !

पण–पुन्हां वाटे, ‘ भांडवल ’ उभारणें अशक्य नाहीं. उद्योगाला–सतत उद्योगाला सुरुवात केल्यानंतर भांडवल आपल्या पाठीमागें धांवत येईल. कारण तसें नसतें तर, निर्णयसागरचे जावजी दादाजी, टोप्यांचे कारखानदार ‘ अनंत शिवाजी देसाई ’ ‘किर्लोस्करवाडी’ स्थापन करणारे लक्ष्मणराव किर्लोस्कर, आपल्या अस्सल देशी ‘ प्रभाकर कंदील ’चा हिंदुस्थानांत व हिंदुस्थानाबाहेरही प्रकाश पाडून दाखविणारे ‘ओगले,’ प्रयत्नांची शिकस्त करून स्वतःच्या हिंमतीवर ‘ गजानन मिल्स ’ची स्थापना करणारे, व तिला रंगरूपाला आणणारे ‘वेलणकर ब्रदर्स,’ स्त्रीशिक्षणाच्या संस्थेला अत्यंत अल्प स्वरूपांत सुरुवात करून, त्याची अखेर ‘ स्त्रियांची युनिव्हर्सिटी ’ स्थापण्याइतकी परिणतावस्था प्राप्त करून देणारे प्रो. कर्वे, आमच्यामधून–आमच्यासारख्या सामान्य संसाऱ्यामधूनच निघाले ना ? मग त्यांना जें करतां आलें, तें किंवा तितकें जरी माझ्या हातून झालें नाहीं, तरी त्यांचे आदर्श पुढें ठेऊन प्रयत्नाला लागलों, तर माझा संसार सुखाचा करण्याइतकेंही यश मला येणार नाहीं काय ? आणि एवढेंही प्रयत्नांतीं झालें नाहीं तर मग समर्थांच्या वचनांत तथ्य तें काय राहिलें ?

व्यापाराची कल्पना डोक्यांत शिरल्यापासून माझ्या मनांत वरील तऱ्हेचे उलटसुलट विचार एकसारखे धुमाकूळ घालूं लागले होते. या नव्या कल्पनेच्या मूर्त स्वरूपासाठीं कोणाचा आश्रय घ्यावयाचा ? कोणापुढें हात पसरावयाचा ?

काय सांगून हात पसरावयाचा? 'भांडवल' मिळालें तर काय करून दाखवीन ह्मणावयाचें? हेही विचार पहिल्या विचारांच्या पाठोपाठ येत. खरेंच, मला काय करतां येण्यासारखें होतें?—

कोणतीही '**कला**' सामान्य संसाराला पूर्णपणें वावडी, असें शांतेनें सप्रमाण सिद्ध केलें होतें. तेव्हां तिकडे पहावयाची सोय नव्हती. आणि पाहून तरी नुसतें काय होणार होतें? 'कला' आत्मसात, निदान 'पोटाला' देईल इतपत मिळवावयाची तयारी—करावयाची ह्मणजे संन्याशाच्या संसाराला शेंडीपासून तयारी करण्याइतकें तें व्हावयाचें? त्याचा आज माझ्या संसाराला तात्काळ कसा उपयोग होणार होता?

आतां राहिले अविश्रांत शरीरकष्ट करावयाचे, आणि मिळालेल्या ज्ञानाची जोड जशी लागेल तशी द्यावयाची!

पण निष्फळ शरीरकष्टाला भांडवलाचें फळ कसें येणार? त्याकरितां नशिबाची आराधना केल्याखेरीज गत्यंतर नाहीं. नशीब! माझें नशीब तरी काय आहे? माझ्या नशीबानें जगन्नाथ—विश्वनाथाप्रमाणें मला एकाद्या गर्भ-श्रीमंताच्या पोटीं जन्माला घातलें नाहीं. माझ्या नशीबानें उच्च शिक्षणाच्या सर्व पायऱ्या चढून जाईपर्यंत माझ्या वडिलांना जगविलें नाहीं. आई म्हणाली नशीबावर भरंवसा ठेव. नशीब तुला दगा देणार नाहीं! नशीब माझ्या बावतींत करणार आहे तरी काय? एकादें कुठले भूधन अचानक पदरांत आणून घालणार आहे? 'असेल माझा हरी तर देईल खाटल्यावरी' या वेड्या ह्मणीप्रमाणें नशीब मी निजल्या जागीं माझ्यावर पैशांचा पाऊस पाडणार आहे? का एकाद्या इनामदार जहागिरदाराचा दत्तक बनवून सोडणार आहे, माझें नशीब मला? माझें नशीब जर तसें शिकंदर असतें, तर माझ्या आयुष्याची प्राप्त परिस्थिति त्यानें कां होऊं दिली असती? उद्योग जरी लंगडा असला, तरी तितकेंच त्याबरोबर नशीबही पांगळें असलें पाहिजे. तेव्हां नशीबाच्या नादाला लागण्यांत काय अर्थ आहे?

आजकाल उठल्यासुटल्या हे असे विचार होते. मी कांहीं तरी उलाढालही करावयाची असें ठरविल्यामुळें नित्य नवी योजना कांहीं तरी मनांत आणी, आणि सकाळीं घराच्या बाहेर पडे. तों हिंडाहिंड हिंडे. माझी जरी

नोकरी सुटली होती, सर्वांना माहीत झालें होतें, आमच्या खातेवाल्या दुकानदारालाही जरी कळलें होतें, तरी तो पहिल्याप्रमाणें अजून लागेल तो माल उधार देत होता. त्याची ही खात्री होऊन चुकलेली होती कीं, मी कांहीं हातपाय हालवून मिळकतीचा मार्ग शोधून काढल्याखेरीज राहणार नाहीं. आतां नोकरी असतांना जसा अधिक उणा माल देतांना दुकानदार सढळ हात ठेवीत होता, तसाच याही वेळीं होता कीं नाहीं, हें सांगतां आलें नसतें. पण तो माल देत होता, व हें तरी एक माझें नशीबच होतें. एवढ्या नशीबाच्या आधारावर इकडची दुनिया तिकडे करण्याची वास्तविक कोणाही महत्त्वाकांक्षी माणसानें महत्त्वाकांक्षा बाळगायाला हरकत नव्हती. मी फक्त माझ्या उद्योगाचें एकदां कुठें तरी जुळूं दे एवढेंच धरून बसलों होतों.

बाहेर भटकतांना आमच्या त्या दुकानदाराला व्यापारी जगांतला मी पहिला गुरु करावा, म्हणून मनांत आणलें, आणि एकदां सहज म्हणून त्याच्या तिथें बसलों. इकडच्या तिकडच्या चार मामुली गप्पाटप्पा झाल्या. आणि मी माझी गोष्ट काढली. मी म्हटलें—

" काय हो शेटजी, मी कसला तरी व्यापार करावा म्हणतों ! तुमचं मत काय आहे ? तुमचा व्यापारांत जन्म गेला म्हणून तुमची सल्ला विचारतों-- "

दुकानदार माझ्या विचारण्यानें हंसला नुसता !

त्याचें हंसणें मला कसेंसेंच वाटलें. मी किंचित् खजील झालों. तरीपण तितक्यांतून विचारलेंच, "कां शेटजी हंसलांतसे?–माझी व्यापाराची कल्पना–"

" अं हं ! " शेटजी मला मध्येंच थांबवून म्हणाले, " तुम्हां शिकलेल्या लोकांचें तें काम नव्हे ! "

" म्हणजे ? आम्हीं मग काय करावयाचें ? "

" नोकऱ्या! दुसरें काय ?–अकरा ते पांच कचेरींत काम केलं, उपरणं झटकलं, कीं चालले गेले. एवढेंच तुम्हीं करायचें, आणि एवढेंच तुमच्या हातून व्हावयाचें ? "

" म्हणजे काय ? आमच्या हातून कसलाच व्यापार व्हायचा नाहीं ! "

" नाहीं ! "

" कां ? "

" तुम्ही शिकलेले म्हणून ! "

" शिकलेले लोक व्यापारांत नालायख असं तुमचं म्हणणं ? "

" होय ! "

" हें कशावरून ? "

" शिकलेल्यांना शरीर राबविण्यांत,गिऱ्हाईकापुढें पुढें पुढें करण्यांत, ताजवा हातांत धरण्यांत कमीपणा वाटतो.त्यांना व्यापारापेक्षां नोकरींत मोठेपणा वाटतो. नोकरींत पांचसांत तासच कष्टाची त्यांची कल्पना असते, व्यापारांत दिवसरात्र जेवणखाण सोडूनही राबावं लागतं. तें तुह्मां शिकलेल्या लोकांच्या हातून होणें नाहीं ! शिवाय—"

" शिवाय काय ? " शिवाय म्हणून दुकानदार जरा थांबला म्हणून मी म्हटलें, " बोला, शिवाय काय ? "

" माझ्या बोलण्याचा राग मानूं नका, सांगतों तुह्मांला, " दुकानदारानें पुढें बोलण्यास सुरुवात केली, " व्यापाराला ज्या गोष्टी–भांडवल, सचोटी, चिकाटी, आणि शब्दाची किंमत, आणि अहोरात्र शरीरकष्टाची तयारी–इतक्या लागतात; त्यापैकीं एकही गोष्ट शिकलेल्या लोकांना आवश्यक आणि महत्त्वाची असते, याची ते कधीं चौकशी करीत नाहींत, किंवा त्यांची पर्वाही त्यांना नसतें. "

" असें कशावरून म्हणतां ? "

"आजकालचा उठल्याबसल्या अनुभव आहे ! आणखी एक तुह्मां लोकांची खोड सांगतों, ' लबाडीशिवाय व्यापार नाहीं, ' अशी शिकलेल्या लोकांची वेडी समजूत झालेली असते. आणि जो कोणी एकादा शिकलेला कांहींतरी थातुरमातुर करून कसलें तरी व्यापाराचें सोंग उभं करतो, त्यांत तो आपली दृष्टि हीच ठेवतो, आणि दुसऱ्याकडेही त्याच नजरेनं पाहतो. मग आतां सांगा तुम्हींच, शिकलेल्या तुह्मां लोकांकडून व्यापार कसा व्हायचा ? "

वास्तविक दुकानदाराचें प्रत्येक वाक्य खरें होतें. पण तें त्याचें खरें होतें, म्हणून मी तो ' विषय आपल्या हातून तें होणें नाहीं, ' असें म्हणून सोडून देणें शक्य नव्हतें. म्हणून शेटजीला आणखी निरानिराळे खोदून खोदून प्रश्न करून विचारीत सुटलों. त्यानें पुढीलप्रमाणें शिकलेल्यांच्या स्वभावाचें आणखी

दिग्दर्शन केलें. तो म्हणाला, "शिकलेल्यांच्या बोलण्यांत बोलणें नसतें. बोलण्यांत आणि वागण्यांत हटकून मेळ नसायाचा! दुसऱ्यावर विश्वास चुकूनही नसतो अहंमन्यता, आढ्यता आणि अहंकार, यांचें प्राबल्य केवढें जबरें! शिकलेले लोक 'आळशीपणाला आपलें एक भूषणच समजतात! फुंकून नसावयाचें, आणि फुंकून उठायचें, ही त्यांची नाजूक स्वच्छतेची कल्पना आंग-मोडून काम करायला कधीं परवानगीच देत नाहीं! आणि खऱ्यापेक्षां डौलाचा डोलारा उभारण्यांत, तसेंच शरीर व मनाला धडधाकट बनाविण्याच्या आव- यक बाबींपेक्षां 'चैन' करण्यांत आयुष्याची आणि संसाराची इतिकर्तव्यता शिकलेल्यांनाच वाटते! जरी हे शिकलेले असले, जरी त्यांना हिशेबठिशेब उत्तम येत असला, तरी 'निव्वळ नफ्यांत' आपला प्रपंच चालला पाहिजे, आयापेक्षां खर्च कमी ठेवला पाहिजे, हें मन्त्र त्यांच्या गांवीं कधीं येत नाहीं अं! आपण खातों तो 'नफा' कीं 'भांडवल' याचा पूसतपास ते कधींच करावयाचे नाहींत! असें करून शिकलेले लोक कुबेराला भीक मागायला लाव-तील! आणखी तें काय सांगूं? तेव्हां सांगतों तुह्मांला, तुह्मां शिकलेल्यांना चुटपुटती 'नोकरी'च ठीक! 'राजारा़णी'ला आंगठीवरच्या खड्यासारखा झोकांत 'नोकरी'वर संसार थाटतां येतो.

दुकानदार बोलतांना चांगलाच खुलला होता, आणि त्यानें त्या भरांत शिकलेल्यावर चांगलीच उपरोधिक बोलण्याची झोड उठविली होती. ती इतकी कीं, मी अगदीं जाणून बुजून इतकें घट्ट मन करून बसलों होतों, तरी शेवटीं शेवटीं मी निराश होण्याच्या बेताला आलों. तेथें बसण्याची किंवा दुकानदाराचें आणखी बोलणें ऐकण्याची इच्छाच संपली, आणि मी तेथून दुका-नदाराचा निरोप घेऊन जायला उठलों.

दुकानदाराला काय वाटलें कोण जाणें. मी निरोप घेतांना तो ह्मणाला, "बोलल्याचा राग धरूं नका वामनराव! मी तुह्मांलाच ह्मटलं असं नाहीं. आजकालच्या शिकलेल्या लोकांबद्दल मी सर्वसाधारण बोललों. तुह्मांला भांड-वलबिंडवल जर मिळालं, तर व्यापारांतही चांगली आघाडी माराल, असें मी आजवरच्या तुमच्या कामाच्या धडाडीवरून खात्रीनें सांगेन. पण झालं आहे काय, सांगतों तुम्हांला, आजकाल व्यापारांत तरी राम राहिला आहे कुठें?

आह्मीं आज इतकीं वर्षे व्यापार मांडून बसलों आहोंत ना ? पण आह्मी सुद्धां अलिकडे अगदीं टेकीला आलों आहोंत. सध्यां कोणताही व्यापार मांडा, त्याला तेजी नाहीं, बरकत नाहीं ! अहो, आजकाल व्यापारपेठेंत जरा जाऊन पहा, कित्येक पिढ्या भरभराटीनें चाललेल्या दुकानांचीं भडाभड दररोज दिवाळीं निघताहेत ! व्यापारांत आमच्यासारख्याला इभ्रतीनं दिवस काढायचं कठीण आलें आहे ! व्यापारांत शिरायला त्यांत जीव तरी कुठं राहिला आहे ? त्यावेळचे दिवस निराळे होते. आतां साराच मनु पालटला आहेः तेव्हां सांगतों तुह्मांला भले असाल, तर आपली आणखी चार ठिकाणीं हिंडून ' नोकरी ' पकडा. दग-दग नको, आणि तो व्याप नको ! "

कोणी गिऱ्हाईक माल घ्यायला आलें, तिकडे दुकानदार गुंतला, मी शुष्क-मनानें उभा राहूनच शेपटचें त्याचें बोलणें ऐकत होतों, तो दुकानदार कामांत गुंततांच, मी चालावयाला लागलों.

पहिला व्यापारांतला गुरु भेटला, त्यानें अडगे घालून माझी कंबरच मोडून टाकली. त्यानें व्यापारी जगांतल्या अडचणींच्या गुंतागुंतीचें असें विलक्षण जाळें मजवर फेंकलें ! कीं त्यांतून सहीसलामत बाहेर पडतां पडतां माझा प्राण मेटाकुटीस आला ! सगळे धागे चुकवीत, व मनाच्या खंबीरपणानें उकलीत किंवा बाजूला सारीत आणले, परंतु एक जबरदस्त धागा—भांडवलाचा—त्याच्यापुढें कांहीं माझा इलाज चालेना ! त्या धाग्याजवळ मन आलें, आणि त्याचा खंबीरपणा पाहून पेंगळून तेथल्या तेथेंच पडलें !

आज आमचा देश कितीही दारिद्र्यपंकांत रुतलेला असो, पण अशाही स्थितींत ठिकठिकाणीं अजून इतकी संपत्ति सांचून राहिली आहे, इतक्या संप-त्तीची अहोरात्र अनाठायीं व अनवश्यक उधळपट्टी चाललेली आहे, कीं त्याकडे पाहिल्यावर माझ्या सारख्याच्या सामान्य व्यवहाराला लागणारें सामान्य ' भांडवल ' मिळविणें ह्मणजे लहान मुलांच्या खेळाइतकेंही तें महत्त्वाचें किंवा अवघड नाहीं, असें ठरलें. असें आहे तर ' भांडवल ' मिळवावयाला इतकें संकट कां ? संकट नव्हे, तर अनेक संकटें आहेत, आणि त्याचें दिग्दर्शन दुकानदारानें आपल्या समजुतीप्रमाणें अनेक प्रकारानें करूनही दाखविलें आहे. शिकलेल्या लोकांचा कोणाचा पायपोस कोणाच्या पायांत नसतो. विश्वास,

सचोटी, नेकी व शब्दाची किंमत या सर्वांचा पूर्ण अभाव असतांना कोण भांडवल द्यावयाला धजेल ? त्या शिकलेल्या लोकांतच मी मोडतों. मग जी गत सर्व शिकलेल्यांची तीच माझी ! खरेंच. जगांत प्रथम व्यापाराला केव्हां सुरुवात झाली असेल ? पहिला भांडवलवाला कोण असेल ? भांडवलाची कल्पनाच कशी निघाली असेल ? आणि लोक देऊं घेऊं लागले असतील कसे? आजच्यासारखीच बेबंदनगरी आणि झोटिंगबादशाही त्यावेळीं असेल काय ?

बुद्धीवानाला त्याच्या बुद्धिचा सदुपयोग करण्याकरितां भांडवल उभें करण्यास काय करावें लागत असेल ? सरळ मार्गानें गोष्ट जमली नाहीं तर–तो बुद्धीमान मनासारखें भांडवल जमविण्याकरितां "**बाबू चष्मेवाला**" अखेर बनत असेल काय ? काय ? '**पैसा**' मिळविण्याकरितां हुषार माणसाला चोर, दरोडेखोर बनावें लागत असेल ? चोरीची, दरोड्याची कल्पना आली, कल्पक 'बाबू चष्मेवाला' आठवला, आणि मला 'भांडवला' करितां अखेर "बाबू चष्मेवाला" तर बनावें लागणार नाहीं ? मी तसा बनेन ? कल्पना आली, आणि माझ्या आंगावर शहारे आले ! त्या विलक्षण कल्पनेनें माझा मीच पांढरा फटफटीत पडलों. डोळे निस्तेज झाले !

'पैशा'करितां मला चोर दरोडेखोर बनावें लागणार ? कोण अधःपात हा ! पैशाकरितां मनुष्य काय करील, आणि काय नाहीं, याचा कांहीं नेम नाहीं. 'पैसा' मिळवावा लागतो, ही कल्पना आल्यापासून, भिक्षेकरी, हमाल, आह्मीं नोकरीवाले शिकलेले मजूर, चोर, दरोडेखोर, खिसेकापू, यांची मालिकाच्या मालिकाच मनापुढें उभी राहिली !

'पैसा' मिळविण्याकरितां, उद्योगाला लागणारें भांडवल मिळविण्याकरितां असेंच कांहीं तरी बुद्धिमान पण दरिद्री महत्त्वाकांक्षी मनुष्याला करण्याखेरीज शक्यताच नसते काय ? पण असें करावें लागल्यानंतर त्यांत तरी माणुसकी, सज्जनपणा, ऋजूपणा, हीं कुठें राहिलीं ?

बरें, हें नाहीं करावयाचें तर मग किमयेचा नाद धरावयाचा ? हिमालयांतले कधीं तरी भेटणारे अवलिये असतात, त्यांचा शोध घेऊन भेटून, त्यांना प्रसन्न करून, त्यांच्याकडून 'किमया' करून रासायनिक जडीबुट्टीनें नवीच

संपत्ति निर्माण करावयाची ? कीं, नशीबाची किमयाकरितां, 'रेसग्राऊंड'वर पाऊल टाकावयाचें ?

किमयेनें नवी संपत्ति निर्माण करावयाची, 'रेसग्राऊंड'वर जाऊन घोड्या-वर पैसे लाऊन 'नशीब' उघडतें आहे कीं काय तें पहावयाचें ? काय मोहक—मधुर कल्पना आहेत या ! मन कसें त्या कल्पनाशीं सहज समरस होऊन जातें. 'पैशा' करितां हें कांहीं तितकें वाईट नाहीं ! भिक्षा, हमाली, मजुरी, चोरी, दरोडेखोरी, या प्रकाराइतकें तरी 'किमया' किंवा 'रेस' कमी प्रतीचे खास नाहींत ना ? मग त्याला काय हरकत आहे ? पण 'किमये'नें पैसा मिळवायला किमयागाराचा शोध केला पाहिजे. तो हमखास वाटेल तेव्हां, व वाटेल तिथें कसा मिळणार ? व अमुकच वेळांत तो भेटेल याची हमी कोण देणार ? त्यापेक्षां 'रेसग्राऊंड' उत्तम ! शनिवार—बुधवार दोन दिवस 'नशीबा'ची पारख करावयाला असतात. तिथला अलोट पैसा लुटण्याकरितां आपण थोडासा तेथें जायला खर्च करावयाला तयार असले पाहिजे. पैशाजवळ पैसा यावयाचाच ! चाललें जुळत, व मनाला पटत ! पण 'पैशा'जवळ 'पैसा' जातो, हें कितीही खरें असलें तरी, 'रेसमधला' पैसा माझ्या जवळच्या 'पैशा'जवळ येतो आहे कीं, माझा पैसा 'रेस'मधल्या 'पैशाला'च जाऊन कडकडून भेटतो आहे, याचा पोंच त्यावेळीं मला कुठें होता ?

'पैशा' करितां माझें मन किती घसरत चाललें होतें. प्रत्यक्ष अजून कुठल्याच कृतीला आरंभ झाला नव्हता, तरी विचारानें किती तरी खालीं खालीं चाललों होतों. किमया करावयाची माझी तयारी झाली. अवलीयाला बोलावायचें, त्याची मर्जी व मिजास संभाळावयाची, त्याच्याबरोबर अमावास्ये-सारख्या रात्रीं अपरात्रीं—स्मशानादिकांतून साधनें करावयासाठीं भटकावयाचें, नाहीं तर 'रेसग्राऊंड'कडे धाव घ्यावयाची, आणि सर्वस्वाचें वाटोळें करण्याचें कंकण हातीं बांधावयाचें, कशाकरितां ? तर पैशाकरितां ! भांडवलाकरितां ? म्हणजे याही ठिकाणीं माणुसकीला मारावयाचेंच ! माणुसकी जर कुठेंही गेलें तरी मरावयाचीच, तर नोकरीवर लाथ मारूनही आपत्ति ओढवून कां घेतली ? किमयेच्या नादीं लागून आजवर कोण धनंतर झाला आहे ? मनाशीं विचार करूं लागलों, आढळांत कुठें कांहीं येतें काय ? हें पाहूं लागलों कुठें कांहीं जम बसेना.

रेसग्राऊंड'वर पाहिलें, तर एका टर्फक्लबखेरीज बाकीच्यांची बहुतेक शनिवार बुधवारला घरादाराची राखरांगोळी होत असलेली डोळ्याला दिसत आहे. कानानें, नागवलेल्या, उघडे पडलेल्या, निराधार झालेल्या कुटुंबियांच्या आर्त आरोळ्या ऐकावयाला येऊन अंतःकरणास थरकांप उडवीत आहेत, तरी मोकाट सुटलेले आशाळभूत मन पुन्हां त्याकडे घांव घेतच होतें. उलट विचारांनीं दबवून बसविलें, तरी फिरून उचल घेतच होतें.

आतां प्रयत्न करावयाचा ह्मणजे काय? कुठेंही जा, 'पैसा' मिळविण्याचा विचार करा, हलकटपणा स्वीकारल्याशिवाय, शीलाचें शीर मुरगळल्याखेरीज, माणुसकीचा मुडदा पडल्याविना तो प्राप्त होईल, असें सकृद्दर्शनी तर दिसेना. शेजाऱ्यांच्या, स्नेह्यासोबत्यांच्या, गोरगरीबांच्या विश्वासानें माना मुरगळल्याखेरीज 'श्रीमंत' होण्याची, पैसेवाला बनण्याची बातच खोटी, असें जवळ जवळ मन पक्कें ठरवूं लागलें. 'सुखा अंग देऊं नये' ह्मणतात. गोष्ट खरी! आमच्या घरीं कोण सुखाला सामोरें गेलें आहे? आई महिन्याचे बत्तीस दिवस उपासतापास करून आलेला दिवस संतोषानें ढकलते. ताक वाढायला लागलें तर सोसत नाहीं, दूध वाढायला आणलं तर आवडत नाहीं, असें सांगून, त्यामुळें राहिलेलें ताकदूध मुलांच्या संजोगण्याकरितां राखते. एका लुगड्याला, माझ्या जुन्या धोतराची जोड देऊन दिवस काढते. जो काळ ल्यायनेसायचा, हौसमौज करायचा, खायचाप्यायचा! 'ऋणफिटेल पण हिणवणें फिटणार नाहीं,' या म्हणींच्या आधारानें प्रसंगीं कर्ज करूनही ख्याली खुशाली करण्याचा, त्या काळांत शांतेचं परिस्थितीला अनुसरून त्यागी माणसाप्रमाणं अत्यंत कडक आचरण, आणि तेंही मोठ्या आनंदानें! मुलांचीं—अजाण भांवडांची गोष्ट तर याहीपेक्षां अंतःकरणाला पाझर फोडणारी! त्यांच्या भाकरीवर कधीं तुपाचा शिडकावसुद्धां कित्येक महिन्यांत मिळावयाचा नाहीं, एक सद्रा पुरता फाटून, एका परकरचोळीच्या चिंध्या चिंध्या होऊन कित्येक दिवस झाले, तरी मला घेतां आलें नाहीं, तरीपण मुलांनीं एक दिवस कधीं अकांडतांडव केलं आहे, किंवा शेजारच्या दारीं जेवणाखाणाच्यावेळीं आशाळभुताप्रमाणें जाऊन उभीं राहिलीं आहेत, असेंही कधीं झालें नाहीं. मी कसा वागे, हें मी सांगण्यापेक्षां न सांगणेंच बरें. आणखी सुखा अंग द्यावयाचें नाहीं

तें कसें ? प्रयत्न तर सोडून भागतच नव्हतें. कष्ट सगळ्यांच्या आंगवळणी पडलेले. तेव्हां त्याची तर्री क्षिति कोणाला वाटणार ?

इतकें करीत असून 'पैसा' मिळण्याच्या अंधेऱ्यामार्गांत एकही कसला प्रकाश किरण दिसत नव्हता. किंवा एकदाही विद्युत् चमकून आसमंतांतल्या भागाची आशाजनक स्थिति असल्याचा आधार देत नव्हती! तरी आह्मी जीव मुठींत गोळा करून चांचपडत तशाही अंधेरांत चाललोंच होतों.

शांतेनें 'व्यापारा'चा मार्ग दाखविला. मी होय म्हटलें, आणि प्रत्यक्ष चालण्या अगोदर नुसत्या विचारांचा हा फेरफटका मारला, तर संकटाचे, अड-चणींचे पर्वतच्यापर्वत, भीषण दऱ्याच दऱ्या दिसायला लागल्या. बाहेरच्या जगांतल्या अडचणीपैकीं एकीची जरी शांतेला अंधुक कल्पना दिली, तरी तिला काय वाटेल ?

मी एक दिवस बाहेरून भटकून येऊन, व बहुतेक ठिकाणीं आमच्या दुकानदारानें दिलेल्या व्याख्यानांच्या अनेक आवृत्त्या कर्णसंपुटांत सांठवून घरीं आलों. शांतेनें सहज विचारलें, "काय झालं आज ?"

मी ह्मटलें, "व्यापारासाठीं 'पैसा' मिळवायचा, तर भिक्षा मागितली पाहिजे. हमाली केली पाहिजे. चोरी केली पाहिजे. दरोडा घातला पाहिजे. कसली तरी किमया केली पाहिजे, नाहीं तर आपल्या जवळचें असेल तें विकून एकदां 'रेस'मध्यें 'नशीब' पाहिलें पाहिजे. त्याशिवाय कुठेंही, आ णि कुणाकडूनही पैसा मिळण्याची आशा नाहीं. मग यांतलं काय पत्करूं ? तूं सांगशील तें पत्करतों !"

हें ऐकतांच, शांतेनें जो चेहरा केला, जी तिची नजर झाली, तिचें वर्णन मला करतां येत नाहीं! तो कडवट चेहरा, व ती भेसूर नजर - छेः! शांतेला तशी मी केव्हांच पाहिली नव्हती! व तें दृश्य मी कधीं विसरणारही नाहीं!

---

## —प्रकरण १३ वें—

# सर्पाचे पाय पोटांत असतात !

### मधु तिष्ठति जिव्हाग्रे हृदये तु हलाहलम् ।

शांतेच्या त्या चेहऱ्यानें आणि नजरेनें माझे ' पैसे ' मिळविण्याकरितां शिष्टजनसंमत नसलेले मार्ग पत्करण्याकडे धांव घेणारे कुविचारांचें सैतान, त्या क्षणींच कोठच्या कोठें गाडले गेले. आणि माझे डोळे खाडकन् उघडले ! शांतेपुढें मी काय बोलून गेलों, हें आठवून, माझी मलाच लाज वाटली. ' माणुसकीला मारून मिळविलेल्या पैशावर जगण्यापेक्षां उपाशी राहिलेलें काय वाईट ? ' असें सडेतोड सांगणारी शांता, मला बद् सल्ला कसा देईल ? तशी मूक तरी सम्मति कशी दर्शवील ? खरोखर सांगतों, शांतेची मुग्ध सम्मति जरी मिळाली असती, तरी त्या पावली तडक उठलों असतों, आणि एकाद्या किमयागारालाच पैदा केला असता. ' रेस'च्या ' ग्राऊंडवर ' जाऊन उभा राहिलों असतों. नाहीं तर एखादा ' बाबू चष्मेवाला'ही बनावयाला कमी केलें नसतें !—परंतु—

परंतु शांतेनें—माझ्या देवतेनें नुसत्या कटाक्षानें त्या सर्व भुतांना गाडून टाकलें. आणि मला माणसांत आणलें, आणि सुचविलें, ' असें भलत्या अभिमानाच्या भरीला पडून कुलशीलाला न शोभणारे रस्ते चालण्याची इच्छा करण्यापेक्षां, अशा वेळीं संपन्न—सुस्थितींतल्या मित्रांची उघड उघड परीक्षा तरी कां पाहूं नये ! आपल्या वाणींत तेज असेल, वर्तनांत चोखपणाचें पावित्र्य असेल, तर त्या स्नेही म्हणविणारानें आपला शब्द खालींच पाडतां कामा नये. अशी एकदां त्यांची परीक्षा तरी कां पाहूं नये ? परीक्षेला उतरले, तर तावून सुलाखून बावन्नकशी ' मैत्री ' ठरतेच आहे. नाहीं तर गरीबांना नुसत्या मैत्रीच्या देखाव्याचा जोजार कशाला ? '

शांतेची प्रत्येक कल्पना मला मान्य करून घ्यावी लागत होती. कारण त्यांत वावगें असें कांहींच नव्हतें. मीही व्यापारी चष्म्यानें जगाकडे पाहूं लागल्यापासून बराचसा निढावलों होतों. आजवर ' जगन्नाथ किंवा विश्वनाथ '

यांना जन्मभर मित्राकरितांच मित्रत्व म्हणून वागवीत आलों होतों. मीही त्यांच्याशीं तसाच वागत आलों होतों. त्यांनीं होऊन विचारलें संवरलें, तर ठीक, नाहीं तर आपण वाचा विटाळावयाची नाहीं, असें असे. पण पुष्कळ विचारानंतर आणि शांतेच्या योग्य सल्ल्यानंतर आपल्याला विचारावयाला मुळींच हरकत नाहीं, असें वाटूं लागलें.

विश्वनाथ व जगन्नाथ यांनाच विचारावयाचें. त्यांत कठीण तें काय होतें ? भेटल्याबरोबर विचारूं, असें मन म्हणत होतें. ' होय ह्मणतील, नाहीं तर नाहीं ह्मणतील, ' आपल्याला त्याची लाज कसली, किंवा त्याचा राग तरी कसला ?

विश्वनाथ नुकतांच गांवाहून आला होता. त्याला माझी इत्थंभूत हकीकत आल्याबरोबर कळलीच होती. घरीं येऊन, आईला, शांतेला भेटून विचारपूस करून तो गेला होता. माझी गांठ पडलीच नव्हती. त्याच्या घरीं येण्याचा, सहानुभूतिपूर्वक आवाजांत आईशीं, व शांतेशीं बोलण्याचा प्रकार शांतेनें पाहू-नच ' मित्रांची परीक्षा ' पाहण्याची कल्पना तिला सुचली होती कीं काय कोण जाणें !

दुपारची सांवली फिरल्याखेरीज रहात नाहीं. मनुष्याला दम खातां आला पाहिजे. ह्मणजे वेळ येतांच सर्व कांहीं आस्तेकदम जुळावयाला लागतें. तसे थोडेसे अनुकूल वारे वहावयाला लागतात. नोकरीच्या जगांतून बाहेर पडल्या-पासून मन पिचल्यासारखें झालें होतें. आणि तें तसेंच किती दिवस राहणार, याचाही अंदाज लागत नव्हता. पण काय झालें कुणास ठाऊक; आमच्या ' नशीबाला ' कोठेंतरी आपल्या प्रयत्नानें उजळा देण्याचा प्रयत्न करीत होतें कीं काय, ' उद्योगा ' संबंधीं कांहींतरी हातपाय हालविण्यास जागा करण्याक-रितां कोणाच्या तरी मनांत कांहीं घटना घाटत होती कीं काय, कीं त्यामुळेंच मनाला प्रयत्न करीत असतां न कळत असा विश्वास वाटूं लागला. काम कोठें झालें नाहीं तरी मन खचतें आहे, असें वाटेना. यापेक्षां जास्त प्रचीती ह्मणजे एक दिवस मी घरीं आहें, अशा वेळींच विश्वनाथ व जगन्नाथ माझ्याकडे मुद्दाम आले. आले बसले. आणि लवकरच त्यांनीं मुख्य मुद्याच्या बोलण्याला सुरुवात केली. सुरुवात बोलावयाला झाली ती माझ्यासमोरच. पण मला उद्दे-

शून नाहीं. मजविषयींचेंच बोलणें, पण ते त्यांच्या त्यांच्यामध्येंच मजसमक्ष होऊं लागलें.

" हें असं कांही तरी खुळ्यासारखं करून ठेवलं वामनानें–याला ह्मणायचं काय ? " जगन्नाथ बोलला.

" झालं तें गेलं. पण याच्या पुढें काय ? " विश्वनाथ उत्तरला.

" काय रे वामन, पुढें तुझें कसें काय जमणार आहे ? काय करणार आहेस तूं ? " जगन्नाथानें मला विचारलें.

" तो काय करणार आहे, हें नको. तूं त्याच्याकरितां काय करणार आहेस बोल ! " विश्वनाथानें त्यालाच उलट विचारलें.

" मी काय करणार ? "

" तेंच मी तुला विचारतों. कांहीं तरी त्याच्याकरितां करायला हवं आहे, असं तूंच ह्मणालास, म्हणून तुला विचारलें. "

" होय. मी ह्मटलें खरें " जगन्नाथाचा चेहरा, व आवाजही हें बोलतांना बदलून गेला. " पण मला स्वतः तर कांहीं सध्यां करतां येत नाहीं–"

" कां ? "

" कां, काय सांगूं ? विश्वनाथ, आजकाल मी इतका गळाठ्यांत आलों आहें, कीं तुला जर त्याची थोडक्यांत कल्पना आली, तर तूं काय म्हणशील मला हेंच कळत नाहीं. सांगायला शरम वाटते, पण कदाचित् लवकरच—"

" कदाचित् लवकरच काय–"

" तुह्मीं मित्र म्हणून तुमच्यापुढें निलाजरेंपणानें बोलतों, आजची वामनची स्थिति बरी, इतकी माझी होणार, अशीं दुष्ट स्वप्नें आतांपासूनच दिसायला लागलीं आहेत. अशा वेळीं मला काय करतां येणार ? "

विश्वनाथ त्यावर कांहीं बोलला नाहीं. त्यानें खोंचक दृष्टीनें त्याच्याकडे पाहिलें. मी मुकाट्यानें दोघांचें बोलणें ऐकत होतों.व फेरपाळीनें दोघांकडे पाहात होतों.जगन्नाथानें स्पष्ट कांहीं सांगितलें नाहीं, तरी त्याच्या बोलण्यांत तथ्यांश बराच असला पाहिजे,हें मला पटत होतें.आनंदीही शांतेजवळ आपली स्थिति बडबडून गेली होती. त्याला हा दुजोराच होता. जगन्नाथाच्या केवळ चैनीच्या वागण्यानेंच ही त्याला परिस्थिति आली होती, ' रेस ' ' दारू ' वगैरेच्या पायींही बेसुमार

धळपट्टी झाली होती, त्यामुळें असें झालें होतें. असें नसून जगन्नाथाच्या बेजबाबदार वागण्यानें संसाराची कल्पनाच कधीं पुरती मनांत न घेतल्यामुळें, बडेबापके बेटे या नात्यानें वागत सुटला, मिळकतीच्या तोंड्या अजीबात बंद झाल्या, तिकडे अजीबात दुर्लक्ष झालेलें. " आह्मांला काय कमी आहे ? " यांतच सारी कल्पना खर्च झालेली. स्वतःच्या शहाणपणाच्या घमेंडींत असल्यामुळें वृद्ध माहितगार दिवाणजी कानींकपाळीं ओरडण्याचा प्रयत्न करी, पण त्याकडे लक्ष कोण देतो ? यामुळें जगन्नाथ सांगतो, तशी त्याची परिस्थिति होत आली असली पाहिजे; यांत मला तर शंकाच नव्हती. विश्वनाथाच्या चेहऱ्यावर त्याचें मत कधीं दिसावयाचें नाहीं. असा त्याचा चेहरा, त्यामुळें जगन्नाथाबद्दल त्याचें मत कळणें दुरापास्त होतें. त्याच्या अशा अवनत स्थितीला कारण तोच, यामुळें मित्रत्वाच्या नात्यानें त्याची कानउघाडणी करावयाची, पण प्रस्तुत प्रसंग तो नव्हता, माझ्याविषयीं कोणाला काय करतां येईल याबद्दल विचार करण्याकरितां त्यांनीं होऊनच जमवून आणलेला तो प्रसंग होता.

नंतर जगन्नाथाशीं बोलावयाचें सोडून विश्वनाथ मजकडे वळला —

" हं, वामन, काय करणार ह्मणतोस तूं पुढें ? "

" व्यापार ! "

" कसला ? "

" कसलाही ! "

" आणि त्याला भांडवल ? "

" त्याबद्दलच प्रयत्न चालू आहेत ! "

" म्हणजे जादूनें आकाशांतून पाडणार आहेस, कीं झाडाला फळें आणणार आहेस, कीं जमिनींतून वाढविणार आहेस ?—भांडवल म्हणजे तोंडच्या गोष्टी नसतात ! "

" मग काय तुम्हीं कराल तें खरें ! "

" आह्मीं काय करणार ? जगन्नाथानें स्वतःबद्दल सांगून टाकलें. आतां माझ्याबद्दल सांगतों. तुझ्या बाबतींत कर्तव्य म्हणून कांहीं तरी करावयाचें आहे. काय करावें, तुला काय करावयाला लावावें, याचा अजून पूर्ण निर्णय झाला नाहीं. आज इच्छा असली, तरी तुझ्या हातीं भांडवल द्यायला मज-

जवळ नाहीं. आणखी वर्ष सहामहिने कांहीं करतां येणार नाहीं. त्यानंतर कांहीं तरी करतां येईल. पण तोंपर्यंत तूं काय करणार ? ”

काय करणार ? काय करणार म्हणून मी सांगणार ? मी अगदीं स्वस्थ बसलों.

“ वर्ष सहामहिनेपर्यंत तुझ्या प्रयत्नानें कुठें जमलें तर पहा. बरेंच झालें. जगन्नाथाजवळ कांहीं नसलें, तरी जगांत त्याच्या शब्दाला अजून किंमत आहे, तो कुणाजवळ शब्द टाकून पाहिल तर होईलही. पण मी त्याला तसें कर, म्हणून सांगणार नाहीं. मी काय करीन तें स्वतःच. दुसऱ्याला सांगणार नाहीं. हें माझ्याबद्दल सांगतों. पण लक्षांत ठेव. व्यापार, ही गोष्ट वाटते तितकी सोपी नाहीं, किंवा हातचा मळ नाहीं. मारवाडी, गुजराथी लोक आपापल्या देशांतून रश्शी—लोटा घेऊन येतात, आणि दहापांच वर्षांच्या अवधींत व्यापार थाटून टोलेजंग इमारती उठवितात, याबद्दल शिळोप्याच्या गोष्टी नुसत्या आपण बोलतों, पण त्यांचें अनुकरण मात्र डोळे उघडून— आह्मांला कसलीही बिकट परिस्थिति आली तरी करण्याची बुद्धि होत नाहीं. ‘ व्यापार ’ करण्यांत कमीपणा नाहीं, आणि त्याकरितां अहोरात्र देहाची झीज सोसण्याची तयारी नाहीं, तोंपर्यंत काय होणार ? परकियांचा व्यापार पहा—प्रत्यक्ष साऱ्या जगावरचं ‘ राज्य ’ मुख्य ‘ व्यापारी ’ तत्त्वावर चाल-लेलं आहे. पण ‘ व्यापार ’ ह्मटला कीं हे प्राण देतील. आमची कोणाची तशी तयारीच नसते ! ” न बोलक्या विश्वनाथाचें संकलीत बोलणें वर एकत्रीत दिलें आहे. त्यावरून लोकांना चमत्कारिक वाटेल. पण वरचें बोलणें—सावकाश एकादेंच वाक्य बोलून थांबावयाचें, माझें व जगन्नाथाचें मन पडताळून पहा-वयाचें, जगन्नाथाचें मत घ्यावयाचें, असें किती तरी वेळ चाललेलें होतें !

याप्रमाणें पुष्कळ बोलणें होऊन ते दोघेही निघून गेले. साऱ्या बोलण्याचा निष्कर्ष आज मी प्रयत्य करतों आहें तसाच करावयाचा. जमलें तर ठीक. नाहीं तर सहा आठ महिन्यांनीं विश्वनाथ कांहीं तरी निश्चित करणार. त्यावेळे-पासून कांहीं तरीं जमणारच.

एवढ्यामुळें मनाला एक प्रकारें विश्वास केवढा आला. हुरूप वाटायला लागला. मित्रांच्या सहानुभूतीच्या बोलण्यांनीं एकादवेळीं प्रत्यक्ष कांहीं

फायदा झाला नाहीं, तरी अप्रत्यक्ष असें केवढें तरी कार्य होत असतें. त्याचा अनुभव यावेळीं मला चांगला आला. जगन्नाथ व विश्वनाथ यांचें झालेलें बोलणें मी आईला सांगितलें, शांतेलाही सांगितलें. त्यांना बरें वाटलें. आई म्हणाली, " होईलरे सारं नीट ! नशीबाला वेळ यावी लागते. तोंवर धीर नको का धरायला ? "

शांता म्हणाली, " विश्वनाथांनीं उपयोगी पडायचं कबूल करणं, म्हणजे भांडवलाकरितां, दरोडे, रेस, किमया, यांची आवश्यकता नसतें, असें सिद्ध होण्यासारखंच असतं, असं मला वाटतं. "

मी त्यावर केवढा ओशाळलों. तरी पण झटलेंच " विश्वनाथानें हें झटलेंच नसतें तर ! "

" पण झटलें ना ? आतां नसतें तर कशाला ? "

" त्याला कसें वाटलें हें कोण जाणें !—"

" ही सर्व कारवाई इंदूची असली पाहिजे. इंदूताई विश्वनाथांना चैन पडूं देत नसेल उठल्या सुटल्या. "

" तें कां ?"

" त्याला दोन कारणं आहेत. एक माझ्यावर तिचं अनिवार प्रेम आहे. तिला पहिल्यापासून एकसारखं वाटतं, कीं शांता सुखी केव्हां होईल—"

" आणि दुसरं ! "

" तिची समजूत आहे, कीं तिचं संसारांत कांहीं चालत नाहीं. तेव्हां ती आपलं कांहीं तरी विश्वनाथ ऐकतात कीं नाहीं, हें पाहायला याच काहींना कांहीं प्रयत्नांत असते ! आमच्या बाबतींत तर तिचं जास्तच चालतं ! "

" अस्सें ! " आह्मां दोघांनाही त्या नवराबायकोच्या या गंमतीची गंमत वाटली. आह्मीं दोघेही हंसलों.

त्यावर साहजीकच जगन्नाथ—आनंदीचा विषय ओघालाच आला. जगन्नाथाची हलाखी वाढते आहे, हें सांगितलं तेव्हां " पण अजूनही अनूच्या लक्षांत हें येत नाहीं. " एवढेंच ह्मणाली. मी ह्मटलें, " ती तुझी मैत्रीण आहे, तूं तिच्या ध्यानांत कां आणून देत नाहींस ?" " पण गरिबांनीं श्रीमं-

तांना सांगायचं नसतं ना ? ती श्रीमंत आहे, शिवाय स्वतः शहाणी पण आहे. ती माझं कसं ऐकणार !" त्यावर तें बोलणें तितकेंच थांबलें.

कांहीं दिवस झाले. माझा ' भांडवल ' उत्पन्न करण्याचा, आणि निश्चित कोणत्या प्रकारच्या व्यापाराला सुरुवात करावी, याबद्दलचा उद्योग आणि विचार चालूं होताच. कोणी सपाट्याला 'होय' ह्मणत, नादाला लावीत, कित्येक दिवस हेलपाटे घालायला लावीत. पण शेवटीं कुठल्या तरी फुसकट सबबीवर तोंडाला निराशेचीं पानें पुशीत. कोणी 'सोनें' ठेवायला आहे का ? असा रोकडा जबाब विचारीत. कोणी मुत्सद्देगिरीचा आंव आणून पर्यायानें ' स्थावर जंगम ' काय आहे, तें तारण लावून देण्याची तयारी आहे का ? तारण लावूनही गुंतल्या जाणाऱ्या रकमेवर जगापेक्षां इतकें व्याज जास्त मिळेल कीं नाहीं, याबद्दल कसून चौकशी करीत, आणि तसें कांहीं नाहीं असें समजतांच, स्पष्ट नकार देत. असें चाललें असतां एक दिवस दुपारच्या वेळेला, जगन्नाथ एका गृहस्थाला मजकडे घेऊन आला. त्यानें माझी त्या गृहस्थांशीं आधुनिक पद्धतीनें ओळख करून दिली. आणि त्यांना घेऊन येण्याचा उद्देशही सांगितला.

ते गृहस्थ मुंबईचे एक विलायतेशीं व्यापार करणारे व्यापारी होते. त्यांचा याही गांवीं आपल्या दुकानची शाखा उघडण्याचा विचार होता. त्यांची आणि जगन्नाथाची ओळख केव्हां तरी झाली होती. म्हणून ते त्याच्याकडेच आले होते. त्यांच्या बोलण्याचा हेतु कळल्यावर, त्यांच्या कामीं मी पडण्यासारखा आहे, किंवा ते माझ्या उपयोगी पडण्यासारखे आहेत, असें त्याला वाटलें, म्हणून त्यानें त्यांना मजकडे आणण्याचें मित्रकार्य केलें. माझ्याबद्दलची सविस्तर माहिती माझ्यादेखतच दिली. सध्याचा माझा प्रयत्न कशा धोरणाचा चालूं आहे, हेंही सांगितलें.

तो गृहस्थ मुंबईच्या लठ्ठ भाटियासारखाच जवळ जवळ होता. पेहेरावही त्यांच्यांत मोडण्यासारखा. लठ्ठ पण ठेंगू, मूर्ति; वर्ण काळ्यांतच जमा होण्यासारखा. नाक लठ्ठ, ओंठ शिद्याच्या जातीचे. दांत विरळ. केंस राठ आणि आखूड. पायांत स्टॉकिंगाशिवाय व्यापारी फॅशनचे बूट; खादीच्या छातीवरच्या खिशांत ' सिगारेटची सिल्व्हर केस ' असा थाट त्या व्यक्तीचा होता. बोल-

णारा जबरा, आणि बोलण्यांत घमेंड विलक्षण. ओळख करून दिल्यावर त्यानें माझ्याशीं बोलायला जी सुरुवात केली, ती इतक्या सफाईनें कीं, त्याची माझी दाट दोस्ती जगन्नाथाच्या अगोदरची असावी, असेंच एकाद्याला वाटलें असतें. ते गृहस्थ सभ्य होते. पण त्यांच्यांत एकतऱ्हेची मनाला अप्रसन्न ठेवणारी कसली तरी उग्रता होती.

आह्मीं इकडचें तिकडचें बोलत आहोंत, तों मध्यंतरीं आमचा मधुकर, व विमल, त्या ठिकाणीं आपल्या वहिनींचा कीं आईचा कसला तरी मला निरोप सांगायला आलीं. त्या गृहस्थानें त्या मुलांना जवळ घेतलें. त्यांची पाठ थोपटली, आणि ह्मटलें—

" मुलगा हुषार आहे. तुमचा कोण ? " मी सांगितलें " माझा भाऊ. आणि ही छोटी बहिण. "

मुलगी पण तेजस्वी आहे! हीं असलींच मुलें राष्ट्राचे, देशाचे, घराचे खरे-खुरे आधारस्तंभ असतात! यांची योग्य जोपासना, आपल्या हातून झाली पाहिजे. यांची कोणत्याही प्रकारची हेळसांड करीत जाऊं नका हं! " त्यानें मला तितक्यांत हें बजावलेंच. मुलांना काय, त्यांची स्तुति होतांच, तीं त्याला बिलगलीं. त्यानें गंमतीनें मधुकराला विचारलें, " काय रे, मोठेपणीं तूं काय होणार ? "

मधुकरानें पट्दिशीं उत्तर दिलें, "माणूस होणार!"

आम्हां सगळ्यांनाच त्याच्या त्या विलक्षण उत्तराचें हंसूं आलें! —

" आणि तूं ग कोण होणार ? " त्या गृहस्थानें विमलला आणखी विचारलें, " पंडिता रमाबाईप्रमाणें, रमाबाई रानड्यांच्या प्रमाणें, अवंतिकाबाई गोखले, सरोजनी नायडू, कीं बेझंटमावशींच्या प्रमाणें होणार ? -मी सांगतों तुह्मांला, ही मुलगी अतीशय कर्तबगार निपजणार आहे! "

त्याच्या अघळपघळ बोलण्यानें, व लाघवीपणानें मी चीतच झालें. मुलांनीं तेथें फार वेळ राहूं नये, म्हणून विमलला जवळ घेऊन हलकेंच कानांत सांगितलें " वहिनीला म्हणावं, चहा, आणि कांहीं तरी फराळाचं लवकर करून आण! " त्याबरोबर ती भर्रकन् पळाली. तिच्या पाठोपाठ मधुकरही पळाला. नंतर आमचें बोलणें सुरू झालें. ' येथें जी शाखा काढावयाची, त्यांत तुमचा

उपयोग व्हावा, अशी आमची इच्छा आहे.' असें त्यानें मोघमच ह्मटलें. नोकर कीं भागीदार याचा त्याने नीट उलगडाच केला नाहीं. मला तसें ताड्कन स्पष्ट विचारतां येईना. जगन्नाथाच्या तें ध्यानांतच आलें नाहीं. त्यानें इच्छा प्रदर्शित करतांच जगन्नाथानें ' मी तें स्वीकारावें अशी चटकन् पुष्टि दिली.

शेवटीं मलाच धीर करून विचारावें लागलें, " माझी कांहीं हरकत नाहीं; पण नोकर म्हणून कीं दुसऱ्या कांहीं स्वरूपांत !—"

" तुमची इच्छा असेल त्याप्रमाणें ! " झटकन् त्यानें असें चमत्कारिक उत्तर दिलें. " मला इथल्या शाखेला एक लायख, कामसू, आणि प्रामाणिक मनुष्य पाहिजे आहे, आणि त्याला तुम्हीं सर्वतोपरि योग्य आहांत अशी खात्री आहे ह्मणूनच हें मी ह्मणालों. "

मी विचारांत पडलों. काय सांगावें ? नोकर म्हणून ? कीं पार्टनर ? नोकर तर नाहीच व्हायचें ! पण मला भागीदारी पाहिजे, हें सडेतोड कसें सांगावयाचें ? हें जगन्नाथानें सुचवावें, अशी माझी इच्छा होती. पण त्याची वाचा उकलेना. त्यानें माझी त्याची गांठ घालून दिली, आणि तो स्वस्थ बसला.

त्या विचारांत मध्यंतरीं बराच वेळ गेला. त्या अवधींत शांतेनें चहा, ओलेपोहे, आणि शिरा, वगैरे करून, ती स्वतःच घेऊन आली. शांता अगदी साधीच वागत असे. दागिने नव्हते, अंगावर उंची वस्त्र नव्हतें. किंवा आधुनिक सुशिक्षित स्त्रिया नीटनेटकेपणाच्या नांवाखाली ज्या तऱ्हेच्या ऐटबाजपणानें वागतात, त्यापैकीं एकादी ऐटही तिची नव्हती ! पण त्यामुळेंच ती भारीच सुन्दर दिसे. त्यांत तिचें सात्विक तेज नखशिखान्त सांडत असलेलें; आणि त्याला भर ह्मणूनच कीं काय, तिचे सध्यांचे दिवस ह्मणजे तिच्या सौंदर्यांत आणखी भर घालणारे दैवी भाग्याचेच चालू होते. त्यात तिची मधुमधुर विनयशीलता. ती आली, चहा फराळाचें ठेवलें, आणि गेली. आलेल्या गृहस्थानें सभ्यपणानेंच माझ्या गृहलक्ष्मीकडे निमिषमात्र पाहिलें. माझ्या तें साहजीक लक्षांत आलें. तितक्यांत त्याच्या चर्येवर पहिल्याहून कांहीं निराळा सूक्ष्म—अतीसूक्ष्म असा कसला तरी फरकही झाल्याचें दिसलें. मला कसेंसेंच वाटलें. पण लगेच मनाशीं हंसू आलें. अभिमानही वाटला. शांता ह्मणजे जशी कांहीं रम्य अशी निसर्गकन्याच दिसे. तिच्या दर्शनाचा परिणाम मनावर कां होणार नाहीं ?

चहा-फराळ--झाला. खूप स्तुति करीत त्या गृहस्थानें फराळ केला. सिगारेटची फॅन्सी सिल्व्हर केस काढून सिगारेट सिलगावली. माझ्यापुढें व जगन्नाथपुढेंही सिगारेट केस केली. आम्हीं दोघांनींही त्याचा सन्मान राखण्यासाठीं साभार स्वीकार केला.

"मग काय? तुमचा मानस कांहींच नाहीं सांगितलांत?" तोच म्हणाला.

"मी व्यापारांत शिरण्यासाठीं तर खटपट करतों आहें. तेव्हां त्या दृष्टीनें सांगायचं तर—नोकरीचें मुळींच जमणार नाहीं." मी सांगितलें.

"तरी हरकत नाहीं. भागीदार व्हा. मी म्हणतों भागीदार असण्यांतच जास्त चांगलें. प्रत्येकावर जबाबदारी राहाते. आपलेपणाचा जिव्हाळा राहतो, आणि कामाकडे लक्ष लागतं. आणि मी विचारतों, तुमच्यासारख्या स्वतंत्र-वृत्तीच्या बाणेदार माणसाला मी नोकर बनविण्याची इच्छा करणेंच मुळीं गैर नाहीं काय? तेव्हां, हें काढलंत, फार चांगलं झालं. मला पसंत आहे. समजलं का जगन्नाथ?"

"वा:! वा:! मी तरी तेंच म्हणत होतों." जगन्नाथानें वा: वा: सह पुष्टि दिली.

आणि मग तें जवळ जवळ ठरल्यासारखेंच झालें. थोड्या वेळानें ते दोघे जायला निघाले. मी शिष्टाचाराप्रमाणें दारापर्यंत पोंचवायला गेलों. काय कसें कोणत्या अटींवर कागदपत्र तयार करावयाचे, शाखा केव्हां उघडावयाची, वगैरेबद्दल खल करण्याकरितां, व तें सर्व नक्की करण्याकरितां पुन्हां बैठक करावयाची ठरून त्यांनीं निरोप घेतला. जातांना जगन्नाथाकडे मी पाहिलें. त्याच्या चेहऱ्यावर 'असें नाहीं, तसें तरी मी मित्रकार्य केलेंच कीं नाहीं?' अशा तऱ्हेच्या कृतकार्यतेचें समाधान दिसत होतें.

संध्याकाळीं जेवायच्या वेळेला, मी आजची हकीकत सांगितली. आई 'बरं तर!' एवढेंच म्हणाली. शांता कांहींच बोलली नाहीं. मी मनाशीं म्हटलें, देवाच्या पायाशीं अष्टौप्रहर त्रासलेली, आईची भक्तिभावाची करुणा फळाला येऊं घातली, कीं शांतेची सात्विक शक्ति सावचित्त होऊन कार्याला लागली, कीं भाबड्या भावंडांचें भावी भाग्य आतांपासून डोकाऊन पहायला लागलें, म्हणून 'भांडवल' अशा रीतीनें आपण होऊन आमच्या घरीं चालत येऊं लागलें,

मी विचारच करीत राहिलों. एकदम नशीब शिकंदर बनण्याची घटका अगदीं इतकी जवळ कशी आली ? काय असेल तें असो. पण तसें झालें खरें. मला खरोखरच त्या संधीचा फार आनंद झाला !

त्या आनंदांतच शांतेला मी आणखी एकदां सांगायला गेलों, पण ती त्या सांगण्यानें प्रसन्न झाली नाहीं. उलट ह्मणाली, " कांहीं का असेना, व्यापाराचा 'श्रीग' करायला ही संधि कांहीं वाईट नाहीं. कुणी सांगावं, कुणाचा 'पैसा' कसा असतो, आणि आपल्याकडे कां धाव घेतो तें ? असें सुरवातीलाच इतकं भरभराटलेलं होणं, मला नाहीं तें मनाला पटत ! कोण जाणें, असा वाऱ्यानं मिळालेला ' पैसा ' वावटळीनं उडूनही जायचा ! "

" असं कां वाटतं तुला ? " मी किंचित् खट्टू होऊन विचारलें.

" कां तें काहीं सांगतां येत नाहीं. पण एवढं बरीक वाटतं, आम्हीं एकदम इतकं सुस्थितींत यायला आमची तपश्चर्या अजून पूर्ण झालेली नाहीं. तेव्हां कुणास ठाऊक कीं ' पैशा'चे असें हें अनपेक्षित दर्शन म्हणजे तपश्चर्येला धक्का देण्याचा प्रयत्न म्हणूनच नसेल कशावरून ? "

यावर मी कांहीं बोललों नाही. विषय, मनाला प्रोत्साहन नसल्यामुळें मध्येंच सोडून दिला. झालें; लवकरच ' शाखा ' सुरू झाली. मी भागीदार—वर्किंगपार्टनर—म्हणून कामकाजाला सुरुवात केली. आणि 'व्यापारी' म्हणून एकदांचा कसाबसा टिळा लाऊन तर घेतला. नोकरी लागल्याबरोबर जी सर्व सृष्टींत उलथापालथ झाली होती, तसें कांहीं आतां झालें नाहीं. कारण ताज्या रक्ताची ती पहिली उसळी होती. आतां 'पैशानें' पुन्हां तोंड दाखविलें, आणि संसार जिवंत होऊं लागला. म्हणून जेवढें समाधान व्हावयाचें तेवढेंच झालें.

आमचे भागीदार मुंबईहून महिन्यांतून एकदोनदां येऊन, चारचार पांचपांच दिवस आमच्याकडे उतरूं लागले होते. त्यांच्या चारदोन खेपांतच आमच्या घरांतील सर्व मंडळीशीं त्यांचा चांगलाच घरोबा झाला. आपल्या मुलाच्या पडत्या काळांत अनाहूत हात देणारा म्हणून माझी जुन्या काळची भाबडी आई, त्यांच्याविषयीं मजप्रमाणें वात्सल्य बाळगी. शांता कर्तव्यतत्परतेनें राही; तर भावंडें मजपेक्षां त्यांच्याच पाठीशीं जास्त लाडीकपणानें लागत.

घरांत ते सर्वांशीं मन मोकळेपणानें वागूं बोलूं लागले. घरांतील मंडळीही

त्याचप्रमाणें त्यांच्याशी वागूं बोलूं लागली. मजप्रमाणेंच ते आईला म्हणत, पण "अहो आई ' असें संबोधीत, शांतेला नुसतेंच ' वहिनी ' म्हणत.

कसा काय हा देखावा बदलला होता कोण जाणे ! पण किती लवकर ते आम्हांला आपलेसें वाटूं लागले. जगन्नाथ किंवा विश्वनाथाबद्दल सुद्धां कित्येकदां दूरपणा वाटे, इतके ते जवळचे भासत. कशाचा हा परिणाम होता? त्यांनीं अनाहूतपणें माझ्या ' स्थितींत ' मला सहज ' व्यापारी ' बनविल्याचा का ? तसेंच आमच्याविषयीं त्यांना इतकी उगीचच्या उगीच आपुलकी कां वाटत होती ? ते जितके जास्त बोलत होते, तितकीच त्यांची वाणीही अमृत स्रवणारी होती !

पण त्याचा उलगडा कांहीं काळ लोटतांच आपोआप–अगदीं यदृच्छनेंच झाला ! आणि त्याबरोबर काय झालें कुणास ठाऊक !–अखेर शांतेचीच शंका खरी ठरली. व आमच्या निर्भेळ तपश्चर्येचें ' फळ ' मी एकदम ' व्यापारांत ' एवढी संधि मिळविण्याचें नव्हतें, हें स्पष्ट झालें. त्याचें असें झालें, ठरल्याप्रमाणें एकदां आमचे भागीदार आले. त्यांनीं वाटेंत वाचण्याकरितां एक कसलेंसें पुस्तक आणिलें होतें. तें त्यांनीं शांतेला वाचण्याची मुद्दाम शिफारस करून दिलें. शांतेनें नेहमींच्या पद्धतीप्रमाणें वाचण्यास तें पुस्तक घेतलें. व चार पांच दिवसांत सवईप्रमाणें वाचूनही काढलें. ' पुस्तक ' कसें काय होतें कोण जाणें. पण त्या पुस्तकांत एक अत्यंत महत्त्वाचें गूढ होतें. चमत्कारिक गूढ होतें. शांतेनें अगावूं केलेली कल्पना खरें करणारें तें गूढ होतें. पुस्तकाबरोबर त्या गूढाचाही तिनें स्वीकार केला, इतकेंच नाहीं, तर तिनें आपल्याबरोबर माझ्याही पुढें तें गूढ ठेवलें. तें गूढ म्हणजे एक चिठोरें होतें.

तें चिठोरें पुढीलप्रमाणें होतें––

" सविनय विनंति,

पण विनंति करावयाची ती कोणत्या शब्दांनीं, आणि कशी ! सौंदर्य आणि सद्गुण ईश्वरानें पायधुळी टाकलेले पाहून मनाला उद्वेग आल्याखेरीज कसा राहणार ? त्या सौंदर्याच्या आणि सद्गुणांच्या सांवलीखालीं आपले-पणानें आराम करण्याची इच्छा झाली, तर ती पुरी करण्याकरितां विनंति कोणत्या शब्दांनीं करावयाची ! त्या विनंतीचें धाडस करतां येण्याकरितांच

'संपत्तीच्या सरिते'ला वळण देऊन पाहिलें आहे. ही सरिता अशीच अखण्ड वाहावत राहावी अशी इच्छा असेल, तर 'सौंदर्य व सद्गुण' यांनीं सान्निध्याचें सौख्य देण्याचें कबूल करावयाला नको का ? मग होईल का विनंतीचा विचार ? व्हावाच ! पुढली खेप पडण्याच्या आंत 'विनंती'च्या उत्तराचा अनुकूल प्रतिध्वनि ऐकावयाला आला, तर उजळ तोंडानें सौंदर्य-सद्गुणाच्या सेवेला हजर राहातां येईल. नाहीं तर काय होईल ? सद्गुणी सौंदर्याला हृदय उघडें करून दाखविण्यास आणखी लिहिण्याची आवश्यकता आहेच का ! कळावें. चिठोऱ्याच्या चिंध्या झाल्या आहेत, कीं तें विनंतीचा आदर करून हृदयाशीं चिलगलें आहे, हें केव्हां कळेल ?

—तोंपर्यंत कुणाचा ह्मणूं !—"

मी चिठ्ठीवरून डोळे फिरवीत होतों. शांता मजकडे टक लावून पहात होती. वाचलें. बोधही झाला. डोक्याला काय झालें कुणास ठाऊक ! शांताकडे पाहिलें. ती किंचित् हंसत होती. मी तिला विचारलें, "काय हें ?"

"मी म्हणत होतें तेंच हें !" शांता उत्तरली. "माणुसकीला मारणारें हें जालिम वीष !"

"पण हें अगोदर कसें माझ्या लक्षांत आलें नाहीं ?"

"सर्पाच्या पोटांत पाय असतात म्हणून !" शांता उद्गारली !

"मग ?"

"मग काय ? संपत्ति अगोदर हातीं आली आहे. मागाहून 'वीष' आलें आहे."

"पण त्याचं काय करायचें ?" मी संतापातिरेक आवरीत विचारलें.

"त्या विषाचा पेला असा झुगारून द्यायचा !" चिठोऱ्याच्या चिंध्या करून रस्त्याला फेंकीत शांता शांतपणें म्हणाली ! या वेळचें शांतेचं पवित्र पावित्र्य किती उदास दिसत होतें !

---

## —प्रकरण १४ वें—



# सर्पाशीं सामना

**वाटे आड येतां सर्प खळ । तया ठेचावेंचि धरोनी बळ ।**
**कारण त्याचे फूत्कार केवळ । जाळिताति मुग्ध जगता ॥**
**—कुमारयशोद,**

सर्वांना समाधान झालें होतें. व्यापाराची शाखा निघून, मी त्या शाखेंत भागीदार होऊन कामकाज पाहूं लागलों. माझा सारा वेळ त्यांतच व्यवस्थितपणानें जाऊं लागला. मी तनु-मनें करून कामांत खपत होतों. माझ्या मनाप्रमाणें मला करितां आलें म्हणून आमच्या खातेवाल्यादुकानदाराला देखील आनंद वाटला. ' तुमच्यासारखे शिकलेले मनांत आणतील, तर वाटेल तिथें गेले तरी कर्तबगारी करतील हो. पण त्यांच्या मनांतच येत नाहीं. आणि मनांत आलें, तरी त्यांची कष्ट करण्याची तयारी असत नाहीं. त्याला काय करणार ? तुमचं जमलं, फार चांगलं झालं.'' असें म्हणून त्यानें माझी पाठ थोपटली.

इतके दिवस व्यापारी जग, त्यांतल्या अडीअडचणी, त्यांतलीं धोक्याचीं ठिकाणें, फसवेगिरीच्या जागा, वगैरे तात्विक कल्पनेनेंच मी विचार करीत असे. पण आतां त्यांत प्रत्यक्ष पडलों होतों; आणि आतां मला अनुभवानें कळावयाला लागलें होतें, कीं, अत्यंत सावधगिरीनें, निरालसतेनें, जातीनिशीं झटलों, तर स्वतःला ' याची टोपी त्याला, त्याची टोपी याला ' न करतां, किंवा दुसऱ्याला तसें न करूं देतांही ' व्यापारांत ' यश मिळवितां येणें शक्य आहे. प्रथम प्रथम मलाही तें बराच काळपर्यंत जाचलें.नौकरीची संवय कांहीं दिवस झालेली. त्यामुळें जास्त वेळ ' शाखेंत ' न बसविणें, कांहीं गोष्टी स्वतः करण्यांत कमीपणा वाटल्यानें त्या करण्यांत अळंटळं करण्याची बुद्धि होणें, लाज, कमीपणा वाटणें हें होत असे. त्याला नाइलाज होता. पण कितीही झालें, तरी हें आपलें आहे, घरचें आहे, केलेंच पाहिजे. हें करतां आलें नाहीं, तर दुसरें कांहींच करतां यावयाचें नाहीं, अशी प्रखर जाणीव असल्यामुळें मी

कोणतेंही काम अगदीं मलाच सक्तीनें करावयाला लावी. जगन्नाथ, किंवा विश्व-नाथ फुरसदीप्रमाणें ज्या वेळीं माझा उद्योग पहावयाला येत, त्या वेळीं त्यांनाही जरा आश्चर्य वाटे; बरें वाटे. ते तसें बोलून दाखवीत.

याप्रमाणें व्यापारी जगांत माझा चंचुप्रवेश झाला. व त्या योगानें नोकरी-वाल्यासाहेबानें त्या आयुष्यांतल्या मजवर चांगलाच इंगा फिरविला होता, त्यामुळें मी अगदींच मरणोन्मुख झालों होतों, तों आतां जिवंत होऊं लागलों. आह्मीं नवें जग निर्माण केलें, व ठाकसें ठीक झालों, म्हणून सर्वांना केवढातरी अभिमान वाटावयाला लागला होता.

आमच्या शांतेच्या इंदूचा जीव बराच खालीं पडला होता, तर जगन्नाथा-मुळें आह्मीं या स्थितींत आलों, म्हणून आनंदीला केवढा अभिमानाचा ताठा चढला होता. जेथें तेथें व ज्याच्या त्याच्या जवळ, वेळां अवेळीं ती सांगत बसे, कीं, " काय करतां बाई, अगोदर आपलं ह्मणूं नये, आणखी आपलं म्हटल्यावर,त्याच्याकरितां जीवालाजीव दिला पाहिजे. ' आमचं कसं कां होईना, पण वामनरावांच्या व्यापाराचं जमवून दिलं, तेव्हां कुठं तिकडे मनाला शांतता आली. " इत्यादि. इंदूजवळ बोलतानां हेंच. प्रत्यक्ष शांतेजवळही हेंच. आणि त्याच्या बरोबर, त्यांना हलाखीचे दिवस येत चालले होते त्याच्याबद्दल वैतागानें बोलावयाचें म्हणजे असें " दुसऱ्याच्या उपयोगी पडावयाचं आमचं कर्तव्यच आहे. पण आमच्या वेळेला कुणी उपयोगी पडत आहे का ? दररोज देणेंदारांचे भय्ये उंबरठ्याची साल झिजवताहेत, कोर्टाच्या ' नोटिसा ' येता-हेत, कुणाचा ' दावा ' होतो आहे. आमचं येणं तेवढं खोटं. पांच पांच वर्षांचीं कुळांनीं वसुली दिली नाहीं; तें येणें तसेंच. पण देणेंदारांनीं मात्र भंडावून सोडलं आहे, ( आपल्या वाटेल त्या हौशी–चैनीकरितां देणेंदारांना आपणच घरीं यायला भाग पाडलें, आणि कुळांकडील येण्याकडे कधींही लक्ष पुरवायला ' चैनी 'च्यापुढें झालें नाहीं, हें मात्र आमच्या ' अनुवहिनींच्या अजूनही ध्यानांत आलें नव्हतें.) यावेळीं आमच्या धावण्या कुणी धावतंय का? जग म्हणजे हें असंच ! "

मी व्यापारांत पडायला जगन्नाथाचा शब्द कारणीभूत झाला होता, हें नाकबूल करण्यांत आह्मांला काय मिळणार होतें ? म्हणून आह्मींही प्रसंगीं जग-

न्नाथाच्या या मैत्रीच्या फायद्याचा गौरवपूर्ण उल्लेख करण्यांत कोणत्याचें प्रकारचा कमीपणा मानीत नव्हतों.

व्यापारांत शिरून काम करूं लागल्यापासून अतीशय थोड्या काळांत माझ्या कामाची छाप, व शाखेची शिस्त, व तिचें वजन उत्तम प्रकारें बसविलें. त्याचें पुष्कळांना अत्यंत आश्चर्य वाटलें. आमच्या बलभीमरावाला–भांडवलवाल्या भागीदाराचें नांव–सुद्धां माझ्या कामाबद्दल प्रांजलपणानें प्रशंसोद्गार काढावे लागले.

तरी पण, आमच्या घरांत पहिलाच साधा–सिधेपणा होता तसाच होता. जरी नोकरीच्या वेळेपेक्षां या व्यापारामुळें जास्त पैसा घरीं येई, तरी त्याचा उपयोग घर व्यवस्थित चालविण्याकडे, मध्यंतरी झालेल्या कर्जाची वगैरे फेड करण्याकडेच मुख्यतः केला जात होता. आतां आपण व्यापारी झालों, आतां पैशाला काय तोटा--तेव्हां इकडे तिकडे केला जरा जास्त खर्च म्हणून काय झालें ? अशी बुद्धि अजून आम्हां कोणाचीच झाली नव्हती.

त्याबद्दल इंदू कित्येकदां विनोदानें, आणि आनंदा जरा खोंचूनच शांतेला म्हणत, " हें ग काय, तूं आपली पहिल्यापासून आहेस तशीच आहेस ! नोकरदारीण होतीस, तेव्हां जशी, तशीच आपली आतां ' शेटाणी ' झाल्यावरही राहायचं म्हणजे काय ? आतां शेटाणीला शोभेसं नको का वागायला ? आह्मांला नाहीं बाई आवडत हें ! उद्यांपासून तूं टाकून दे अगोदर ! "

त्याचप्रमाणें जगन्नाथ, भीमराव, किंवा कधीं कधीं विश्वनाथ मलाही तसेंच म्हणत ! त्यावेळीं मी त्यांना निरुत्तर करण्यासाठीं पण सहज विनोदानेंच उत्तर देई, " अहो; मी व्यापारी झालों, म्हणून काय झालं ? म्हणजे वाटेल तसं वागलंच पाहिजे कीं काय ? लोकमान्यांनीं एवढा राष्ट्रसंसार केला, पण त्यांचं स्वतःचं घर, म्हणजे पाऊणशे शंभर मिळविणाऱ्या माणसांच्या घराप्रमाणेंच अगदीं साधसुधं होतं, असं त्यांच्या चरित्रांत लिहिलेलं आहे. त्याप्रमाणेंच मी वागतों. दुसरं काय ? "

" वाः ! वाः ! म्हणजे, तूं ' लोकमान्य'च झालास वाटतं तेवढ्यानें ! " जगन्नाथ म्हणे.

अशा तऱ्हेनें व्यापारामुळें माझ्या विस्कटलेल्या संसाराची घडी बसावयाला लागली होती. मनाचें स्वास्थ्य येत चाललें होतें—पण—

पण मागील प्रकरणाच्या शेवटीं सांगितल्याप्रमाणें खंडीभर दुधांत मिठाचें पोतें पडून सर्व दूध नासतें, त्याप्रमाणेंच व्यापारांत मिळणाऱ्या माझ्या शांततेचें झालें. भांडवलवाल्या भीमरावाचा पाजीपणा बाहेर आला; आणि माझें मस्तक भणाणलें. नोकरीवर जशी लाथ मारली, तशी व्यापारावर-या भागीदारीवर लाथ मारावी; भीमरावाच्या नरडीचा घोंट घ्यावा. दुकानाला, आणि त्यांत ठेवलेल्या मालाला रॉकेल ओतून आग लावावी कीं काय, असें वाटायला लागलें.

शांतेच्या सौंदर्यावर दरोडा घालण्याच्या नीच बुद्धीनें भागिदाराचें आमिष मला त्या नीच हलकटानें लावलें. व मीही भाळलों व बळी पडलों. शांतेला त्या तऱ्हेचें चिठोरें खरडण्याचा निर्लज्जपणा त्या अधमाला करण्याचें धाडस झालें! तेव्हां त्याच्या संपत्तीला लाथेनें झुगारण्याखेरीज गत्यंतर काय?

काय करूं? माझ्या मस्तकाला सहन होईना. दुकान वैऱ्यासारखें दिसावयाला लागलें. मधुस्रवणाऱ्या जिभेच्या मुळाशीं हलाहल आहे, हें जर अगोदर समजलें असतें, तर! पण आतां काय उपयोग! गोष्ट घडून गेली होती!

मनाचें स्वास्थ्य उडालें. शांतता पळाली. समाधान नष्ट झालें. आणि इतकें असून त्याचा उच्चार करण्याची कुठें चुकूनही सोय नव्हती. ती बाबच अत्यंत नाजूक, अब्रूला धक्का देणारी होती. त्यामुळें तोंड बांधून बुक्क्यांचा मार अशी माझी अवस्था झाली.

नोकरी प्रमाणेंच दुकानावर-भागीदारीवर लाथ मारावी म्हटलें, तर तें तरी कसें व्हावयाचें? लोकांत सांगावयास कारण तरी काय दाखवितां येईल? जगन्नाथाचा किंवा विश्वनाथाचा सल्ला भागिदारी झुगारून देण्यांत घ्यावयाचा, तो तरी त्यांना काय सांगून? जगन्नाथाला असल्या सापाला घरीं आणलेंस, म्हणून दोषही देतां येणें शक्य नव्हतें. पाजी भीमरावाच्या पापी संपत्तीचा स्वीकार केला, त्याचें प्रायश्चित त्या संपत्तीनें शांतेला तसलें चिठोरें धाडण्यांत भीमरावाला बळ दिलें, म्हणून त्या संपत्तीला झुगारूं, की, 'शाखा' उघडल्यापासून इमानेंइतबारें मी देहानें व मनानें झिजलों, म्हणून त्या पवित्र केलेल्या 'पैशाला' कवटाळूं! काय करूं?

माझ्या मनाचा भडका उडाला. आतां हें आईजवळ बोलतां येण्य.सारखें नव्हतें, किंवा याची चर्चा शांतेजवळ करण्यांतही मनाला प्रशस्त वाटत नव्हतें. त्या गलिच्छ चर्चेनें निष्कारण किती तरी त्रास होणार नव्हता काय ? मग मी तो त्यांना कशाला देऊं ?

आंतून अंगार पेटलेला, आणि बाहेरून हिमालयाची शांतता धारण केलेली, अशा तऱ्हेनें सध्यांचे दिवस चाललेले होते. दुकानच्या कामांत लक्ष लागत नव्हतें, तरी पण कामांत मी कोणत्याही प्रकारचा कसूर करीत नव्हतों; ज्या वेळच्या त्या वेळीं आणि जिथल्या तिथें काम झालेंच पाहिजे, मी या शिस्तींत काडीमात्र अंतर पडूं दिलें नव्हतें.

भीमरावही त्या प्रकारानंतर चांगला एक दीड महिना आलाच नाहीं. किंवा पत्रही पाठविलें नाहीं. मलाही तो जितका न येईल, जितकें सैतानी तोंड न दाखवील, तितकें बरेंच असें वाटत होतें. त्याची आठवण झाली-झाली कशाला ? मी मुळीं ती विसरतच नव्हतों, त्याचें चिठोरें डोळ्यापुढें उभें राहिलें, ह्मणजे त्या क्षणीं भागीदारीचा त्याग करावा, व त्या दूषित विषारी हवेंतून बाहेर पडून, पापाचें परिमार्जन करावें, असें ताबडतोब मनांत येई ! पण—

भागीदारीवर लाथ मारून पुढें काय करावयाचें ? 'नोकरी' सोडली, त्या वेळीं साऱ्या जगानें छीः थूः केलेंच. आतां व्यापारांतून सुटलों, ह्मणजे जग माझ्याकडे कोणत्या नजरेनें पाहील ? नोकरी कनिष्ठ दर्जाची असते, पशूपेक्षांही वरिष्ठ हलक्या दर्जानें वागवितात—वागविलें ह्मणून नोकरीला नमस्कार केला असें सांगण्यासारखें तरी होतें. पण व्यापारांतून कां उठलों ? हें कसें कोणाला सांगावयाचें ? सांगावयाचें राहूं द्या बाजूला. पण संसार चालविण्याचें मग काय करावयाचें ? विश्वनाथानें दिलेल्या आश्वासनावर अवलंबून बसावयाचें ? पण व्यापार एका हातानें बाजूला केला, कीं दुसऱ्या हातांत विश्वनाथाचें सहाय्य ' आहे का ?- तर नाहीं. आणि कधीं मिळणार, हें निश्चित नाहीं. मग काय करावयाचें ? पण मी कांहीं करावयाचें नाहीं, आणि चाललें आहे, असेंच मुकाट्यानें चालवावयाचें ह्मटलें, तरी तो नरसर्प—त्याच्या कल्पनेप्रमाणें चंदनाच्या झाडानें विळखा घालूं दिला नाहीं व घालूं देत नाहीं,

असें समजून आल्यावर–काय करील हें कोणी सांगावें ? तो मुकाट्यानें चालवूं द्यावयाचा नाहीं, विषारी फूत्कार टाकील, कडकडून दंश करावयालाही अंगावर चाल करून येईल, यांत फारशी शंका घेण्याचें कारणच नव्हतें.

आणि अनुभवानें अखेरीस तेंच खरें ठरलें.

'गरीबांच्या मुली शीलानें आपल्याअशा तशाच असतात.' 'शिकलेल्या मुलींनीं आपल्या परोपरींच्या फॅशन्सच्या स्वीकारांनीं आपलें शील शिथील केलें आहे,' 'मोहवशता व सुखलोलुपता पैशाच्या पाठींमागें पळत आलीच पाहिजे,' 'दारिद्र्याच्या आंगीं वाटेल तो दोष निर्माण करण्याची शक्ति असते, आणि शीलाला लाथाडणं हा जर दोष मानला, तर पैसा तें कार्य सहज करूं शकतो,' किंवा 'पैसा टाकला म्हणजे राजाची राणी प्राप्त होते,' ही ज्या अधम मनोवृत्तींच्या माणसांची विचारसरणी, व त्याला साजेशींच दृष्टी असते, त्याच कोटींतील माझा बलभीम भागीदार. त्यामुळें त्याला माझ्या घरची गरिबी, शांतेची सुशिक्षितता, व त्याच्या जवळचा उन्मादकारी पैसा,' या सर्व गोष्टींच्या समुच्चयानें त्याच्या अधम, नीच, पाजी मनाला, तसलें घाणेरडें चिठोरें लिहावयाला कांहीं एक दिक्कत वाटली नसेल. पण, खडकावर बीं मूळ धरीत नाहीं, किंवा अथांग पाण्यांत अंदाज येण्याकरितां खडा टाकला, तर त्या पाण्यांत मुळींच चलबिचल होत नाहीं, त्याचें प्रत्यंतर त्याला आलें. त्याच्या चिठोऱ्याची वासलात काय लागली, हें मागें कळलेंच आहे. तें त्याला मात्र कळलें नव्हतें. त्याचा पडताळा पाहण्याकरितां बरेंच दिवसांनीं तो आला, पण यावेळीं त्याला घरीं येण्याचें धाडस झालें नाहीं. पाप भित्रें असतें हें महशूरच आहे. मग तो छातीठोक निर्भयपणें पहिल्या-प्रमाणें घरीं येण्याचें धाडस कसें करणार ? गडबडून बादली बडबडली नाहीं, त्यानेंच तो निम्मा खचून गेला होता. दुकानांत आला, बसला. त्याचें तोंड–पापी मनुष्याचें कसें तोंड असतें तसेंच हुबेहुब झालें होतें. कांहीं झालें तरी मी मनुष्य होतों, माझ्या सौख्याच्या मंदिराला आग लावायला तयार झालेला सैतान माझ्या समोर पाहून, माझें काय झालें असेल, याची कल्पनाच केली पाहिजे. मी त्याला सन्मानानें, आदरानें, बरोबरीनें तरी कसें वागविणें शक्य होतें ? मी त्याच्या नरडीला हात घातला नाहीं; हेंच जास्त ! त्याच्या

विषयींचा उपहास, तिरस्कार, आणि संताप, माझ्या ठिकाणीं मावत नव्हता. त्यामुळें मी त्याच्याशीं जरी चांगल्या रीतीनें वागलों नाहीं, तरी वाईट कांहीं उद्गार काढले नाहींत.

माझ्या वागण्याचा परिणाम झाल्याशिवाय राहिला नाहीं. त्याच्या आवाजाची बदबद झाली. त्यानें स्वतःच्या मनाची सांवरासांवर करण्याची शिकस्तीची खटपट चालविली, व धीराचें अवसान आणलें. त्यानें गेल्या महिन्यांतला सर्व हिशेब पाहिला. मालाकडे पाहिलें. मला कांहींच विचारलें नाहीं. आपल्याशींच कांहीं पुटपुटत राहिला, घरीं जाण्याचें नांव काढलें नाहीं. मी कांहींच बोललों नाहीं. जरा वेळानें बाहेर जायला निघाला. माझ्याकडे न पाहतां, दारांत पाय ठेवतां ठेवतां ' मी बाहेर जातों. परस्परच स्टेशनवर जाणार आहें,' असें म्हणाला. मी कांहींच म्हटलें नाहीं. तो बाहेर पडला.

त्याला कांहीं दिवस झाले. माझ्या घरीं कांहीं प्रासंगिक अडचणी उत्पन्न झाल्या होत्या. मधुकर शाळेंत जिना उतरतांना कीं चढतांता कोण जाणें, कोणा मुलाचा धक्का लागून गडगडला होता. उलटा पडल्यामुळें डोकें चेंचलें. दुखापत झाली, आणि बरगडींत मार बसला. त्याला मुलांकडून घरीं पोंचविण्यांत आलें. तो अजारी झाला. आई त्याच्या बिछान्याशेजारीं बसून राहिली. शांतेच्या प्रकृतीचा मान अवघडल्यामुळें कांहीं तरी होऊन बदलूं लागला. आणि बाहेरच्या विचारांनीं बाहेर डोकें पिकें, तर घरीं आल्यावर घरच्या या परिस्थितीनें डोक्याच्या चिंध्या उघडण्याची पाळी येई. संकटें अगोदर एकटीं कधीं येत नाहींत. आणि येतांना जशी सहजासहजीं, आणि अचानक येतात, तशीं तीं सहजासहजीं, किंवा अचानक मात्र कधींच जात नाहींत. व्यापारी जगांतल्या संकटांनीं सतावायला सुरुवात केली. संकटांनीं घर वेढलें. घर–वेढल्यामुळें मनाची स्वस्थता अजीबातच ढांसळली. दुकानाकडचें लक्ष त्यामुळें थोडें कमी झालें. वेळच्यावेळीं उघडणें न काय, पण दिवसच्या दिवस दुकान बंदही राहूं लागलें. त्या वेळची माझी विचारांची दिशा अशी असे कीं, " ज्यांच्याकरितां दगदग करायची, पैशाच्या मागें धावावयाचें, ती मंडळी सुखरूप, तर सारें. नाहीं तर करावयाचें काय ? मधुकराचा आजार दिवसेंदिवस वाढत चालला होता. आणि शांतेलाही अधिकाधिक त्रास होऊं लागला होता. माझ्या डोक्यांत किडे पडावयाची वेळ आली होती. कोणी म्हणे,

जगांत दुणी आजारी पडतच नाहींत कीं काय, म्हणून काय धंदाउद्योग सोडून घरीं बसतात ? हीच एकादी ' नोकरी ' असती, आणि ' नोकरींतून ' रजा मिळाली नसती, तर कसें केले असतें?' पण लोकांचे सांगणें मला पटत नव्हतें. नोकरींत असतों, तरी आतां जसें करतों, तसेंच केलें असतें. मला माणसां-पेक्षां जास्त कांहींच नव्हतें आणि नाहीं.

पण याच माझ्या वागण्यावर माझ्या भागीदारानें आपल्या हलकट हस्तका करवीं पाळत ठेऊन, माझ्या भागीदारीवर गदा आणण्याचा घाट घातला. एक दिवस 'शाखा' व्यवस्थेशीर,बरोबर चालत नाहीं, नुकसानींत आहे, असें आढळून आल्यावरून बंद करण्यांत येणार आहे, ' अशा स्वरूपानें कुरापत काढावयाला सुरवात केली. माझ्या डोक्यांत उजेड पडलाच, कीं हा साप आतां असा उलटला. खरा ह्मटला तर, पैसेवाला तो, व वर्किंगपार्टनर मी म्हणून, त्याच्यापेक्षां माझ्या भागीदारीचा भागही त्या मानानें कमीच होता; व त्यामुळें त्याला माझ्यापेक्षां त्या दृष्टीनें आरडाओरड करावयाला जास्त जागा होतीच. त्याप्रमाणें त्यानें त्या जागेचा पूर्ण फायदा घ्यावयाचें ठरविलें. जरी आमचें ठरतांना कागदोपत्रीं लेखी, सहीशिक्क्यानिशीं, व साक्षीसहीत जें काय ठरावयाचें तें ठरलें होतें, तरी कायदेपंडितांची मूठ दाबली म्हणजे त्या कागदांतील एकाच शब्दाचे किती अर्थ निघतील, आणि केवळ पैशाच्या जोरावर भीमराव भागीदार अशा कायदेपंडितांकडून हवे ते अर्थ काढण्याचा कसा प्रयत्न करील, आणि माझे त्या शाखेंत आजवर केलेले सर्व शेवटीं कसे फुकट जाऊन खाखा वर कराव्या लागतील, याचीच भेसूर चित्रें डोळयापुढें नाचावयाला लागलीं. ' नोकरी'तले ते हाल, तर आजकालचे लोक ज्याला व्यापार-व्यापार म्हणतात, त्यांतलें हें सुख ! हातांत व्यापार येतो काय, आणि हातांतून निसटण्याचा प्रसंग लगेच दत्त म्हणून पुढें उभा राहतो काय ! एकदां वाटलें, आपणच या व्यापारावर लाथ मारणार होतों, तो प्रसंग अनायासें असा आला, तर त्यांत काय बिघडलें ! बरें झालें, पिडा गेली.

" शाखा बंद करणार, सर्व हिशेबाचे कागदपत्र चोख तयार पाहिजेत " या अर्थाची नोटीस जेव्हां भीमरावांकडून धडकली, त्यावेळीं त्याचा विचार करण्याकरितां, जगन्नाथ, विश्वनाथ, यांच्याप्रमाणेंच मी शांतेचीही त्या बाब-

तींत आपण काय करावयाचें, याविषयीं सल्ला विचारली. त्या तिघांनीं पुढील-प्रमाणें आपापलीं मतें दिलीं—

" काय करावें, हे पैसेवाले लोक म्हणजे असेच मूर्ख असतात! पण करणार काय, त्यांच्या पैशांच्या जोरावर वाटेल ती गोष्ट मनासारखी ते घडवून आणतील. तेव्हां आपण आपली शक्ति ओळखूनच मागें सरलें पाहिजे. असंगाशीं संग आणि प्राणाशीं गांठ म्हणतात ती अशी! मला नव्हतं वाटलं, भीमराव इतका बिघडलेल्या डोक्याचा असेल म्हणून!" जगन्नाथानें अशी सल्ला दिली.

" तो बलभीम काय! भागीदारींत व्यापार करणं म्हणजे काय पोरखेळ समजतो कीं काय?" विश्वनाथ म्हणाला, " त्याला तशी शाखा बंद करतां येणार नाहीं. आह्मीं करूं देणार नाहीं! काय त्याला गमजा करावयाच्या असतील त्या करूं देत. आपणही पाहून घेऊं. तुला मुळींच डरायचें कारण नाहीं वामन!"

आणि शांतेला जेव्हां सर्व परिस्थिति समजावून देऊन ह्मटलें कीं, " तूंच म्हणाली होतीस कीं वाऱ्यानं आलेला 'पैसा' वादळांत उडून जायचा, तसाच प्रसंग आला आहे. व्यापाराची भागीदारी थांबली!"

त्यावर ती अगदीं विचारपूर्वक म्हणाली, " ती कां? भागीदारी तशी कशी थांबेल? भागिदाराचें नुकसान भरून मिळाल्याखेरीज! भागीदाराचीं 'शाखेंत' रात्रंदिवस हाडांचीं काडं झालीं तीं का फुकटच? भागीदारीचा 'पैसा' ह्मणजे कांहीं वाऱ्यानें आलेला नव्हे!"

" ह्मणजे? मग त्या वेळीं तूं तसें कसें ह्मणालीस?"

" त्या वाऱ्यानं आलेल्या संपत्तीनें, आपल्याबरोबर घाणेरडं चिठोरंही आणलं, आणि तसं आह्मांला प्रायश्चित्त देऊन तो पैसा 'वावटळीनं' उडूनही गेला. त्याचें आतां काय?" शांतेनें समजूत घातली आणि मलाही तें पटलें. मी त्यःप्रमाणेंच वागण्याचा संकल्प केला.

एक दिवस मधुकराचा आजार जास्त झाला आहे, आईनें त्याचें डोकें मांडीवर घेतलें आहे, तो आजारांत, " माझीं पाटीपुस्तकं, परीक्षा, आतां

मी नाहीं दांडगाई करायचा, " असें बडबडत आहे. आह्मां सर्वांच्या तोंडचें पाणी पळालें आहे. अशाच वेळीं भीमराव आपल्या एक दोन बगलबच्चाशह, दुकानावर, आणि, दुकानावरून निर्लज्जपणानें घरीं, दुकानचे सर्व हिशोबाचे कागदपत्र ताब्यांत घ्यावयाचे, आणि 'शाखा' बंद करून चालावयाला लागावयाचें या तयारीनें आला. आले, बसले, त्यांच्या बगलबच्चांपैकीं एकानें मला बैठकीच्या जागेंत बोलावलें. माझ्या अंगाची लाही झाली. पण व्यवहार या नात्यानें मला अत्यंत शांतपणा धारण करावा लागला. तशाही स्थितींत विमलला 'विश्वनाथा'कडे बोलवायला पाठविलें. हेतु हा कीं, विश्वनाथाला त्यांच्या तोंडीं द्यावा. तो त्यांचा योग्य तो समाचार घेईल. बोलावण्याबरोबर प्रसंग ओळखून विश्वनाथही आपलें हातांतलें काम टाकून आला. त्यानें येऊन, त्यांच्याशीं हलकें हलकें बोलावयालाही सुरुवात केली; "काय, कसें, शाखा बंद करण्यासारखें तसें कांहीं दिसत नाहीं. शाखा तोट्यांत तर नाहींच नाहीं, पण उलट कांहीं दिवसानंतर चांगली भरभराटीला येण्याचाच खात्रीचा संभव आहे," पण मदांध झालेले ते लोक त्याला सरळ उत्तर कोठून देणार? एकानें ह्मटलें, "तुह्मांला तिऱ्हाईताच्या व्यवहारांत बोलावयाचा अधिकार काय?" दुसरा ह्मणाला, "तुह्मीं बोलणारे कोण?"

तिसऱ्या शाहण्यांनीं आपली अक्कल पाजळली, "शाखा फायद्यांत असो, तोट्यांत असो. आह्मांला ती मुळीं चालवावयाचीच नाहीं. ती आह्मीं आजच्या आज बंद करणार! आमचा 'पैसा' उगीच्याउगीच जगाचे संसार चालविण्याकरितां वर आलेला नाहीं. ते कांहीं नाहीं, वामनरावांकडून दुकानच्या किल्ल्या, कागदपत्र, आणि ताबा आजच मिळाला पाहिजे—"

"अहो, पण जरा धीरे!" तरीही थंड डोक्याचा विश्वनाथ अजूनही शांतपणानें, आस्तेच घेत होता, "वामनाच्या घरीं मूल अजारी आहे. अगदीं त्याची घटका घातली आहे, सारे लोक हवालदील आहेत, तेव्हां त्या दृष्टीनें तरी जरा दमानें घ्याल कीं नाहीं?"

"आह्मांला कुणाचे आजारी, आणि कोण मेले पाहण्याची जरूरीच काय? मूल मरो कीं, आणखी कोणी मरो! तें आह्मांला माहित नाहीं. आह्मीं जाणत

नाहीं. आमचे व्यवहार, आणि आमचा ‘ पैसा ’ एवढेंच आह्मीं जाणतों. तेव्हां आम्हांला आमचा व्यवहारच पहावयाचा आहे ! तिथें तिसऱ्यानें लुडबुड करण्याची जरूरीही नाहीं ! ” हें आणि याचप्रमाणें विश्वनाथाला मध्यें पडण्याबद्दल शेलके शब्द ऐकावे लागलेच.

“ मूल मेलें तरी हरकत नाहीं. दुसऱ्याच्या मरणाशीं आह्मांला काय करावयाचें आहे ? आह्मीं आमचा ‘ पैसा ’ तेवढा जाणतों ! ” काय हे शब्द ! उलट्या काळजाच्या, किंवा मुळींच काळीज नसणाऱ्या माणसाशिवाय असे कोण शब्द उच्चारील ? उच्चारले जातात, ऐकावयाला येतात, आणि अनेक अनर्थाला मूळ असलेच शब्द कारणीभूत होत असतात, एवढें मात्र खास !

ते त्यांचे विषारी शब्द, विश्वनाथाला सहन झाले नाहींत, आणि मलाही सहन झाले नाहींत, ते शब्द मी ऐकले होते. जरी अजारी मधुकराच्या जवळपास घुटमळत होतों, तरी व्यवहार या नात्यानें माझें तेथें हजर असून ऐकणें भागच होतें. त्यांचे ते सैतानी शब्द ऐकले, आणि माझें मस्तक फिरलें, त्यांत विश्वनाथाला उणें उत्तर केल्याचें तेल ओतलें गेलें. आणि एकदम भडका उडाला!

मी पुढें झालों, आणि भीमरावाला “तुह्मांला आतां, कागदपत्र देत नाहीं. हिशेब देत नाहीं, किंवा शाखाही बंद करूं देणार नाहीं ! जा, तुह्मांला काय, आणि कसें माझें पारिपत्य करून घ्यावयाचें असेल, त्याप्रमाणें खुशाल करून घ्या. ”

असले रखरखलेल्या निखाऱ्याप्रमाणें मी माझें शब्द ठणकून ऐकविले.

“ ठीक आहे. पाहून घेईन ! ”

“ खुशाल ! ” तो जितक्या मोठ्यानें दांत करकरून बोलला, त्याच्याहीपेक्षां मोठ्या आवाजांत मी तो शब्द उच्चारला !

“ कोणाशीं गांठ आहे, याची अजून माहिती झालेली नाहीं ! ” खवळलेल्या सर्पासारखे फूत्कार करीत तो पुन्हां कडकडला.

“ एका नरसर्पाशीं गांठ पडली आहे, हें माझ्या पक्कें ध्यानांत आहे ! ” माझें उत्तर त्याच आवाजांत गेलें.

“ सापाला दूध पाजल्यासारखेंच अखेर झालें ! ” पुष्कळ कांगावखोर

हलकट पैसेवाले, भागीदाराला खातां येत नाहीं, असें कळल्यावर वाटेल तसें बरळायला लागतात, त्याप्रमाणेंच त्याच्यांपैकीं कोणी एक बरळाला !

" तुमच्याच बाबतींत तुह्मी हें बोलला असाल, तर एवढें खास खरें बोललांत असें मी म्हणेन ! " मी हें अगदीं उपहासाच्या तीव्रतेनें बोललों.

त्यावर भीमराव अगदीं जळफळतच म्हणाला, " याच्यापुढें काय वाढून ठेवलें आहे, अजून ध्यानांत येत नाहीं ? "

" सर्पाशीं सामना ! आणखी काय दुसरें असणार ? त्याला तयारी आहे, म्हणून मघाशींच सांगितलें आहे. पुनः पुन्हां तेंच तेंच बोलण्यांत काय अर्थ?" माझ्याऐवजी विश्वनाथानेंच उत्तर दिलें.

त्यानंतर आपली अशांतशी डाळ शिजत नाहीं, अशी खात्री पटतांच ते सैतान, " ठीक आहे. सावध असा ! " करीत पाय आपटीत चालते झाले !

पण ' पैशा 'च्या जोरावर त्यांनीं लवकरच सामन्याकरितां कोर्टांत मला खेचलेंच !

---

## —प्रकरण १२ वें—



# डोहाळे जेवण

'..........हट गर्भवतींचा नुरवा ।'

—कै० खरेशास्त्री

'पैशाच्या' जोरावर भीमराव भागीदार कोर्टांत गेले. पण त्याच्याशीं झगडावयाला मीही चांगलीच कंबर कसली. माझ्या मित्रांचा, आणि इतर व्यापाऱ्याप्रमाणें बहुतेक गांवांतील परिचित प्रतिष्ठितांचा पाठिंबा पहिल्यापासून मला उत्तम प्रकारें मिळाला. भीमरावाकडे पैशाची शक्ति, तर माझ्याकडे नैतिक ताकद असल्यामुळें आतां जरी मी केस खेळावयाला लागलों, तरी एक प्रकारचा ऋजू आत्मविश्वासाचा मला भरंवसा होता; व त्यामुळेंच अविश्रांत श्रम करण्यास मला एक प्रकारचा सात्विक उत्साह आला होता.

'केस' चालू झाल्यामुळें तिचा निकाल होईपर्यंत आतां शाखा बंद राहणें शक्य नव्हतें. आणि ती कोर्टाच्या परवानगीनें मी धडाक्यानें चालू ठेविली होती. 'केस'च्या गाजावाजानें लोकांचें अधिक उत्सुकतेनें आमच्या दुकानाकडे लक्ष लागलें. ती एक चालती बोलती जाहिरातच झाली. साधारणतः सर्वांची सहानुभूति माझ्याकडे वळल्यामुळें दुकानाची प्रतिष्ठाही वाढल्याखेरीज राहिली नाहीं.

इकडे दुकानाची प्रतिष्ठा, व माझा धीर वाढत चालला, तर भीमरावाचा मला हाणून पाडण्याचा, दुकान बंद करण्याचा, निदान माझी भागिदारी बुडविण्याचा, कसून प्रयत्न होऊं लागला.

अशा रीतीनें ज्याला आजकाल व्यापार म्हणून म्हटलें जातें, त्या पेठेंतील माझ्या आयुष्यक्रमाची हकीकत झाली! नोकरीच्या जगांतल्या 'पैसा' मिळविण्याच्या कठीणपणापेक्षां व्यापारी जगांतला 'पैसा' सचोटीच्या शक्तिवरही मिळवावयाला गेलों, तर काय हा उलटा अनुभव यायला लागला. नोकरीपेक्षां

या व्यापारानें आपलें अंतरंग मला किती तरी लवकर दाखवून भेवडावण्याचा प्रयत्न केला.

पण अशा एक सारख्या आघातावर आघात होण्यानें मी ते आघात सहन करावयाला व त्याच्याबरोबर टक्कर द्यायला हलके हलके तयार मात्र होत चाललों.

'केस' चालू होती. सर्वांची त्या बाबतींत, शब्दापासून कृतीपर्यंत–कशी कोण जाणें, पण सहानुभूति मिळूं लागली होती, त्यामुळें मी कोणत्याही कामांत केव्हांही अगदीं विचूक हजर राहात होतों.

ग्रह बदलत चालले होते ह्मणा, आमची तपश्चर्या एक ठरावीक मजल मारून आली होती म्हणून ह्मणा, किंवा ज्या ज्या वेळीं जें जें व्हायचें असतें तसें तें व्हावयाचेंच म्हणून ह्मणा, त्या तसल्याही घाईधांदलींत आह्मांला घरीं स्वस्थता वाटूं लागली होती. मनाला कशानें तरी हुरूप वाटावयाला लागला होता. मधुकराला बरें वाटायला लागून तो शाळेंत जायला लागला होता. प्रत्येक जण उत्साही, आणि कार्यदक्ष दिसूं लागलों होतों. इंदू आतांशा दररोज शांतेकडे यायला जायला लागली होती. मैत्रीणींचें हितगुज अलिकडे जास्तच व्हावयाला लागलें होतें. जगन्नाथाच्या मात्र दररोजच्या वाढत्या बिकट परिस्थितीनें, अनुवहिनींची 'हौस' पहिल्यासारखी कोणत्याच प्रकारानें चालत नव्हती. त्यामुळें ती अलिकडे अतीशय त्रासलेली, वैतागलेली, संतापलेली अशी असे. तिची आतांशा नेहमींची बसायची गाडीसुद्धां तिच्या जवळून गेली होती. मग ती कां वैतागणार नाहीं? जगन्नाथावर आतां अगदीं उघडाउघड जप्तीवारंटें, दरखास्ती, नव्या नोटिसा, आणि समन्सें बजावण्याकरितां धामधूम चाललेली होती. तो टेकीस आला होता. ज्या 'पैशा'वर तो आजवर ज्याला त्याला 'गुर्रर' करी, त्याच पैशानें आतां त्याच्यावर 'गुर्रर' केल्यामुळें तो हताश होत आला होता. खचत चालला होता. तशांत शांतेच्या कांहीं आगेमागें असेल, पण अनूवहिनीलाही कांहीं दिवस लोटले होते. या वेळीं तर तिचें कोडकौतुक किती तरी व्हावयाला पाहिजे होतें. जगन्नाथाला तें पडक्या परिस्थितीनें करतां येत नव्हतें, म्हणून वाईट वाटत होतें, तर अनूवहिनीला आपलें कोडकौतुक होत नाहीं, म्हणून चिडखोरपणा आला होता. ती शांतेकडे येई,

बसे, बोले, पण तिला तें भारी अवघड पडे. तरी पण शांतेनें तिला कधींही दुखविलें नाहीं किंवा तिच्या मनाला डिवचलें नाहीं.

कितीं झालें तरी त्या मैत्रिणी होत्या. आणि मैत्रिणीच्या नात्यानेंच त्याही परिस्थितींत वागत होत्या. लोक ह्मणतात, जगांत सगळ्यावर औषध सांपडेल, पण स्वभावावर औषध नाहीं. पण ' पैसा ' कित्येकदां स्वभाव बदलूंही शकतो, असें ह्मटलें, तर तें अगदींच धाडसाचें विधान होईल असें वाटत नाहीं. निदान अनूवहिनीपुरतें किंवा जगन्नाथापुरतें बोलावयाचें झालें, तर त्यांचा स्वभाव ' पैशा 'मी ऊब असतांनाचा होता, तो त्याच्या अभावाचा गारठा सुटल्याबरोबर बदलला होता, एवढें खास सांगतां येईल.

जगन्नाथाच्या राज्यांत पहिलीच शांतता जशीच्या तशीच कायम होती. इंदूला जें पहिल्यापहिल्यांनें उगीचच वाटत होतें, कीं संसारांत आपलें कांहीं चालत नाहीं, आणि त्याच्या योगानें आपण दुःखी आहोंत, पण तिची भ्रामक समजूत विश्वनाथाच्या वागण्यानें व शांतेच्या वेळोवेळच्या सांगण्यानें, आतांशा अजीबात बुजत चालली होती. विश्वनाथ तिला मधून मधून खूप चिडवीत असे. पुष्कळ दिवस ती चिडत असे. पण आतां तिला हंसू येई.

सध्यां आह्मीं या स्थितींत होतों. एक दिवस इंदु-व-शांता या मैत्रीणी-मैत्रीणींमध्यें कसलें हितगुज झालें कोण जाणें. मला माहीत नाहीं, आईला, माहीत नाहीं, कीं मधुकर विमललाही माहीत नाहीं, विश्वनाथ त्या दिवशीं रात्रीं आमच्या घरीं आला, आणि त्यानें आईला व मला ह्मटलें,—

" आमच्या सीतामाई कुठें दिसत नाहींत त्या ? "

" सीतामाई कोण ? " आह्मीं आश्चर्यानें उलट विचारलें. इतक्यांत कशालाशी शांता बाहेर आली. तिच्याकडे पाहून विश्वनाथ उद्गारला, " या आमच्या सीतामाई ! "

" ह्मणजे ?" या अर्थी नुसतेंच तोंड करून मी विश्वनाथाकडे पाहूं लागलों.

" अरे, बघतोस काय असा ? सीतामाईंना वनवासाला जायचे डोहाळे झाले होते, आमच्या या सीतामाईंना ऊर्फ शांतावहिनींना ' शेतवाडी ' पाहायचे डोहाळे लागले आहेत ह्मणें ! काय हें शांतावहिनी ? या आधुनिक काळांत, आणि हे डोहाळे ? अहो मोटारींतून फिरणें, महिला मंडळाच्या

अध्यक्षपदाची इच्छा होणें, सिनेमा–नाटकाला जाणं, निरनिराळ्या फॅशन्स करण्याची इच्छा होऊन त्या पायीं नवऱ्याच्या आणि सासूच्या नाकीं नऊ आणणं, चांदण्यांत मैत्रीणींना घेऊन अंगतपंगत करणें, झोंपाळ्यावरचीं जेवणें, अंधेरांतलीं जेवणें, जो पदार्थ प्रयत्न करूनही मिळण्यासारखा नसेल, त्याची इच्छा होणें, असले कसले तरी खरें ह्मटलें तर डोहाळे लागायचे, तें हें काय! " ह्मणें शेतवाडी पाहायला जायचें ! "

विश्वनाथ एक एक शब्द गंभीरपणानें बोलत होता. शांता गालांतल्या गालांत हंसत होती. मला हंसू येत होतें. आमच्या आईला जरी सगळें जसें-च्यातसें विश्वनाथाचें बोलणें कळलें नाहीं, तरी तिलाही हंसू आल्याखेरीज राहात नव्हतें.

" पण विश्वनाथ, हें गुपित तुला कसें कळलें ? " मी विचारलें.

" अरे, आमच्या घरचं तारायंत्र ( इंदू ) आहे ना ! " विश्वनाथानें माझ्या शंकेचें समाधान केलें.

" भारी इंदू खट्याळ बाई !–आपलं कशाला कांहीं तरी जोडतें ! कळत नाहीं नी संवरत नाहीं. " इकडून तिकडे जातां येतां शांता गालांतल्यागालांत हंसत कायसेसें पुटपुटत होती.

" बरं, मग ह्मणणं काय तुझं विश्वनाथ ? " मी जरा वेळानें विचारलें.

" दुसरं काय, आमच्या श्रीमतीनं ठरवून सुद्धां टाकलं आहे–"

" काय ?–"

" कीं,–काय सांगूं आतां ?–" तो पुढें काय कसें बोलावें, म्हणून विचार करतो आहे, इतक्यांत इंदूच स्वतः हंसत हंसत तिथें आली; " बरं झालं, ज्यानें सांगायला पाहिजे, तेंच माणूस आलें. बायकांचीं कामें बायकांनींच करावींत, अहो, ह्मटलं, काय सांगायचं, तें सासूबाईच्याजवळ आणि शांता-वहिनीजवळ सांगा. आह्मीं हुकुमाचे बंदे आहोंतच. "

त्यावरही आह्मीं सर्व हंसलों. शांतेनें, व इंदूनें विश्वनाथाच्या बोलण्याला " इश्श ! " एवढेंच ह्मटलें. मी व विश्वनाथ बाहेर बसलों; शांता, इंदू व आई आंत बोलत बसल्या. आज कांहीं तरी नवा बेत आहे, हें मुलांच्या लक्षांत येतांच तींही ' काय आहे, काय बोलताहेत; आपला कांहीं त्यांत

समावेश होतो आहे काय,' वगैरे ऐकण्याच्या उत्कंठेनें बायकांतून लुडबुडूं लागलीं!

कांहीं वेळानें आईच मला हांक मारून म्हणते, "बरं का बाळ, उद्यां मुलीला यांच्या 'शेतवाडी'वर पाठवायला हवं बरं का? सगळ्याजणी जातील, जेवतील, खातील, इकडे तिकडे करतील आणि येतील परत संध्याकाळीं!"

मी काय बोलणार? न बोलणें हीच माझी सम्मति. विश्वनाथानें त्याच्या शेतवाडीवर सगळ्यांना नेण्याची जय्यत तयारी केली होती.

मधुकर हलकेंच शांतेजवळ जाऊन लाडीगोडीच्या शब्दानें म्हणतो, "वहिनी, मी तुझ्याबरोबर 'शेतावर' येणार का?"

विमला तिच्या पाठीवर पडूनच विचारते, "वहिनी मला नेणार ना?"

मुलांना नाहीं कोण म्हणणार?—

विश्वनाथ मला विचारतो, "वामन, तुझी उद्यां कोर्टाची तारीखबिरीख नाहीं ना? चल तर खरा, एकदां आमचं शेत पाहायला. उद्यांला मी जगन्नाथाला त्याच्या बायकोसुद्धां बोलावलें आहे. दिवसभर सारेचजण 'शेतवाडी'-वर जाऊन येऊं. शेतकऱ्याचं वैभव म्हणजे काय असतं, तें एकदां पहा तर खरं!"

शेवटीं निघतां निघतां आईसुद्धां सगळ्यांनीं निघायचें ठरलें.

मला मोठा मौज वाटली. मी विचारलें, "विश्वनाथ, तूं हें मांडलं आहेस काय?"

"अरे बाबा, तुला माहीत नाहीं. बायकांच्या शब्दाला पुरुषांनीं मान हा दिलाच पाहिजे. त्यांनीं राबवायचें,आणि आह्मीं राबायचें.एवढेंच आमचें काम! तरी बरं, माझ्याकडून माझी श्रीमति वाटेल तितकें काम करवून घेते ती घेते, आणि वर म्हणते, 'घरांत माझं कांहीं चालत नाहीं.' तेव्हां आहे कीं नाहीं न्याय?"

त्यावर इंदू काय बोलणार? ती चिडली नाहीं. हंसली. खरोखरच लग्न झाल्या दिवसापासून इंदूची अगदीं बारीक गोष्ट विश्वनाथानें इंदूच्या कल्पनेप्रमाणें ऐकली होती,अशी आजच! त्यांतल्या त्यांत बायकांच्या हौसे-मौजेच्या चारचौघी जणींत त्यांचा मान-बोज राहील, अशा असतात, त्या केल्या किंवा

करावयाला परवानगी दिली, म्हणजे त्यांच्या आनंदाला सीमा राहात नाहीं. तेंच त्यांचें संसारांतलें सौख्य! इंदूनें शांतेच्या डोहाळे जेवणाचा बेत केला; त्याला विश्वनाथानें 'होकार' दिला. आणि त्याप्रमाणें वागावयाचें ठरविलें. इंदूला आनंदानें अस्मान ठेंगणें झालें. तिनें विश्वनाथाला जसें जसें वागावयाला सांगितलें, तसें तसें त्यानें चालायास सुरुवात केली.

त्यालाच अनुसरून आजची गोष्ट अमलांत आली होती. शांता सहज कुठें 'इंदूताई तुझ्या शेतवाडीवर जाऊं या ग एकदां केव्हां तरी!' असें म्हणाली काय, आणि इंदूनें त्यावर तयारी केली किती! फराळाआराळाचें, दशम्या, अमूक आणि तमूक! शेतवाडीवर एक जंगी प्रोग्रामच व्हायचा असें ठरलें.

दुसरे दिवशीं एका गाडींत, शांता, इंदू, व आनंदी, (ही प्रथम अगदीं नाखुषीनेंच यायला तयार झाली होती.) आणि मधुकर व विमला. दुसऱ्या गाडींत आह्मीं तिघांची सोय करण्यांत आली होती. मैत्रिणी–मैत्रिणी गुजगोष्टी कुजबुजत, हंसत, चालल्या होत्या, तर आमची इकडे नाना विषयांवर चर्पट-पंजरी चालू होती. मधून मधून आमचे बोलण्याचे विषय संपलें असें वाटून स्वस्थ राहात असूं. तेव्हांचें ते मुकाट्याचें मार्गक्रमणही एक प्रकारें आल्हाद-जनकच वाटे! मधूनच मधुकर किंवा विमल काहीं तरी हंसण्यासारखे विचा-रीत. तोंडीं लावण्यासारखी ती गंमत होई. पुन्हां हंशा पिके. त्याचेच निर-निराळे परिणाम प्रत्येकाच्या मनावर होत; आणि त्यावरूनच फिरून बोलाव-याला सुरुवात होई!–आई फारशी बोलण्यांत मिसळत नव्हती. ती आणि तिचे ते जप! यांतच ती मग्न असे.

या मजेंत आह्मीं शेतवाडीवर गेलों. थोडा वेळ विश्रांति घेतली. मनःपूत आह्मीं फिरत होतों. माझे वाटेकरी, कामकरी, शेतांतील कामें करण्यांत चूर झाले होते. त्यांचीं मुलें, कुणी गायी–म्हशींना बांधाच्या कांठीं चारताहेत, कुणी कांहीं कांहीं करताहेत. बायकादेखील 'शेती'च्या कामांत गढल्या आहेत. शेतांतील ओझीं उचलावयाला, किंवा कोणतेंही काम करावयाला त्यांना संकोच वाटत नव्हता. आमच्याशीं फिरतां फिरतां, विश्वनाथानेंही शिक्षिताला न शोभणारें, किंवा कमीपणा वाटणारें कसलेसें हलकें काम केलें. जगन्नाथ तें पाहून हंसला. मी कसल्या तरी विचारांत मग्न होतों. जगन्नाथाचें

हंसणें विश्वनाथाच्या ध्यानांत आलेंच. तो म्हणाला, " कां हंसलास जगन्नाथ ? मी मालक असून माझ्या शेतांतील असलीं हलकीं सलकीं कामें करतों म्हणून काय ? "

" नाहीं तर काय ? इतकीं माणसें शेतांत असतांना—हीं कामें कांहीं पांढरपेशांचीं नसतात !" जगन्नाथ उत्तरला !

"बरोबर आहे !" विश्वनाथ त्यावर बोलला, " पांढरपेशांनीं नोकऱ्या करून वरिष्ठांच्या लाथा खायच्या असतात, किंवा व्यापारी जगांत शिरलें, तर व्यापारापेक्षां याची टोपी त्याला, त्याची टोपी तिसऱ्याला करण्यांत, आणि त्यामुळें ' उपव्यापी ' अशी शेलकी पदवी मिळवायची असते. त्यांनीं हें शरीरकष्टाचें हलकें काम करावयाचें ह्मणजे काय ! "

" तसें नव्हे रे—" जगन्नाथ आणखी कांहीं तरी मल्लीनाथी करणार होता, तों त्याला मध्येंच थांबवून विश्वनाथ ह्मणाला, "आह्मीं रशियांतल्या महात्मा कौंट टालस्टायचें शेतांत काम करीत असतांनाचें चित्र पाहिलें, किंवा सर्व श्रेष्ठ अमेरिकन राष्ट्राचे प्रेसिडेंट कुलीज यांचें स्वतःच्या शेतांत शेतकऱ्या-प्रमाणें राबत आहेत, असें चित्र पाहिलें, म्हणजे फक्त आम्हीं त्यांचें कौतुक करावयाचें. पण प्रत्यक्ष राबण्याचें वेळीं—आम्हीं कौण्टटालस्टाय पेक्षां, अमेरिकेच्या—प्रेसिडेंट कुलीजपेक्षांही मोठे असतों ना ! मग आम्हीं तीं कामें कशीं करावयाचीं ? "

" वाः ! वाः ! विश्वनाथ ! मी तुला चुकीचें कां ह्मणतों ? आह्मीं चुकतों. आमच्या हातून होत नाहीं, किंवा आमच्या डोळ्यांतली आळसाची झोंप गेली नाहीं,—" जगन्नाथ बोलत होता.

" जाईल, जाईल धुंदी ! उद्यां परकीय भांडवलवाले येथें आले, त्यांनीं आमच्याच जमिनी काबीज केल्या, आणि मग आमच्या पाठीवर फटके मारून, त्याच आमच्या जमिनींत ' मजूर ' ह्मणून आम्हांला काम करावयाला लावलें, म्हणजे आमची झोंप जाईल, धुंदी जाईल, सगळें कांहीं जाईल ! " विश्वनाथ अगदीं शांतपणें ह्मणाला; पण त्यामुळें माझ्या आणि जगन्नाथाच्या डोक्यांत कोण विचारांचा खळखळाट उडाला. आपली स्थिति विश्वनाथापेक्षां—ही उत्तम असतां आज त्याच्या आपल्यामध्यें इतका फरक कशामुळें पडला,

याचें अस्पष्ट चित्र जगन्नाथाच्या डोळ्यापुढें आलें असावें. कारण त्याचा चेहरा मध्येंच अगदीं केविलवाणा झाला. माझी स्थिति काय झाली, मला कळेंनाच मुळीं."

"मजा काय आहे पहा, अं वामन!" विश्वनाथ आतां मजकडे वळला. आम्हीं या वेळीं केळयाच्या बागेचा कोपरा ओलांडून संत्र्याच्या बागेकडे चाललों होतों. विश्वनाथ म्हणाला, "प्रत्येकाला 'पैसा' तर पाहिजे असतो. पण त्याकरितां 'श्रम' मात्र करण्याची कोणाची-त्यांतून आधुनिक शिक्षित म्हणविणाराची तर-मुळींच तयारी व इच्छा नसते. थोड्या श्रमांत, किंबहुना मुळींच श्रम न करतां आपण वैभवाच्या शिखरीं चढावें, अशी नुसती इच्छा धरावयाची! पण नुसती दुबळी इच्छा काय करणार? त्याला श्रमाची,-योग्य त्या दिशेनें-बरोबर श्रम करण्याची तयारी नको काय?"

"म्हणजे अलिकडचे लोक श्रम मुळीं करीतच नाहींत असं तुझं म्हणणं?" मी मिस्किलपणानें विचारलें.

"तें कां?" विश्वनाथ उत्तरला, "मी याच काळांतला आहें. आतांच मी माझ्या हातानं वाटेवर पडलेलं शेण शेतांत टाकलं, त्याच्यावर जगन्नाथ हंसला. मी प्रसंगीं वाटेल तीं ओझींही उचलतों. स्वतः मोट हांकण्यांत देखील मला कमीपणा न वाटतां मौज वाटते. असं असतां अलिकडचे लोक श्रम करीत नाहींत असें मी कसें म्हणेन?"

"अरे वाः!" जगन्नाथ उद्गारला. आम्हीं दोघे हंसलों. नंतर त्यानें लोक उद्योग करतात, त्यांना करावाच लागतो, परिस्थिति त्यांना उद्योग करावयाला भाग पाडते. पण शरीर किंवा मन दुखावलें न जातां सगळें झालें पाहिजे, या कल्पनेमुळें ते जी टाळाटाळी करावयाला जातात; ती टाळाटाळी जन्मभर भोंवायला लागते. ती टाळाटाळी मग योग्य दिशेनें श्रम करूं देत नाहीं. व प्रवाहपतित झाल्यामुळें तिप्पटचौपट पाय हलवायला लावून पोटभर जेवायला सुद्धां घालीत नाहीं. अशा तऱ्हेचे श्रम होतात, अशा तऱ्हेचे आणखी बरेंच सांगितलें.

इकडे आम्हीं अशा तऱ्हेनें बोलत फिरत होतों, तर, शांता, इंदू व आनंदीही फुलबागेंतून फळबागेंत हिंडत, गाणीं गात, गोष्टी बोलत मनाचें

रंजन करीत होत्या. आई मोटेवरच्या पाटावरच्या पाण्यांत कांहीं धुवीत होती. मुलें मोकाट सुटलीं होतीं. पाटावरच्या पाण्यांत स्वैरपणें उड्या मारीत होतीं, एकमेकांच्या अंगावर पाणी उडवींत होतीं. मोटवाला तोंडानें रसाळ गाणें म्हणत मोट हांकीत होता. त्या तिघींना दुरून पाहिलें. त्यांचा तो संचार, तो प्रसंग, विश्वनाथाच्या त्या मळ्याचा एकंदर देखावा, या सर्वांचा माझ्या मनावर कांहीं विलक्षण परिणाम झाला !

ती शेताची वैभव-श्री, त्यांत आनंदांत मनानें फिरणाऱ्या शांता, इंदू आणि आनंदी, जणूं काय, उद्योगदेवता, उन्नतिदेवता, आणि प्रत्यक्ष आनंद देवता ( यावेळीं आनंदीही खरोखरच अतिशय आनंदपूर्ण दिसत होती. तिच्याही मनावर, त्या नितांत रमणीय देखाव्याचा परिणाम झाला होता खास ! ) विहरत आहेत, त्याकडे पाहतांना, "अहा ! विश्वनाथ खरा सुखी ! खरा संसारी. आणि खरा 'पैसा' त्याच्याजवळच आहे. 'माझी जमीन जर असती—" असाही कसला तरी विचार माझ्या मनांत आल्याखेरीज राहिला नाहीं, "मी खात्रीनें त्यांत अहोरात्र राबलों असतों ! पण—"

"कसला विचार करतो आहेस वामन ?" मला विचारमग्न पाहून विश्वनाथानें विचारलें.

"तुझी शेतवाडी पाहून मनाला काय वाटलें कांहीं सांगतां येत नाहीं !" मी म्हटलें, "हिन्दुस्थानची खरी संपत्ति, महाराष्ट्राची खरी लक्ष्मी, म्हणजे खरोखरी शेतीच ! आमचे बाबा म्हणत असत तें आज मला पटलें ! हिंदुस्थानची 'माती' म्हणजेच "**पैसा**" आहे !"

"अगदीं लाखाची गोष्ट बोललास !" ताबडतोब विश्वनाथानें माझ्या पाठीवर थाप टाकीत म्हटलें—

"पण असें आहे, तरी, तुमच्या '**नोकऱ्यां**'च्या मागचा, किंवा व्यापाराच्या नांवच्या '**दलाली**' करण्याकडचा ओढा कांहीं अजून कमी होत नाहीं ! त्याला काय करायचें ?"

"विश्वनाथ, जर जरा तरी शेती स्वतःची मजजवळ असती—" मी म्हटलें—

"तर काय केलें असतेंस ?" जगन्नाथानें मध्येंच विचारलें.

" तर, या शेतकऱ्यांच्या बरोबरीनें शेतांत राबलों असतों. ' साहेबा'च्या लाथा खाण्यापेक्षां, व्यापारांतल्या भागीदाराचे कपटाचे गळफांस लावून घेण्यापेक्षां, ' शेतींतच राबलों असतों. आणि वाटेल तेवढा ' **पैसा** ' उभा केला असता!— "

" आणि अजूनही तसें करतां येईल. " विश्वनाथानें माझ्या म्हणण्याला उत्तर दिलें, आणि पुढें विचारलें.

" वामन, तूं शरीरकष्ट करायला तयार आहेस ? "

" अर्थात् ! "

" बरें, तुझीं विलायतेला भरारी मारण्याची तयारी होतीच. तेव्हां हिंदुस्थानांतल्या हिंदुस्थानांत ' शेतावर ' जाण्यास तुझी तयारी आहे ? "

" कां असणार नाहीं ? "

" तसें नव्हे. तूं शिकलेला. तेव्हां शिकलेल्यानें, आयुष्यांत पुढें पुढें जायचें असतें. कारकूनींतून—अनेक खटपटी करून मिनिस्टर व्हायचा चान्स मिळतो कीं नाहीं हें पाह्यचें सोडून, तुला लोक ' शेतकरी ' झालेला पाहिला ह्मणजे म्हणतील 'आधी होता वाघ्या, दैवयोगें झाला पाग्या, परी मूळ स्वभाव जाईना, त्याचा यळकोट राहीना ! आणि असं ऐकलंस म्हणजे, तूं लटपटशील. आणि पुन्हां शेतावर लाथ मारशील !—हो, तुला लाथा मारायची संवय आहे म्हणून म्हणतों ! "

मी त्यानें तसें म्हटल्यावर हंसलों. त्यालाही हंसूं आलें.

" अरे, पण, तूं एक तयार असशील ! पण बायकांना तें शेती वगैरे करणं बरं वाटत नाहीं. त्यांच्या आवडीनावडीपुढं नाइलाज होतो ! " जगन्नाथ म्हणाला.

" कां ? स्वतःचा अनुभव सांगतोस वाटतें ? " मी त्याला म्हटलें.

" आणि त्याचा तो सध्यां—बायकांच्या भलत्या आवडीनावडी पुढें हात टेकल्याचा अनुभव घेतोच आहे ! " विश्वनाथ म्हणाला, " अरे, शांता-वहिनीला ' शेतवाडी पाह्यचे ' डोहाळे लागतात, याचा अर्थ काय ?—माझी तर अशी कल्पना आहे बोवा ! तुझ्या पोटीं तुझे वडील येणार ! आणि त्यांच्या करितां तुला ' शेती'ची व्यवस्था करावी लागणार !—मग काय ? "

"काय ?"

"जिजीची हौस पुरवून गर्भवतीचा हट्ट पुरवणार काय ? तुझें कर्तव्य आहे तें !"

"तोंडानें वाटेल तें म्हटलें, तरी साऱ्या गोष्टी तोंडच्या असतात थोड्याच! 'शेती' मिळवायची म्हणजे करायचें काय ?–आणखी त्यांतून अगोदर मला आडांतून तर निघूं दे. मग देशांतराची वाट !"

"आणि मी तरी आजच्याआजच 'शेतावर' जा असं कुठं म्हणतों आहें. तुझी तयारी आहे कीं नाहीं ती पाहिली. आहे कळलं. आतां तुझ्या करितां–आणि जगन्नाथ जर आमचं ऐकणार असला, हो त्याचें 'सावकारी हाड' आहे, तो ऐकेलच अशी खात्री कुणी द्यावी ?–कांहीं एक योजना मनांत धरली आहे. मागें मी बोललों होतोंच. पण ती योजना सांगितली नाहीं. आजही सांगत नाहीं. ती योजना रंगांत यावयाला आणखी वर्ष–आठ महिने तरी लागतीलच. तोंवर तूं आडांतून निघतोच आहेस. आणि जगन्नाथाच्या मनाचाही कांहीं तरी निश्चय होईलच. खरें कीं नाहीं ?" विश्वनाथ बोलला.

इतक्या वेळच्या शेतभर भटकण्यानें व बोलण्यानें, आतां कडकडून भूक लागली होती. म्हणून आम्हीं परतलों. मोटेपलीकडच्या आंब्याच्या सांवली खालीं, 'फराळा'ची वगैरे तयारी करून मंडळी बसलीच होती. वांटेकऱ्यांकडून केळीचीं पानें, ताजीं लिंबें, वगैरे इंदूनें आणविलीं होतीं. वनभोजनाचा तो एक मजेदार थाटच केला होता. आम्हीं गेलों. विहीरींत बुड्या मारून वर आलों. आणि सर्वजण एकदमच फराळाला बसलों. आई वाढीत होती.

आमच्या साठीं ताजें दूध आणण्याकरितां वाटेकऱ्याची बायको, आपल्या गायीच्या कासेखालीं बसली होती.

फराळाला सुरुवात झाली. आज सर्वच बदललें होतें. त्यामुळें–थारेपालटामुळें प्रत्येकाला एकप्रकारचें गोडगोड वाटत होतें. जेवतांना आम्हीं सर्व मोकळ्या मनानें बोलत होतों.

"शांता वहिनी," विश्वनाथ बोलतां बोलतां म्हणाला, "समजा, उद्यां वामन शेतकरी बनला, आणि शेतवाडी करूं लागला, तर तुम्हीं काय कराल हो ?"

" मी शेतकरीण बनून, त्या शेतकरीणबाईप्रमाणें गायीचं दूध काढून आणीत जाईन ! "

" वा: ! अगदीं स्वयंवरांतली रुक्मिणीच बोलली ! " आनंदानें आनंदानें म्हटलें.

तिलाच तें म्हणतां आलें. आजवर तिला किती तरी वेळां 'स्वयंवर' पहावयाचा योग आला होता.

त्या सहज बोलण्यांत माझ्याहीपेक्षां शांतेची पुढची तयारी आहे. हें सहजासहजीं उघड झालें.

" आई, " विश्वनाथ आईला उद्देशून म्हणला, " शांतावहिनींचा मुलगा पुढच्या वर्षी एक ' चांगला शेतकरी ' होणार आहे "

" ते रे कसं काय विश्वनाथ ? " आईनें आपल्या साध्या शब्दांत विचारलें.

" शांतावहिनींना ' शेतवाडी'चे डोहाळेच लागले आहेत. आणि त्याप्रमाणें आमच्या या श्रीमतीनें ' शेतावर'ही आणलें. डोहाळे पूर्ण झाले, तसें मुलाच्या बाबतींतही खरेंच व्हायचें ! आईच्या डोळ्यांत अश्रु उभे राहिले. बाबांची 'शेतवाडी' करण्याची अपुरी राहिलेली इच्छा तिच्या डोळ्यापुढें उभी राहिली.

झालें. शांतेचें अशा प्रकारचें सुन्दर डोहळेजेवण झालें. आणखीं आम्हीं फिरलों. बोललों. आणि संध्याकाळला घरीं पोचूं अशा बेतानें तो गोड समारंभ संपवून परत निघालों.

---

## —प्रकरण १६ वें—



# श्रमसौन्दर्य

**क्लेशः फलेनहि पुनर्नवतां विधत्ते ।**

कालीदास.

साधारणतः त्या गोष्टीला एक वर्ष लोटलें आहे. या अवधींत कितीतरी गोष्टी घडल्या आहेत. माझ्या बलभीमभागीदाराच्या ‘ केस ’चा निकाल लागून, ती केस, मला अनुकूल अशीच निकालांत निघाली आहे. कोर्टांत, मी चालविलेली शाखा कोणत्याही प्रकारें नुकसानींत नव्हती, किंवा हिशेबांत ‘पै’ची सुद्धां घालमेल नव्हती. असें साक्षीपुराव्यानिशीं सिद्ध झाल्यामुळें, “ भागीदाराशीं जितक्या मुद्दतीचा करार आहे, तितक्या मुदतीपर्यंत शाखा चालविलीच पाहिजे, किंवा त्या मुदतीची सर्व नुकसानभरपायी भागीदाराची भरून दिली पाहिजे, ” अशा अर्थाचा कोर्टाचा निकाल झाला.

पण बलभीमाच्या डोक्यानें एकदां जें वेड घेतलें तें घेतलें. बहाद्दरानें माझी सात वर्षांची करारांतली मुदत होती, त्यापैकीं जितके दिवस संपले होते, तितके दिवस वजा जातां भरपूर ‘ नुकसान ’ दिलें. पण ‘ शाखा ’ बंद केली.

माझेंही लक्ष शेतीकडे विश्वनाथानें खेंचल्यामुळें ‘ शाखेंत ’ अडकलें राहाण्यापेक्षां मला ‘नुकसानभरपायी’ घेणेंच पथ्यावर पडलें.

कोर्टाचा निकाल लागून नुकसानभरपायी हातीं आल्यानंतर लवकरच विश्वनाथाची योजना पूर्ण झाली. ती योजना ह्मणजे ‘ इंदूर–ग्वाल्हेर ’ संस्थानांत ज्या लागवडीकरितां--अगदीं कायमच्या मालकीहक्कानें ज्या जमिनी काढलेल्या आहेत, त्याची माहिती मिळवून, पत्रव्यवहार करून, आपल्याकरितां किती किती जमीन संपादावयाची, हें ठरवून--अगदीं जय्यत केलें इतकेंच नव्हे, तर ज्यांना ताबडतोब जातां येणें शक्य होतें, त्यांना त्यानें पाठवून दिलें होतें. त्यांचे वेळोवेळचे अनुभवही तो मागवीत होता. पुढें गेलेली मंडळी, ह्मणजे वझे, भिलवडीकर, महाजन, उपासनी, पुराणिक, पुरोहित, फडणीस, नारिंग्रेकर वगैरे वगैरे बरीच होती.

आमच्यापुढें ती सर्व माहिती ठेविली. आणि निघण्याची तयारी करण्यास सांगितलें. माझ्याबरोबर जगन्नाथही येण्याला तयार झाला. त्याची तशी परिस्थितीच झाली. तिसरा, विश्वनाथाचा मेहुणा. तो नुकतांच 'बीएजी' झाला होता. त्याला तिकडे पाठविण्याची सल्ला व भांडवल विश्वनाथानेंच दिलें. मलाही लागणाऱ्या भांडवलाची तरतूद विश्वनाथानेंच केली होती. पण माझ्या 'केस'चा निकाल अनुकूल लागून नुकसानभरपाई मिळाल्यामुळें, त्यांतून कोणाचें एक 'पै'ही कर्ज न ठेवतां, एक वर्षाला पुरण्याइतकी पुंजी मजजवळ शिल्लक राहिली. मग विश्वनाथाला कशाला तसदी द्यावयाची! तरी पण केव्हांही जरूर लागली, तर विश्वनाथाचें आश्वासन होतेंच!

याप्रमाणें आह्मीं आपली मंडळी घेऊन 'ग्वालेर संस्थानांत'ल्या शेतावर गेलों. मी शेतकरी झालों. शाळेकरितां भावंडांना प्रथम इकडेच ठेवलें. आई, मी व शांता, एवढीच मंडळी गेलों.

योग्य वेळीं मी, 'मुलाचा बाप' झालों. जगन्नाथ 'मुलीचा बाप' झाला. माझ्या मुलाचें नांव संकल्पिल्याप्रमाणें माझ्या वडिलांचेंच ठेविलें. आई फक्त त्याला 'बाळ' ह्मणते.

आमच्या अगोदर पुढें गेलेल्या आमच्या परिचयाच्या मंडळींनीं आमचें स्वागत चांगलें केलें. त्यांच्या प्रमाणेंच आह्मीं आकुंचित मनाची कोंडी फोडली, याबद्दल त्यांना फार अभिमान वाटला! सुरुवातीला त्यांनीं अगदीं घरच्या माणसासारखें लागेल तें सहाय केलें!

आतां आमच्या 'शेतकरी' पेशाला सुरुवात झाली. दिवसच्या दिवस शेतीच्या मशागतींत, निरनिराळ्या लहानमोठ्या शेतीच्या कामांतच जाऊं लागले. पण त्या श्रमाचें कांहीं एक वाटेना. 'वरिष्ठ' माणूसकीला मारील, किंवा 'भागिदार गळा' दाबील, ही भीति येथें नाहीं. हे माझे. मी कष्ट करणार. मी मिळविणार, मी खाणार! तेव्हां भीति कुणाची आणि कशाबद्दल?

शांतेला घरचीं कामें संभाळून गायीगुरें बांधावीं लागतात. सोडावीं लागतात. त्यांचे गोठे साफसूफ करावे लागतात! तीच काय पण अनूवहिनी देखील हें सर्व करीत असते. माझ्याबरोबरीनें जगन्नाथही कष्ट करीत असतो.

आईला सध्यां 'बाळा'ला खेळविण्यापेक्षां काम नाहीं. आह्मीं जिथें राहतों,

त्या सोप्यावर समोर एक झोंपाळा बांधून दिला आहे. झोंपाळयावर आई, आणि आईच्या मांडीवर बाळ असतो.

संध्याकाळीं आई ' बाळा 'ला घेऊन अशी झोंपाळयावर बसलेली असते, शांता, त्याच्या गालाला तीट लावून, गलुतं घालण्याच्या खटपटींत असते, गुलाम एकीकडे हंसत असतो, आणि एकीकडे शांतेला गलुतं घालूं देत नाहीं. अशाच वेळीं, माझ्या खांद्यावर शेतीचें आयुध, हातांत बैलांना धरलेला दोर, अशा थाटांत आमची स्वारी समोर येत असतां,आई त्याला बोट करून "कोण रे येतं आहे तें?" असें म्हणून गलुतं घालावयाला शांतेला सुकर जाण्याकरितां युक्ति करीत असते. पण बाळाच्याऐवजीं शांताच माझ्या येण्याकडे सलक्ष पहात असते. मग काय ती माझ्या 'श्रमसौंदर्यांत' मोहून जाते कीं काय नकळे !

आह्मांपासून इंदू व विश्वनाथ दूर राहिल्यामुळें कधीं कधीं कसेसेंच वाटतें. पण त्या बाबतींत विचार करावयाला फारशी आह्मांला फुरसदच मिळत नाहीं.

मधुकराचें शिक्षण कसें होईल, आणि विमलच्या लग्नाकरितां खर्चाला कुठून काय आणूं ? या विचारांनीं आतां धास्तावल्यासारखें होत नाहीं. श्रमाची शिकस्त शेतांत करतों, आणि ही '**मायभू**' वाटेल तेवढा "**पैसा**" माझ्या लागणाऱ्या संसाराच्या खर्चासाठीं देईलच ही माझी खात्री आहे.

माझें शेत भरगच्च पिकाला आलें असतां संध्याकाळच्या सोनेरी किरणांनीं तें शेत इतकें हृदयंगम दिसतें कीं त्यावरून कुबेराची संपत्तीही ओंवाळून टाकावी ? त्यापुढें ' पैसा ' म्हणजे काय गोष्ट आहे ?

\+ + + +

ज्यांना स्वतःची शेती आहे, व जे तनुमनानें त्यांत झिजताहेत, त्यांना माझ्या सांगण्याची किंचित् तरी कल्पना येईल. इतरांना कशी येणार ? ज्यांना शेत आहे पण तिकडे अजून लक्ष गेलें नाहीं, त्यांनीं एकदां तिकडे लक्ष घालावें, म्हणजे पाठीराखा परमेश्वर त्यांना " नवें जग ! " दाखविल्याशिवाय राहणार नाहीं.

\+ + + +

" नवें जग " पाह्यचें आहे ना आपल्याला ? मग अगोदर ' पैसा ' मिळवा बरं !

---

## —उपसंहार—

आतां मी शेतकरी आहें. आणि म्हणूनच छातीला हात लावून सांगतों, मी ‘ सुखवस्तु ’ आहें. ‘ शेत ’ हा मूर्तिमंत ‘ **पैसा** ’ आहे. त्या सांवलीला असल्यामुळें, मला ‘ कर्ज ’ सतावीत नाहीं. कुणी चार मंडळी आली तर डरूं देत नाहीं. कुणी गरजू आला, तर स्वखुषीनें पांच पैसे उचलून देतां येतात. मुलांचीं लग्नें आणि शिक्षण, ऐनवेळचे आजार, कुणाचा कसलाही लहानमोठा फंड असो, देशाचें काम असो, त्याला कांहीं तरी यथाशक्ति देतांना छाती फुटून जात नाहीं. ‘ नोकर ’ शेतीपासून पैदा करतां येतात. ‘ व्यापारा’ची सुरुवात —माल तयार करून विकण्याच्या व्यापाराची—शेतीपासूनच करतां येतें. श्रम करावयाचें, आणि ‘ पैसा ’ शेताकडून घ्यावयाचा !

× × × ×

आतां शांता किती सुखी आहे ! ती आतां कापल्या माहेरी मोठ्या डौलानें वर्षाकाठीं एकदां जातें. गरीबींत शिरून पुन्हां श्रेष्ठ पदाला स्वतःच्या वागणुकीच्या बळावर चढली, म्हणून तिच्या वडिलांना केवढी धन्यता वाटते ! आणि कष्टाचे, पण सुखाचे मार्गच मला दाखवीत जाऊन व स्वतःही मजबरोबर तितकेच कष्ट सोसून मला ‘ माणूस ’ शांतेनेंच केलें नाहीं काय ?

× × × ×

कुणाला केव्हां माझी शेतवाडी पहावयाला यावयाचें असेल तर खुशाल यावें. आपलें यथायोग्य स्वागत होईल !

---

**यत् कृतं यत्करिष्यामि तत्सर्वं न मया कृतम् ।**
**त्वया कृतं तु फलभुक् त्वमेव मधुसूदन ॥**



# श्री दत्त एजन्सी पुणें.



( १ ) बाहेरगांवीं हरएक प्रकारचा माल योग्य भावानें व कसोशीनें खरेदी करून पाठविला जातो. तसेंच बाहेरून येणाऱ्या 'माला'ची येथील बाजार पेठेंत योग्य भाव येईल अशा रीतीनें विक्रीची व्यवस्था केली जाते.

( २ ) स्टेशनरी, कागद, पेन्सिली, एक्सरसाईज बुकें, शाई, टांक, पेपरमिंट, साबण, निरनिराळीं सुगंधी तेलें, किरकोळ, व घाऊक आमच्या एजन्सींत मिळण्याची व्यवस्था आहे.

( ३ ) 'नवाकाळ' पत्राकरितां जाहिराती येथें स्वीकारून शक्य तितक्या लवकर त्या पत्रांत जाहिराती येतील अशाबद्दल व्यवस्था केली जाते.

( ४ ) श्रीदत्त एजन्सीकडे 'नवाकाळ' या दैनिकाची व साप्ताहिकाची 'एजन्सी' असल्यामुळें, दुसऱ्या कोणत्याही नव्या साप्ताहिकाची, मासिकाची, त्रैमासिकाची, मालेची 'एजन्सी' श्रीदत्त एजन्सीकडे आल्यास, त्याचा स्वीकार केला जातो.

( ५ ) 'महाराष्ट्र–कुटुंब–माले' ची व्यवस्था श्रीदत्त एजन्सिकडेच असल्यामुळें सदर मालेचीं पुस्तकें, वर्षावर्षाचीं बांधलेली वगैरे आमच्याकडे मिळतात. इतर शालोपयोगी, तसेंच नाटकें, कादंबऱ्या, काव्यें, अशींही पुस्तकें आम्हीं पाठवूं शकतों.

गरजूंनीं 'श्रीदत्त एजन्सी'स एकवार काम सांगून अनुभव घ्यावा, ही विनंति.

मालकः—विठ्ठल रामचंद्र खाडिलकर,

३९१ नारायण पेठ, पुणें शहर.

### महाराष्ट्र-कुटुंब-मालेच्या

### ' चिमणी ' वरील

# वर्तमानपत्रकर्त्यांचे अभिप्राय

**केसरी** ( पुणें ). समाजांत द्रव्यानें उत्पन्न झालेला उच्चनीच भाव समाजांतील कांहीं वर्गास असह्य होतो. परंतु गुण व शील केवळ द्रव्यावर अवलंबून नसतात. गुणी मनुष्य द्रव्यवान माणसापेक्षांहि श्रेष्ठ असतो. याचें उदाहरण या कादंबरींत कादंबरीकारानें दाखविलें आहे. नायिका चिमणी ही गर्भश्रीमंत परंतु गुणाची चाहती, नायक मनोहर हा दरिद्री परंतु शीलवान व उभयतांचें मन मिळालेलें. अशा स्थितींत चिमणाचा विवाह तिच्या वडिलांनीं एका इनामदाराशीं ठरविला. परंतु चिमणीनें त्या प्रसंगीं बाणेदारपणानें वागून अखेर बापाची संमति कशी मिळविली इ. कथानक या कादंबरींत रंगवलें असून तें बरें वठलें आहे. कादंबरीचा हा पूर्वार्ध असल्यानें उभयतांच्या जीवनक्रमांत काय वाढ झाली हें समजण्यास यांत साधन नाहीं. तथापि आहे एवढाहि भाग मनोरंजक असून वरेरकर कादंबरीकार म्हणून नव्यानेंच पुढें आले असले तरी कादंबरी बरी आहे.

**नवाकाळ** ( मुंबई ). सुप्रसिद्ध नाटककार श्री. वरेरकर यांचा कादंबरीलेखनाचा हा पहिला प्रयत्न आहे. मराठा समाजांतील एका पाणीदार इनामदारांची पाणीदार मुलगी आणि जातिवंत परंतु गरीब अशा मराठा कुळांतील एक हुषार मुलगा यांना शिक्षण व सत्संगति यांचा लाभ झाल्यानंतर त्यांच्या स्वभावाचा विकास कोठपर्यंत होऊं शकतो, त्यांच्या ठिकाणीं निसर्गतःच असलेलें धैर्य शौर्यादि गुण फुललेल्या गुलाबाप्रमाणें सभोंवारच्या वातावरणांत कसा सुगंध पसरवितात याचें मार्मिक व रसभरित चित्र श्री. वरेरकर यांनीं आपल्या कथानकांत रंगविलें आहे. मागासलेला म्हणून समजल्या जाणाऱ्या मराठा समाजांतील तरुणतरुणींना आदर्शभूत व उद्बोधक होईल अशी या कादंबरीची रचना करण्यांत आली आहे. केवळ मराठा समाजांतील तरुणतरुणींना प्रोत्साहन देणें हेंच ध्येय प्रस्तुत कादंबरी लिहितांना श्री. वरेरकर यांनीं आपल्या डोळ्यांपुढें ठेविलें असल्यास त्यांच्या या ध्येयाच्या दृष्टीनें ही कादंबरी बरीच यशस्वी झाली आहे. सांप्रतच्या काळीं शहरांतील राहणींतील इंग्रजी शिक्षणक्रमाच्या चरकांत सांपडलेलीं सर्वच जातींचीं मुलें पिळून निघाल्यासारखीं मेषपात्र

बनतात. हा परिस्थितीचा दोष आहे. कोणत्याहि एका समाजाचा तो विशेष नाहीं. श्री. वरेरकरांची भाषा चटकदार, वर्णनशैली रंगदार आणि त्यांच्या कथानकांतील पात्रें भरदार आहेत. कादंबरी वाचीत असतांना मनाला सात्विक व आल्हाददायक करमणूक झाल्याखेरीज रहात नाहीं. सुशिक्षित ब्राह्मण व मराठे यांच्या दरम्यानचा व्यवहार दिलदारपणाचा खेळीमेळीचा व गोडीगुलाबीचा कसा होऊं शकतो हें मन्याबापू, सरकार, खरे मास्तर, व मनोहर किंवा विनोबा, मनोहर इत्यादि पात्रांच्या परस्परव्यवहारावरून फार उत्तम दिसून येणार असून शुष्क ब्राह्मण-ब्राह्मणतर वादांतील शुष्कत्व दाखविण्याचे दृष्टीनें श्री. वरेरकरांचा हा प्रयत्न चांगला साधला आहे. मन्याबापू, चिमणी व मनोहर त्याचप्रमाणें मनोहरचे बाबा यांच्यासारख्या उच्चकोटींतील माणसें प्रत्यक्ष सृष्टींत क्वचित दिसलीं तरी श्री. वरेरकरांच्या लेखणींतून उतरलेली वर्णनें वाचीत असतां आपल्यापुढें खरोखरीच या पात्रांच्या हालचाली चालल्या आहेत इतकें या पात्राशीं वाचक समरस होऊं शकतात.

ज्ञानप्रकाश (पुणें) कादंबरीचें कथानक अगदीं साधें परंतु मनोवेधक असें आहे. केवळ कर्तबगारीच्या जोरावर एका भिकार मजुराच्या पोराला सुद्धां धनाढय इनामदाराचा जांवई कसें होतां येतें हें कथानकांत दाखविलें आहे. कथानकांतील सर्वच प्रसंग अगदीं रोजच्या व्यवहारांतील असून अगदीं सहजासहजीं घडून येण्यासारखे आहेत. ही गोष्ट वाचतांना चाळीस वर्षांपूर्वीच्या महाराष्ट्रांतील कोणत्याही एकाद्या समृद्ध खेड्याचें चित्र डोळ्यांपुढें उभें राहतें. कथानकांतील पात्राचीं स्वभाववर्णनें मोठ्या खुबीदार रीतीनें रेखाटलीं आहेत. कादंबरींतील वर्णनें वाचलीं म्हणजे लेखकाचें मानवी स्वभावाचें सूक्ष्म अवलोकन किती उच्च दर्जाचें आहे ह्याविषयीं खात्री पटते. समाजाच्या उन्नती करितां गोषा वगैरे चालीरितींना फाटा देणाऱ्या जातिवंत मराठा इनामदाराविषयीं मनांत आदर उत्पन्न होतो. थोडीशी हट्टी, कांहींशी समजुतदार, बरीचशी धीट पण अतिशय सत्यप्रिय अशा चिमणीचें कौतुक करावें तितकें थोडेंच आहे. "मुलांची जात" नांवाचें प्रकरण वाचतांना प्रत्येक सुहृदय वाचकाचें हृदय गदगदा हालवलें जाईल यांत शंका नाहीं. ब्राह्मण विनु आणि मराठा मनोहर हे दोघे मित्र अगदीं सख्या भावाप्रमाणें एकाच शिदोरींतील भाकरी आनंदानें खातांना बघून ब्राह्मण ब्राह्मणेतर या दोन्ही समाजांतील समंजस माण-

सानीं सलोखा करण्याचें मनावर घेतलें तर तें किती सोपें आहे हें कळून येतें.

नाटककाराला कादंबरीकार होतां येतें किंवा नाहीं हा प्रश्न जरी कांहीं अंशीं वादग्रस्त असला तरी नाटककारानें लिहिलेल्या कादंबरींत नाटकी थाटाच्या प्रसंगांचें प्राबल्य बरेंच असतें ही गोष्ट मात्र निर्विवाद आहे.

**व्यायाम** ( बडोदें ) मालेच्या इतर पुस्तकांप्रमाणें हें पुस्तकही वाचनीय झालें आहे. कथानक साधें असून नित्याचेच प्रसंग चांगल्या भाषेंत वर्णन केले आहेत.

**बलवंत** ( रत्नागिरी ता. ६ सप्टेंबर २६ ). सदर कादंबरी प्रसिद्ध नाटककार श्री. भा. वि. वरेरकर, यांचे लेखणींतून उतरलेली असल्यामुळें तिच्या गुणासंबंधीं विशेष लिहिण्याचें प्रयोजनच नाहीं. कादंबरी सामाजिक असून त्यांत जातिविषयक, विवाहविषयक, धर्मविषयक व व्यायामासंबंधीं, पांढरपेशांच्या भ्रामक समजुतींविषयीं यथास्थित चर्चा मार्मिक रीतीनें केलेली आहे. संविधानक सोपें असून, भाषा साधी, मनोहर, व वर्णन विषय वाचकांवर ठसविणारी असून, कादंबरीशीं वाचक तेव्हांच समरस होतो. स्वभाव वर्णनेंही उत्तम साधलीं असून एकंदरींत **चिमणी** आदरणीय आहे.

**वैनतेय** ( सावंतवाडी ). वाङ्मयमंदिराच्या नाट्यविषयक दालनांत श्री. वरेरकर यांनीं प्रवेश केल्यास बराच दीर्घ अवधि लोटला असून त्या दृष्टीनें ते मराठी वाचकांच्या व प्रेक्षकांच्या चिरपरिचयाचे झाले आहेत. वाङ्मयमंदिराच्या एका दालनांतून दुसऱ्या दालनांत जाणें ही गोष्ट अगदींच सोपी नाहीं हें कोणत्याही भाषेचें वाङ्मय पाहिल्यास कळून येण्यासारखें आहे. अशा स्थितींत वरेरकरांसारख्या नाट्य लेखनांत नांव मिळविलेल्या लेखकानें कादंबरी लेखनाचा ओनामा गिरविण्यास सुरवात करावी, ही गोष्ट निःसंशय अभिनंदनीय आहे. कथानक, स्वभावरेखन, भाषा वगैरे सर्व दृष्टींनीं कादंबरी वाचनीय वाटते. श्रीमंत चिमणी व गरीब मनोहर यांच्यांत प्रेमाचा समुद्भव होण्यापासून त्यांचें पर्यवसान उभयतांच्या विवाहांत होण्यापर्यंतचें कथानक प्रस्तुत कादंबरींत असून त्यापुढील उभयतांच्या आयुष्यक्रमासंबंधाचें दोन भाग श्री. वरेरकर हे लिहिणार आहेत. एकंदरींत वरेरकरांचा हा प्रथम प्रयत्न बरा साधला आहे. असें म्हणण्यास हरकत नाहीं.

**तरुण भारत** (नागपूर ता. २५ ऑगस्ट १९२६). सुप्रसिद्ध नाटककार भा. वि. वरेरकर यांनीं ही सुंदर कादंबरी मालेचे संपादक श्री. कुळकर्णी यांच्या आग्रहावरून लिहिली आहे. नाटककाराला कादंबरीलेखन कितपत साधेल अशी भीति मनांत बाळगून भीतभीत व त्यांनीं कादंबरी लिहिली. परंतु त्यांना त्यांच्या प्रयत्नास कल्पनेबाहेर यश लाभलें आहे हें ही कादंबरी वाचणारास कळून येईल. कादंबरींत रंगविलेली प्रमुख पात्रें मनोहर व चिमणी यांचें वयोमान लक्षांत घेतां त्यांच्या तोंडून वदविलेले विचार बऱ्याच प्रौढ स्वरूपाचे दिसतात. भासमान होणारी ही न्युनता डोळ्याआड केल्यास कादंबरींतील पात्रांचे स्वभाव परिपोष चांगले साधले आहेत. थोडींच पात्रें कादंबरींत आणलीं गेल्यानें अनेक पात्रें आणल्यानें उत्पन्न होणारा घोटाळा उडालेला नाहीं. मनोहर हा सध्यां हिंदुत्वाचें रक्षण करावयास तयार होऊं पहाणाऱ्या हिंदी राष्ट्रांतील तरुणांचा आदर्श म्हणून शोभेल, चिमणीचा रुबाबदार निश्चयी विचारशील स्वभाव मराठा वीरबालांची साक्ष पटवील. मनोहर व चिमणी यांमधील शुद्ध, सात्विक, निर्मल व निर्व्याज प्रेमानें एखाद्या प्रेमळ आदर्शभूत जोडप्यांमधील प्रेमाची यथार्थ कल्पना होईल. कादंबरींत आनुषंगानें जाती, धर्म, व्यवहार, व्यायाम वगैरे संबंधीचे अभिजात व राष्ट्रसंघ धनक्षम असे विचार प्रगट केले आहेत. ही कादंबरी कै. हरिभाऊ आपट्यांच्या 'मी' कादंबरीच्या पद्धतीवर लिहिण्यांत आली आहे. एकदां ती हातांत घेतली कीं पूर्ण वाचल्याशिवाय खालीं ठेवावीशीं वाटत नाहीं, इतका वाचक तींत तल्लीन होऊन जातो !

---

# भावंडांच्या भेटी.

**अविमारक**–(श्री महाकवि भासकृत या नाटकाचें भाषांतर व त्यास जोडलेली विस्तृत प्रस्तावना) श्री. विष्णु दामोदर देशपांडे धुळें व वे. काव्यालंकारभूषण खुंपरकर यांनीं तयार करून प्रसिद्ध केलें. संस्कृत ग्रंथाचे मूळाला धरून परिशीलन करणाऱ्यास असलींच पुस्तकें उपयोगी पडणार हें निश्चित आहे. त्या दृष्टीनें भाषांतर व त्यावरील टीपा अत्यंत मार्मिक व सूचक अशा झाल्या आहेत. प्रस्तावनेंत वे. खुपेरकर यांनीं भासकवीसंबंधीं विस्तृत चर्चा केली असून

तेव्हढीं त्यांनीं वाचकांच्या पुढें ठेविलीं आहेत. ही श्री. दीक्षित यांची 'समर्थ-सेवा' त्यांना व या 'कांडांच्या' वाचकांस, सारखीच सुखी करो, अशी समर्थ-चरणीं प्रार्थना आहे.

**दडपशाही**—( ले० कै. 'सीताकांत' प्रकाशक-वि. ना. लेले, संपादक मधुकर-मुंबई. ) सदरहू असहकाराच्या कालांतील विचारक्रांतीचें द्योतक होणारी कै० 'सीताकांता'ची छोटीशी पण सतेज कादंबरी नुकतीच प्रसिद्ध झाली आहे. कै० 'सीताकांत' यांची लेखणी कधींच कांहीं अहेतुक लिहीत नसे. त्यांच्या लेखणीचें प्रभावी उद्बोधक कार्य या कादंबरीनें फारच सुंदर असें केलें आहे. कै० सीताकांत यांच्या या पोरक्या पोरीचें कोडकौतुक जितकें महाराष्ट्रभाषाभिमानी करतील तितकें थोडेंच आहे.

**राजर्षि भीष्म** } **अमेरिकापथदर्शक** } ( संपादक व प्रकाशक श्री. श्रीधर नारायण हुद्दार, वाङ्मय-विशारद- ) अभिनव ग्रंथ-मालेंतून फुललेलीं हीं सुन्दर दोन पुष्पें आमच्या भेटीस आलीं आहेत. स्वामी सत्यदेव यांनीं दाखविलेला 'अमेरिकापथदर्शक' व 'राजर्षि भीष्म' ही त्यांनींच निवेदिलेली स्फूर्तिप्रद कथा—श्री. श्रीधर नारायण हुद्दार यांनीं आपल्या भाषेंत तितक्याच तोलामोलानें आणिली आहे. विशिष्ट हेतूनें ज्या कांहीं 'माला' वगैरे चालू होतात, त्यापैकीं ही एक 'अभिनव-ग्रंथ-माला' आहे, असें तिच्याकडे बोट दाखवून सांगणें अगत्याचें आहे. सध्यांच्या काळांत असल्या अवघड मालेची कामागिरी श्री. हुद्दार यांनीं हौसेनें शिरावर घेऊन 'माला' चालविली आहे, याबद्दल 'माला' त्यांचें मनःपूर्वक अभिनंदन करीत आहे. असल्या मालेला उचलून धरणें महाराष्ट्राचें कर्तव्य आहे, असें ह्मणणें जरूर आहे.

---